दादा भगवान कथित

# गुरु शिष्य



गुरू म्हणजे जे आपल्याला मार्ग दाखवतात, गाईडसारखे.

Marathi

## त्रिमंत्र







नमो अरिहंताणं
नमो सिद्धाणं
नमो आयरियाणं
नमो उवज्झायाणं
नमो लोए सव्वसाहूणं
एसो पंच नमुक्कारो,
सव्व पावप्पणासणो
मंगलाणं च सव्वेसिं,
पढमं हवइ मंगलम् १
ॐ नमो भगवते वासुदेवाय २
ॐ नमः शिवाय ३
जय सच्चिदानंद



## दादा भगवान कोण ?

जून १९५८ संध्याकाळची अंदाजे सहाची वेळ, सुरत स्टेशनवर अलोट गर्दी होती. रेल्वेच्या प्लेटफॉर्म नंबर तीनच्या बाकावर बसलेल्या श्री अंबालाल मूळजीभाई पटेल रुपी देहमंदिरात नैसर्गिक स्वरुपात कित्येक जन्मांपासून व्यक्त होण्यासाठी आतूर असलेले 'दादा भगवान' संपूर्णपणे प्रकट झाले आणि निसर्गाने सर्जन केले अध्यात्माचे अद्‌भूत आश्चर्य! एका तासात विश्वदर्शन लाभले! मी कोण ? भगवंत कोण ? जग कोण चालवत आहे ? कर्म म्हणजे काय ? मुक्ती कशाला म्हणतात ? इत्यादी जगातील सर्व आध्यात्मिक प्रश्नांची रहस्ये संपूर्णपणे प्रकट झाली. अशाप्रकारे निसर्गाने विश्वाला प्रदान केले एक अद्वितीय, संपूर्ण दर्शन आणि ह्याचे माध्यम बनले अंबालाल मूळजीभाई पटेल, जे होते गुजरातच्या चरोतर जिल्ह्यातील भादरण गावचे पाटील, कॉन्ट्रॅक्टचा व्यवसाय करणारे आणि तरीही पूर्ण वीतराग पुरुष.

त्यांना प्राप्ती झाली तशी ते फक्त दोन तासात इतर मुमुक्षुनां सुद्धा आत्मज्ञानाची प्राप्ती करवित असत, त्यांच्या सिद्ध झालेल्या अद्‌भूत ज्ञान प्रयोगाद्वारे. त्याला अक्रम (क्रमविरहीत) मार्ग म्हटले जाते. अक्रम म्हणजे क्रमाशिवायचा आणि क्रम म्हणजे पायरी पायरीने, क्रमाक्रमाने वर चढणे! अक्रम म्हणजे लिफ्ट मार्ग! शॉर्ट कट!

ते स्वत: प्रत्येकाला 'दादा भगवान कोण ?' याबद्दलची फोड करून देताना म्हणायचे की, ''हे दिसतात ते 'दादा भगवान' नाहीत. हे तर 'ए.एम. पटेल' आहेत. आम्ही ज्ञानीपुरुष आहोत आणि आत प्रकट झाले ते दादा भगवान आहेत. दादा भगवान तर 'चौदालोक'चे नाथ आहेत, ते तुमच्यात पण आहेत, सर्वांमध्ये आहेत! तुमच्यात अव्यक्त रुपात आहेत आणि 'येथे' माझ्या आत संपूर्णपणे व्यक्त झालेले आहेत! माझ्या आत प्रकट झालेले 'दादा भगवान' यांना मी पण नमस्कार करतो.''

व्यापारात धर्म असावा परंतु धर्मात व्यापार नसावा. या सिद्धांताने त्यांनी आपले संपूर्ण जीवन व्यतीत केले. संपूर्ण जीवनात त्यांनी कधीही, कोणाकडूनही पैसे घेतले नाहीत, उलट स्वत:च्या व्यवसायातून झालेल्या फायद्यातून भक्तांना यात्रा करवित असत.

## आत्मज्ञान प्राप्तीची प्रत्यक्ष लींक

मी तर, काही लोकांना माझ्या हातून सिद्धी प्रदान करणार आहे. नंतर कोणीतरी हवा की नको! नंतर लोकांना मार्ग तर हवाच ना?

– दादाश्री

परम पूज्य दादाश्री गावोगावी, देशविदेश परिभ्रमण करुन मुमुक्षुंना सत्संग आणि आत्मज्ञान प्राप्ती करवित होते. दादाश्रींनी आपल्या हयातीतच पूज्य डॉ. नीरुबहन अमीन (नीरुमा) यांना आत्मज्ञान प्राप्त करवून देण्याची ज्ञानसिद्धी प्रदान केली होती. दादाश्रींच्या देहविलयानंतर नीरुमा सुद्धा त्यांच्याप्रमाणेच मुमुक्षुंना सत्संग व आत्मज्ञान प्राप्ती निमित्त भावाने करवित असत. पूज्य दीपकभाई देसाई यांना दादाश्रींनी सत्संग करण्याची सिद्धी प्रदान केली होती. पू. नीरुमांच्या उपस्थितीतच त्यांच्याच आशीर्वादाने पूज्य दीपकभाई देश-विदेशात कित्येक ठिकाणी जाऊन मुमुक्षुंना आत्मज्ञान प्राप्ती करवित असत, हे कार्य नीरुमांच्या देहविलयानंतर आजसुद्धा चालूच आहे. या आत्मज्ञान प्राप्तीनंतर हजारो मुमुक्षु या संसारात राहून, सर्व जबाबदाऱ्या संभाळत असताना सुद्धा मुक्त राहून आत्मरमणतेचा अनुभव घेत आहेत.

पुस्तकात मुद्रित वाणी मोक्षार्थीला मार्गदर्शनासाठी अत्यंत उपयोगी सिद्ध होईल, परंतु मोक्षप्राप्तीसाठी आत्मज्ञान प्राप्त करणे गरजेचे आहे. अक्रम मार्गाने आत्मज्ञान प्राप्तीचा मार्ग आजसुद्धा चालू आहे. जसा प्रज्वलित दिवाच दुसऱ्या दिव्याला प्रज्वलित करु शकतो, त्याचप्रमाणे प्रत्यक्ष आत्मज्ञानींकडून आत्मज्ञान प्राप्त करुनच स्वत:चा आत्मा जागृत होऊ शकतो.

## निवेदन

परम पूज्य 'दादा भगवान' यांच्या प्रश्नोत्तरी सत्संगात विचारलेल्या प्रश्नांची उत्तरे देताना त्यांच्या श्रीमुखातून अध्यात्म आणि व्यवहार ज्ञानासंबंधी जी वाणी निघाली, ती रेकॉर्ड करून, संकलन व संपादन करून पुस्तकांच्या रुपात प्रकाशित केली जात आहे. त्याच साक्षात सरस्वतीचे अद्‌भूत संकलन ह्या पुस्तकात झाले आहे, जे आम्हा सर्वांसाठी वरदानरुप ठरेल.

प्रस्तुत अनुवादाची वाक्यरचना मराठी व्याकरणाच्या मापदंडावर कदाचित खरी ठरणार नाही, परंतु दादाश्रींच्या गुजराती वाणीचे शब्दशः मराठी अनुवाद करण्याचा प्रयत्न केलेला आहे, की जेणे करून वाचकांना असा अनुभव व्हावा की दादाजींचीच वाणी ऐकली जात आहे. पण तरीसुद्धा दादाश्रींच्या आत्मज्ञानाचे अचूक आशय, जसे आहे तसे तर तुम्हाला गुजराती भाषेतच अवगत होईल. ज्यांना ज्ञानाचा गहन अर्थ समजून घ्यायचा असेल, ज्ञानाचे खरे मर्म जाणायचे असेल, त्यांनी या हेतूने गुजराती भाषा शिकावी अशी आमची नम्र विनंती आहे.

अनुवादातील त्रूटींसाठी आपली क्षमा प्रार्थितो.

## वाचकांना...

❖ ह्या पुस्तकातील मुद्रित पाठ्यसामग्री मूळतः 'गुरू-शिष्य' या गुजराती पुस्तकाचे मराठी अनुवाद आहे.

❖ जिथे-जिथे 'चंदुभाऊ' या नावाचा उल्लेख केला आहे, तिथे वाचकांनी स्वतःचे नाव समजून वाचन करावे.

❖ पुस्तकातील कोणतीही गोष्ट जर तुम्हाला समजली नाही, तर प्रत्यक्ष सत्संगात येऊन त्याचे समाधान मिळवावे अशी नम्र विनंती.

❖ दादाश्रींच्या श्रीमुखातून निघालेले काही गुजराती शब्द जसेच्या तसे *'इटालिक्स'* मध्ये ठेवले आहेत, कारण त्या शब्दांसाठी मराठीमध्ये तसेच कोणतेही शब्द उपलब्ध नाहीत की ज्यामुळे त्याचा अर्थ पूर्णपणे समजता येईल. पण तरीही त्या शब्दाचे समानार्थी शब्द ( ) कंसात लिहिलेले आहेत.

## संपादकिय

लौकिक जगात वडील-मुलगा, आई-मुलगा किंवा मुलगी, पती-पत्नी असे सर्व संबंध असतात. तसेच गुरू-शिष्य हा पण एक नाजूक संबंध आहे. गुरूंना समर्पित झाल्यानंतर संपूर्ण आयुष्य त्यांच्याशी प्रामाणिक राहून परम विनयापर्यंत पोहोचून, गुरूआज्ञेप्रमाणे साधना करून सिद्धी प्राप्त करायची असते. परंतु खऱ्या गुरूची लक्षणे तसेच खऱ्या शिष्याची लक्षणे कशी असतात याचे सुंदर विवेचन येथे प्रस्तुत झाले आहे.

जगात गुरूच्या बाबतीत विविध मान्यता प्रचलित आहेत आणि अशा काळात यथार्थ गुरू बनवताना लोक संभ्रमात पडतात. येथे प्रश्नकर्त्यांद्वारे असे पेचात टाकणारे प्रश्न 'ज्ञानी पुरुषांना' विचारले गेले आहेत आणि त्यांची समाधानकारक उत्तरे स्पष्टीकरणासह प्राप्त झाली आहेत.

ज्ञानी पुरुष' म्हणजे जगताच्या व्यावहारिक स्वरूपाचे तसेच वास्तविक विज्ञान स्वरुपाची ऑब्जरवेटरी! अशा ज्ञानी पुरुषाच्या श्रीमुखातून गुरूपद म्हणजे काय? अध्यात्मात गुरूची गरज आहे का? असेल तर ती किती? गुरूची लक्षणे कोणती असावीत? ते गुरूत्तम आहेत की लघुत्तम? गुरूकिल्ली सहीत आहेत का? गुरू लोभ, लालूच किंवा मोहामध्ये अडकले आहेत? लक्ष्मी, विषयविकार किंवा शिष्यांची भीक त्यांच्यात अजूनही आहे? गुरूची निवड कशी करावी? कोणास गुरू बनवावे? गुरू किती बनवावेत? एक गुरू निवडल्यानंतर दुसऱ्या गुरूची निवड करता येते का? गुरू नालायक निघाले तर काय करावे? अशा प्रकारे गुरूपदाच्या जोखीमांपासून, शिष्यपद म्हणजे काय? शिष्य कसे असले पाहिजेत? आणि शिष्यपदाच्या सूक्ष्म जागृतीपर्यंतची संपूर्ण समज तसेच गुरूच्या कोणत्या व्यवहाराने स्वत:चे व शिष्याचे हित होईल आणि शिष्याने स्वत:च्या हितासाठी कुठल्या दृष्टीसह गुरूजवळ राहिले पाहिजे, तसेच शिष्याने गुरूपद कुठे स्थापित करावे की ज्यामुळे त्याला ज्ञानाची प्राप्ती होऊन ज्ञान परिणमित होईल आणि गुरूमध्ये कोणकोणते दोष असू नयेत की ज्यामुळे असे दोषरहित गुरू स्वत:च्या शिष्याचे हित करण्यास समर्थ बनतील. एकलव्यासारखी गुरूभक्ती या कलियुगात कुठून सापडेल? ज्ञानी पुरुषाने गुरू केले आहेत की नाही?

त्यांनी शिष्य केले आहेत की नाही ? ज्ञानी पुरुष स्वत: कोणत्या पदी वर्तत आहेत, इत्यादी सर्वच प्रश्नांची संपूर्ण समाधान देणारी उत्तरे पूज्य दादाश्रींच्या श्रीमुखातून निघालेल्या वाणीद्वारे मिळतात!

सामान्य समजुतीप्रमाणे गुरू, सद्‌गुरू व ज्ञानी पुरुष या तिघांना एकसारखेच मानले जाते परंतु येथे त्या तिघांमधील भेदाचे तंतोतंत स्पष्टीकरण सापडते.

अध्यात्माचा मार्ग मार्गदर्शकाशिवाय कसा पार करता येईल? तो मार्गदर्शक अर्थात गाईड म्हणजेच...

*मोक्ष मार्गस्य नेत्तारम् भेत्तारम् सर्व कर्माणाम्*
*ज्ञातारम् सर्व तत्वानाम् तस्मै श्री सद्‌गुरू नम:*

एवढ्यातच मोक्षमार्गाचे नेता, गुरू कसे असावेत हे सर्व समजून येते.

गुरू आणि शिष्य दोघांनाही कल्याणाच्या मार्गावर प्रयाण करता येईल यासाठी सर्व दृष्टीकोनातून गुरू-शिष्याच्या अन्योन्य संबंधाची समज, लघुत्तम तरी सुद्धा अभेद, अशा उच्च पदावर विहार करणाऱ्या ज्ञानी पुरुषाच्या वाणीद्वारे प्रकाशमान झाली, ती येथे संकलित झाली आहे, जी मोक्षमार्गावर चालणाऱ्या पथिकांसाठी मार्गदर्शक (गुरू) ठरेल.

**- डॉ. नीरूबहन अमीन**

# अनुक्रमणिका

## गुरू-शिष्य

# गुरू-शिष्य

## गुरू म्हणजे गाईड

**प्रश्नकर्ता :** मी पुष्कळ ठिकाणी फिरलो आहे आणि सर्व ठिकाणी मी प्रश्न विचारले की गुरू म्हणजे काय? परंतु मला कुठेही समाधानकारक उत्तर मिळाले नाही.

**दादाश्री :** समजा, आपल्याला इथून स्टेशनवर जायचे असेल, तेव्हा चालता चालता गोंधळायला झाले आणि स्टेशनचा रस्ता सापडला नाही, आपण वाट चुकलो असू तेव्हा कोणाला तरी विचारण्याची गरज भासते का? कोणाची गरज भासते?

**प्रश्नकर्ता :** जाणकाराची.

**दादाश्री :** तो जाणकार म्हणजेच गुरू! जोपर्यंत रस्ता माहीत नसतो तोपर्यंत रस्त्यात कोणाला तरी विचारण्याची आवश्यकता वाटते, एखाद्या लहान मुलास सुद्धा विचारण्याची गरज भासते. म्हणजे ज्यांना-ज्यांना विचारावे लागते, त्यांना गुरू म्हणावे. गुरू असेल तरच मार्ग सापडतो. हे डोळे नसतील तर काय होईल? गुरू, हेच दुसरे डोळे आहेत! गुरू म्हणजे जो आपल्याला पुढच्या प्रगतीचा मार्ग दाखवितो.

## गुरूची गरज कोणाला?

**प्रश्नकर्ता :** आपले म्हणणे असे आहे का की गुरूची गरज आहे?

**दादाश्री :** असे आहे ना, जो स्वत:च रस्ता विसरला आहे, म्हणजे रस्ता त्याला माहीत नसेल, स्टेशनला जाण्याचा रस्ता माहीत नसेल तोपर्यंत कठीणच जाते. परंतु रस्त्याचा जाणकार-माहितगार कोणी भेटला तर आपण लगेच स्टेशनवर पोहचू ना?

**प्रश्नकर्ता :** हो, बरोबर आहे.

**दादाश्री :** म्हणजे जाणकाराची आवश्यकता आहे. रस्ता दाखवणारे असे म्हणत नाहीत की तुम्ही आम्हाला रस्ता विचारा! आपल्याला गरज आहे म्हणून आपण विचारतो ना? कोणाच्या गरजेपोटी विचारतो?

**प्रश्नकर्ता :** आपल्या गरजेपोटी.

**दादाश्री :** नाही तर विचारल्याशिवायच चालत राहा ना, विचारायचे नाही आणि तसेच चालत राहायचे, असा अनुभव करून तर बघा! तो अनुभवच तुम्हाला शिकवेल की गुरू करण्याची आवश्यकता आहे, मला शिकवावे लागणार नाही.

म्हणजे मार्ग आहे पण मार्ग दाखविणारा नाही ना! दाखविणारा असेल तरच काम होईल!

गुरू म्हणजे, कोणी दाखविणारा माहितगार, हवा की नको? जो गुरू आहे त्याचे आम्ही फॉलोअर्स (अनुयायी) म्हटले जातो. गुरू स्वतः पुढे चालत जातात आणि आम्हाला पुढचा रस्ता दाखवित जातात, त्यांना माहितगार म्हटले जाते.

एक माणूस सुरत स्टेशनवर जाण्यासाठी या बाजूस वळला. इथून या रस्त्याने चालला आणि तो रोड आला पण नंतर लगेच या दिशेच्या ऐवजी त्या दिशेने चालू लागला, मग तो तिथे सुरत शोधत बसला तर त्याला सुरत सापडेल का? कितीही शोधत राहिला तरी सापडणार नाही. रात्र संपली, दिवस उजाडला तरी सुद्धा सापडणार नाही! अशी आहे ही सर्व गुंतागुंत.

## चुकलेल्यास मार्गदर्शकाची साथ

**प्रश्नकर्ता :** कोणताही गुरू खरा मार्ग दाखवित नाही.

**दादाश्री :** पण त्या गुरूलाच मार्ग माहीत नसेल मग काय होणार! माहितगारच कोणी भेटला नाही. माहितगार भेटला असता तर ही अडचण आलीच नसती. माहितगार भेटला असता तर त्याने आम्हाला नक्कीच

स्टेशन दाखवले असते आणि म्हणाला असता की, 'हे स्टेशन आहे. तू आता या गाडीमध्ये बस.' सर्व काही दाखवून काम पूर्ण केले असते. हे तर तो सुद्धा भरकटलेला आणि आपण सुद्धा भरकटलेलो, म्हणून सतत भटकतच राहतो. तेव्हा आता खरा माहितगार शोधून काढा, तर तो स्टेशन दाखवेल. नाही तर अंदाजाने काहीही सांगून तुम्हाला भटकवतच ठेवेल. एक आंधळा दुसऱ्या आंधळ्याला घेऊन जाईल, तर तो कुठे घेऊन जाईल? आणि खरा माहितगार तर लगेच मार्ग दाखवेल. तो उधार-उसनवारवाला नसतो, तो तर रोखच असतो. अर्थात माहितगार भेटलाच नाही.तेव्हा आता माहितगार शोधा.

**प्रश्नकर्ता :** परंतु माहितगार, *उपरी* (वरिष्ठ, अधिकारी) असतो की नाही?

**दादाश्री :** माहितगार वरिष्ठ तर असतो, पण कुठपर्यंत? आपल्याला मूळ स्थानापर्यंत नेऊन पोहचवतो तोपर्यंत.

अर्थात शिरी *उपरी* तर पाहिजेच, मार्ग दाखविणारा पाहिजे, मार्गदर्शक पाहिजे, गाईड नेहमीच पाहिजे. सगळीकडेच गाईड तर हवाच. गाईडशिवाय कुठलेही काम होणार नाही. आपण इथून दिल्लीला जाऊ आणि गाईडला शोधू, मग त्याला काय म्हणतात? तर गुरू! त्याला गुरूच म्हणायचे. आपण पैसे देतो म्हणून तो गाईड बनतो. गुरू म्हणजेच जे आपल्याला मार्ग दाखवितात, गाईडसारखे.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे मार्गदर्शकाची गरज तर पडतेच!

**दादाश्री :** हो. मार्गदर्शन करतात त्यांना गुरू म्हटले जाते. मग तो मार्ग दाखविणारा कोणीही असो, तो गुरू म्हटला जातो.

## सर्व श्रेणी गुरू अवलंबित

**प्रश्नकर्ता :** गुरूने मार्ग दाखवला, मग त्या मार्गावर चालायचे. त्यानंतर गुरूची गरज आहे की मग गुरूस सोडून द्यावे?

**दादाश्री :** नाही, गुरूची गरज तर शेवटपर्यंत आहे.

**प्रश्नकर्ता :** नंतर कसली गरज?

**दादाश्री :** या गाडीला ब्रेक होता म्हणून टक्कर झाली नाही, तर काय हा ब्रेक काढून टाकायचा?

**प्रश्नकर्ता :** गुरुंनी मार्ग तर दाखवला, मग त्यांना धरुन ठेवण्याची काय गरज?

**दादाश्री :** रस्त्यात शेवटपर्यंत गुरूची गरज पडेल. गुरूस त्यांच्या गुरूंची गरज पडेल. शाळेत आपल्याला शिक्षकांची गरज केव्हा असते? आपल्याला शिकायचे असेल तरच ना? आणि शिकायचेच नसेल तर? म्हणजेच आपल्याला दुसरा कोणताच लाभ नको असेल तर गुरू नेमण्याची आवश्यकता नाही. जर लाभ हवा असेल तर गुरू करावेत. म्हणजे हे काही अनिवार्य नाही. हे सगळे तुमच्या इच्छेवर अवलंबून आहे. तुम्हाला शिकायचे असेल तर शिक्षक ठेवा. तुम्हाला अध्यात्म जाणून घ्यायचे असेल तर गुरू करावेत आणि जाणायचेच नसेल मग काही गरज नाही. असा काही नियम नाही की तुम्ही असेच करा. इथून जर स्टेशनवर जायचे असेल तरी गुरू लागतो, तर मग धर्मासाठी गुरू नको का? तात्पर्य गुरू आपल्याला प्रत्येक श्रेणीत लागतातच.

## गुरूशिवाय 'ज्ञान' नाही

कुठलेही ज्ञान गुरूशिवाय प्राप्त होणे शक्यच नाही. सांसारिक ज्ञान सुद्धा गुरूशिवाय प्राप्त होत नाही आणि आध्यात्मिक ज्ञान सुद्धा गुरूशिवाय प्राप्त होईल असे नाही. गुरूशिवाय ज्ञानाची आशा बाळगणे ही साफ चुकीची गोष्ट आहे.

**प्रश्नकर्ता :** एक व्यक्ती म्हणते की 'ज्ञान घ्यायचेही नसते, आणि ज्ञान द्यायचेही नसते, ज्ञान होऊन जाते.' तर ते आम्हाला समजवा.

**दादाश्री :** हा मूर्च्छित लोकांचा शोध आहे. मूर्च्छित लोक असतात ना, त्यांचा हा शोध आहे की, 'ज्ञान घ्यायचे नसते, द्यायचे नसते, ज्ञान आपोआप होत असते.' पण त्यांची ही मूर्च्छा कधीही जात नाही. कारण लहानपणापासून तो जे काही शिकला ते सुद्धा ज्ञान घेत घेतच आला आहे,

शिक्षकांनी तुला (ज्ञान) दिले आणि तू ते घेतलेस. मग ते ज्ञान तू दुसऱ्यांना दिलेस. देणेघेणे हा जगाचा स्वभावच आहे. शिक्षकांनी तुम्हाला ज्ञान दिले नव्हते का? नंतर तुम्ही ते ज्ञान दुसऱ्यांना दिले. असा हा देण्या-घेण्याचा स्वभाव आहे.

**प्रश्नकर्ता :** पण स्वत:स आपोआप ज्ञान होते की नाही?

**दादाश्री :** कुणा एखाद्यालाच आपोआप ज्ञान होते पण ते अपवाद स्वरुपात होते आणि तेही या जन्मात जरी गुरू मिळाले नसतील परंतु पूर्वजन्मात तर गुरू नक्कीच भेटलेले असतात. म्हणजे हे सर्व निमित्ताच्या अधीन असते. आमच्यासारखे कुणी निमित्त भेटले तर तुमचे काम होऊन जाते. तोपर्यंत तुम्हाला डेव्हलप (प्रगत) व्हावे लागते आणि मग 'ज्ञानी पुरुषाचे' निमित्त मिळाले तर त्या निमित्ताच्या अधीन सर्व प्रकट होते.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे मनुष्य स्वयं कधीच प्राप्त करू शकत नाही!

**दादाश्री :** स्वयं काहीच प्राप्त होत नाही. या दुनियेत कोणालाही प्राप्त झालेले नाही. अनुभूती जर आपण स्वत:च करायची असेल तर मग शाळांची गरजच नाही ना! कॉलेजांचीही गरज नाही!

## स्वयंबुद्ध सुद्धा सापेक्ष

**प्रश्नकर्ता :** हे तीर्थंकर तर स्वयंबुद्ध म्हटले जातात ना?

**दादाश्री :** हो. सर्व तीर्थंकर स्वयंबुद्ध असतात पण मागच्या जन्मात गुरूंद्वारे त्यांचे तीर्थंकर गोत्र बांधले गेलेले असते. म्हणून या अपेक्षेने त्यांना स्वयंबुध्द म्हणतात आणि या अवतारामध्ये त्यांना गुरू मिळाले नाहीत म्हणून त्यांना स्वयंबुद्ध म्हणतात. ही सापेक्ष वस्तू आहे. आणि आज जे स्वयंबुद्ध झाले आहेत ते सर्व मागील जन्मात कोणाला तरी (मार्ग) विचारत-विचारत आले आहेत. म्हणजे हे जग विचारुन-विचारुन चालत राहते. आपोआप तर कोणी एखाद्यास, स्वयंबुद्धासच होते, म्हणजे तो अपवाद आहे. अन्यथा गुरूशिवाय ज्ञानच नाही.

**प्रश्नकर्ता :** असे म्हणतात की ऋषभदेव भगवंतांनी स्वत:ची बंधने स्वत:च तोडली. याचा अर्थ त्यांना दुसऱ्या कोणाची गरज भासली नाही ना?

**दादाश्री :** परंतु त्यांनी मदत घेतली होती, त्यांनी दोन-तीन जन्मांपूर्वी गुरूंची मदत घेतली होती. मदत घेतल्याशिवाय कोणीही मुक्त झालेला नाही. यात सुद्धा निमित्त तर होतेच. हे तर ऋषभदेवांच्या जन्मात लोकांनी असे पाहिले की त्यांनी स्वत:ची बंधने स्वत:च तोडली. परंतु स्वत:च स्वत:चे करू शकेल असे घडत नाही, कोणाकडून असे कधी घडलेही नाही आणि घडणारही नाही. अर्थात निमित्त असावेच लागते, नेहमीच.

**प्रश्नकर्ता :** महावीर स्वामींचे गुरू कोण होते?

**दादाश्री :** पूर्वी महावीर स्वामींचेही बरेच गुरू झाले होते. परंतु शेवटच्या दोन-तीन जन्मात कोणी गुरू नव्हते. तेव्हा हा काही असेच लाडू खाण्याचा खेळ आहे का? तीर्थंकरांना शेवटच्या अवतारात गुरूंची गरज भासत नाही.

## गुरूची गरज कुठपर्यंत?

**प्रश्नकर्ता :** एकलव्याने गुरू नसताना सुद्धा सिद्धी प्राप्त केली होती, तर काय हे शक्य नाही?

**दादाश्री :** एकलव्याने जी सिद्धी प्राप्त केली ती एक्सेपशनल आहे, अपवाद आहे. तो नेहमीचा नियम नाही. प्रत्येक नियमाचे अपवाद असू शकतात. शेकडा दोन-पाच टक्के असे सुद्धा घडू शकते. पण म्हणून आपण असे मानू नये की हाच नियम आहे. या जन्मात जरी गुरू नसतील पण या पूर्वीच्या जन्मात गुरू भेटलेलेच असतात!

**प्रश्नकर्ता :** एकलव्याला गुरू द्रोणांनी शिकवले नाही आणि तो गुरूंच्या मूर्तीजवळ बसून शिकला!

**दादाश्री :** ते सर्व त्याने मागील जन्मात शिकलेले होते. मूर्ती तर आत्ता निमित्त बनली. गुरू तर प्रत्येक जन्मात पाहिजेच.

**प्रश्नकर्ता :** मग आपण असे म्हणू शकतो की 'मागील जन्मात माझे जे गुरू होते तेच आता माझे सर्व करतील.' मग या जन्मात गुरू करण्याची आवश्यकता आहे का?

**दादाश्री :** पण कदाचित या जन्मात ते गुरू भेटणारही नाहीत व तशी गरज सुद्धा नसेल आणि नंतर पुढच्या जन्मी परत ते भेटूही शकतात.

पण असे आहे की, आता यापुढे तर बराच मार्ग चालायचा बाकी आहे, तेव्हा अजून तर अनेक गुरू करावे लागतील. जोपर्यंत मोक्ष मिळत नाही तोपर्यंत गुरूंची गरज भासेल. यथार्थ समकीत झाल्यानंतर गुरूची गरज उरत नाही. ही काही नुसती थाप नाही. गुरूशिवाय तर चालणारच नाही.

## 'गुरू अनावश्यक,' ही चुकीची गोष्ट

**प्रश्नकर्ता :** कित्येक संत असे म्हणतात की गुरू करण्याची आवश्यकता नाही.

**दादाश्री :** 'गुरूची आवश्यकता नाही' असे म्हणणारे त्यांची स्वत:ची गोष्ट करतात. लोक ही गोष्ट स्वीकारणार नाहीत. संपूर्ण जग गुरूचा स्वीकार करतो. गुरू वाईट असेल असे कधीतरी घडते. पण म्हणून 'गुरू' शब्दच काढून टाकणे, असे तर चालणारच नाही ना!

**प्रश्नकर्ता :** पुष्कळ लोक गुरू करतच नाहीत.

**दादाश्री :** गुरू करत नाहीत असे कधी घडतच नाही. काही लोकांनी 'गुरू करू नका' असा उपदेश दिला, तेव्हापासूनच हिंदुस्तानात असे झाले आहे. नाही तर हिंदुस्तान देशाने तर आधीपासूनच गुरूला मान्य केले आहे की कोणी का असेना पण एक गुरू तरी करावा.

## चुकीचे शिकवले, तोही गुरूच

**प्रश्नकर्ता :** गुरू असतील किंवा नसतील, या दोन्हींमध्ये काय फरक आहे?

**दादाश्री :** गुरू नसतील तर रस्त्याने चालता-चालता समोर सात रस्ते आले तर तुम्ही कोणत्या रस्त्याने जाल?

**प्रश्नकर्ता :** ते मग मन ठरवेल, तोच रस्ता पकडू.

**दादाश्री :** नाही, मन तर भटकण्याचा रस्ता शोधून काढेल. तो काही खरा रस्ता नाही. म्हणूनच विचारावे लागेल, गुरू नेमावे लागतील. गुरू नेमून त्यांना विचारावे लागेल की मी कोणत्या रस्त्याने जाऊ! म्हणजेच, गुरूशिवाय तर या दुनियेत, एवढे सुद्धा, इथून तिथपर्यंतही चालता येणार नाही.

शाळेत शिक्षक ठेवावे लागले होते की नाही?

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** जिथे जाल तिथे शिक्षक पाहिजेतच. शिक्षकाची गरज कुठे पडली नाही ते मला सांगा?

मग कॉलेजमध्ये प्रोफेसर हवेत की नकोत?

**प्रश्नकर्ता :** हवेत.

**दादाश्री :** अर्थात, मनुष्यरूपात जन्म घेतला तेव्हापासून त्याच्या माथी गुरू हवा. शाळेत गेल्यावर सुद्धा गुरू हवा, कॉलेजात गेला तरी गुरू लागले. तिथे परत वेगवेगळे गुरू, मॅट्रिकमध्ये शिकत असेल तर त्याला मॅट्रिकचे गुरू पाहिजे, फर्स्ट स्टॅंडर्डचे गुरू तिथे उपयोगी पडणार नाही. म्हणजे गुरू सुद्धा वेगवेगळे असतात. प्रत्येकासाठी एकाच प्रकारचे गुरू नसतात. 'कुठे शिकत आहात' त्यावर अवलंबून आहे.

मग पुस्तक वाचता तेव्हा पुस्तक हा तुमचा गुरू नाही का? पुस्तक जर गुरू असेल तरच वाचणार ना? पुस्तक काही शिकवत असेल, काही लाभ होत असेल तरच वाचाल ना?

**प्रश्नकर्ता :** हो. बरोबर!

**दादाश्री :** पुस्तकांतून शिकता, त्या पुस्तकांमुळेच तुम्हाला लाभ झाला. एखाद्या पुस्तकाने तुम्हाला मार्गदर्शन केले तर त्यास गुरू म्हणतात. म्हणजे पुस्तक देखील तुमचा गुरू आहे.

शिक्षकांपासून, पुस्तकातून, मनुष्यांपासून तुम्ही शिकत आहात तर त्यांना गुरूच म्हटले जाईल. अर्थात सारे जग गुरूच आहे ना!

**प्रश्नकर्ता :** आजचे मनोविज्ञान असे सांगते की व्यक्तीने बाहेरचा आधार सोडून, स्वत:च्या आधारे जगावे. बाहेरचा आधार, मग तो कुठलाही असो परंतु जिज्ञासू तो आधार घेऊन पंगु बनतो.

**दादाश्री :** बाहेरचा आधार घेऊन पंगु बनू, असे होऊ नये. बाहेरचा आधार सोडून स्वत:च्या आधारावरच राहावे. परंतु जोपर्यंत स्वत:चा आधार नसेल तोपर्यंत बाहेरचा नैमित्तिक आधार घ्यावा. नैमित्तिक! एखादे पुस्तक निमित्त बनते की नाही बनत? सर्व काही निमित्तरूप नाही का होत? म्हणून आजचे मनोविज्ञान जे आधार सोडण्यास सांगते, त्याप्रमाणे काही मर्यादेपर्यंत तो आधार सोडावा परंतु काही ठराविक मर्यादेपर्यंत आधार घ्यावा लागतो, पुस्तकांचा आधार घ्यावा लागतो. दुसरा आधार घ्यावा लागतो, तिसरा आधार सुद्धा घ्यावा लागतो.

एक साहेब म्हणतात की 'गुरू असता कामा नये' मी म्हटले, 'कोणाचे गुरू नव्हते? ते मला सांगा. मातेने जे संस्कार दिले, ती गुरूच आहे ना?' 'असे कर हं बेटा, हे बघ, येथे बघ'. मग ती माता गुरू नाही तर कोण आहे?

**प्रश्नकर्ता :** बरोबर आहे.

**दादाश्री :** म्हणून आई ही प्रथम गुरू बनते की, 'बेटा, ही चड्डी घाल, हे असे कर, तसे कर,' म्हणजे हे सुद्धा बाळाला शिकावे लागते. आई शिकवते. चालणे शिकवते, दुसरे सर्व शिकवते, कोणत्या जन्मात चालला नव्हता? अनंत जन्मात चाललाच आहे, पण पुन्हा तेच तेच शिकायचे.

घरात बायको नसेल, तुम्ही एकटेच असाल आणि कढी बनवायची असेल, तेव्हा सुद्धा कोणाला तरी विचारावे लागेल ना की कढीत काय काय टाकू? ज्यांना-ज्यांना विचारले त्या सगळ्यांना गुरू म्हणतात. अर्थात गुरूची तर जिकडे-तिकडे, पावलोपावली गरज पडतेच. प्रत्येक कामासाठी गुरू तर पाहिजेच. आता जर कोर्टाचे काम निघाले तर या वकीलासच गुरू बनवले, तरच तुमचे काम होईल ना? म्हणून जिकडे-तिकडे, जिथे जाल तिथे गुरूची आवश्यकता भासेल. प्रत्येक गोष्टीत गुरूची आवश्यकता आहे.

**प्रश्नकर्ता :** याचा अर्थ शेवटपर्यंत जायचे असेल तरी सुद्धा गुरू पाहिजे.

**दादाश्री :** जिथे जायचे असेल तिथे गुरू पाहिजे. आपण इथून गाडी घेऊन जात असू आपल्याला हायवेच्या रस्त्याने जायचे असेल, तेव्हा कुणाला तरी विचारले तर तो बरोबर घेऊन जाईल, नाही तर चुकीच्या रस्त्याने पुढे जाऊ. म्हणजे संसारातही गुरूची आवश्यकता आहे आणि निश्चयात सुद्धा गुरूची आवश्यकता आहे. तर आता 'गुरू म्हणजे काय? गुरू कोणास म्हणतात' हे समजून घेणे गरजेचे आहे.

## ज्यांच्यापासून शिकतो, ते सुद्धा गुरू

**प्रश्नकर्ता :** तर धर्माच्या बाबतीत एकच गुरू करावा की सर्व ठिकाणी गुरू करावेत?

**दादाश्री :** असे आहे की, शिष्यभाव सर्व ठिकाणी ठेवावा. खरोखर तर साऱ्या जगास गुरू बनवावे. झाडाकडून सुद्धा शिकवण मिळते. या आंब्याच्या झाडाचे आपण काय करतो? आंबे खाण्यासाठी त्यास झोपटतो. तरी सुद्धा ते फळ देते, मार खाऊन सुद्धा फळ देते! हा त्याचा गुण जर आपल्यात आला तर किती चांगले काम होईल! झाडात सुद्धा जीवच आहे ना! ते काही लाकूड थोडेच आहे?

**प्रश्नकर्ता :** दत्तात्रेयांनी काही प्राण्यांना आपले गुरू बनवले होते, ते कोणत्या अर्थाने?

**दादाश्री :** फक्त दत्तात्रेयांनीच नाही, तर सगळेच बनवतात. प्रत्येक माणूस प्राण्यांना गुरू बनवतो पण लोक प्राण्यांना गुरू म्हणत नाही आणि दत्तात्रेयांनी प्राण्यांना गुरू म्हटले! प्राण्यांना कोणी मारले तर ते पळून जातात, तसेच लोकही शिकले की आपल्याला कोणी मारले तर पळून गेले पाहिजे, लोक पळून जाण्याचे प्राण्यांकडून शिकले आहेत.

आणि फक्त त्या प्राण्यांनाच गुरू मानून निकाल होत नाही, जगातील प्रत्येक जीवाला गुरू बनवा, तरच सुटका होईल. जगातील सर्व जीवांना गुरू कराल, ज्यांच्यापासून जे काही जाणता येईल त्याचा स्वीकार कराल

तर मुक्ती आहे. प्रत्येक जीवात भगवंत विराजमान आहेत, म्हणून त्या सर्वांपासून आम्ही काही संपादन करू तरच मुक्ती आहे.

तुम्हाला गुरूच्या बाबतीत समजले ना?

**प्रश्नकर्ता :** हो. समजले.

**दादाश्री :** तुम्हाला येणारे अनुभव हे सुद्धा तुमचे गुरू आहेत. जेवढा अनुभव घेतला तो तुम्हाला उपदेश देईल आणि जर अनुभव उपदेशाचे कारण बनत नसेल, तर तो अनुभवच नाही. म्हणजे हे सर्व गुरूच आहेत.

अरे, एक मनुष्य लंगडत होता आणि दुसरा मनुष्य त्याची मस्करी करून त्याला हसला. नंतर थोड्यावेळाने तो (दुसरा मनुष्य) मला भेटला. त्याने मला सांगितले की आज तर मी एका माणसाची मस्करी करून हसलो. तेव्हा मी सावध झालो की अरे, तू आत्मा बघतोस की दुसरे काही बघतोस? मला हे ज्ञान झाले आणि मी खरोखर सावध झालो.

अर्थात प्रत्येक वस्तू उपदेश देत असते. प्रत्येक अनुभव नेहमी उपदेश देऊनच जातो. कधीतरी आरामात बसलेलो असू? आणि तेव्हा जर कोणी आपला खिसा कापला तर तो उपदेश आपल्याकडे शिल्लकच राहतो.

या कुत्र्याकडूनही काही जाणता आले तर जाणून घेतले पाहिजे, म्हणजे या कुत्र्यांना सुद्धा गुरू म्हणतात. हा कुत्रा दीड तासापासून येथे बसलेला असेल, पण जर त्याला भरपूर खायला घातले तरी तो जितके खाता येईल तेवढेच खातो आणि बाकीचे सर्व तसेच सोडून निघून जातो. तो काही सोबत घेऊन जात नाही की, 'चला, मी इतके घेऊन जातो.' म्हणजे कुत्र्यापासून पण आपल्याला शिकवण मिळते. अर्थात अशी प्रत्येक वस्तू की ज्यापासून आपल्याला शिकवण मिळते त्या सर्वांना आपण गुरू मानावे. कुत्र्यास काही गुरू व्हायचे नाही. परंतु त्याला जर आपण गुरू मानले तर त्याचा उपदेश आपल्यात उतरेल. हीच खरी पद्धत आहे!

ठेच लागते त्यास सुद्धा गुरू म्हणता येईल. गुरूशिवाय व्यक्ती पुढे

जाईलच कसा? रस्त्याने चालताना आपल्याला ठेच लागली तर त्या ठेचेलाही असे वाटते की, 'तू खाली बघून चाललास तर काय वाईट आहे?' अर्थात सर्वच गुरू, जिकडे-तिकडे मला सगळेच गुरू वाटलेले. जिथून लाभ झाला त्यास गुरू मानावे. ठेचेपासून लाभ झाला तर आपण ठेचेला गुरू मानावे. मी तर आशा तऱ्हेने लाभ प्राप्त केले आहेत सगळे.

बाकी गुरूवर चिडता कामा नये. गुरूवर चिडल्यामुळे तर आज ज्ञान अडकून राहिले आहे!!

## गुरू-विरोधी, पूर्वग्रहाने ग्रासित

म्हणजे गुरू केल्याशिवाय चालेल असे नाही. 'गुरूशिवाय चालेल' असे म्हणणारे विरोधाभासात आहेत. या दुनियेत गुरू केल्याशिवाय कधीही काहीही चालत नाही. मग ती टेक्निकल बाब असो किंवा इतर कोणतीही बाब असो. तेव्हा 'गुरूची आवश्यकता नाही' हे वाक्य लिहिण्यासारखे नाही. लोकांनी मला विचारले की 'बरेच लोक गुरूच्या बाबतीत असे का म्हणतात?' मी म्हटले ते जाणून-बुजून बोलत नाहीत, दोषपूर्वक बोलत नाहीत, गुरूविषयी त्यांची जी चीड आहे, ती पूर्वजन्मातची चीड आहे आणि तीच आज जाहीर करत आहेत.

**प्रश्नकर्ता :** गुरूविषयीची चीड निर्माण का झाली असावी?

**दादाश्री :** हे जे लोक असे म्हणतात की 'गुरूची आवश्यकता नाही' ही कशासारखी गोष्ट आहे? एकदा लहानपणी मी खीर खात होतो आणि मला उलटी झाली. आता उलटी दुसऱ्याच कारणांमुळे झाली होती, खीरीमुळे नाही. पण मला खीरीविषयी चीड निर्माण झाली, इतकी चीड की कधी खीर पाहिली की मला भीतीच वाटायची. म्हणून जेव्हा माझ्या घरी खीर बनवत तेव्हा मी आईला म्हणायचो की, 'मला हे गोड खायला आवडत नाही, तेव्हा मला दुसरे काय देशील? मग आई म्हणायची, 'बेटा, ही बाजरीची भाकरी आहे. आणि भाकरीबरोबर तूप-गूळ खाशील तर देते.' त्यावर मी म्हणत असे की, 'नाही, मला तूप-गूळ नको.' मग मला मध दिल्यावरच मी खात असे, पण खिरीला तर मी शिवतच नसे. मग आईने मला समजावले की, 'मुला, सासरी जाशील तेव्हा ते लोक म्हणतील

की याच्या आईने काय याला कधी खीर खायला दिलीच नाही? मग समजा, तिथे तुला खीर वाढली आणि ती तू नाही खाल्लीस तर ते किती वाईट दिसेल. म्हणून तू थोडी-थोडी खायला सुरुवात कर. अशा तऱ्हेने ती माझी समजूत काढायची. पण त्याचा काहीच परिणाम झाला नाही. म्हणजे खीरीविषयी जी चीड बसली ती बसलीच. तशीच त्यांना गुरूच्या बाबतीत चीड निर्माण झाली.

**प्रश्नकर्ता :** परंतु गुरूसाठी अशी चीड का निर्माण झाली?

**दादाश्री :** ते तर मागच्या जन्मी गुरूंशी काही तरी भानगड झाली असेल, त्यामुळे आज त्यांच्याप्रति चीड निर्माण होते. प्रत्येक बाबतीची चीड निर्माण होते ना! कित्येकांना गुरूविषयी नाही पण भगवंतावर चीड उत्पन्न होते. म्हणजे अशा प्रकारे ते गुरू करण्यासाठी नकार देतात, जसे की ती उलटी दुसऱ्याच कारणांमुळे झाली होती पण खिरीवरच चीड उत्पन्न झाली, त्याप्रमाणे.

म्हणजे 'गुरूशिवाय चालते' असे म्हणणारे संपूर्ण जगाचे विरोधी आहेत. कारण ते स्वत:ची चूक दुसऱ्यांवर ढकलून देतात. तुम्हाला कशी वाटते ही गोष्ट?

**प्रश्नकर्ता :** बरोबर आहे.

**दादाश्री :** एखाद्या गुरूबरोबर काही भानगड झाली असेल म्हणून मनात ठाम बसते की गुरू करूच नये. आता तुम्ही जर गुरूकडून दुखावले गेले असाल तर तुम्ही गुरू करू नका पण स्वत:चा अनुभव दुसऱ्यांवर लादू नका. एखाद्या गुरुंचा मला वाईट अनुभव आला असेल म्हणून मी असे सांगू शकत नाही की सगळ्यांनीच गुरू करु नये. स्वत:चा पूर्वग्रह स्वत:जवळच ठेवला पाहिजे. लोकांना ती गोष्ट सांगू नये. लोकांना उपदेश देऊ नये की असे करू नका. कारण गुरूशिवाय जगाचे चालणारच नाही. कुठल्या वाटेने जायचे हे सुद्धा विचारावे लागते की नाही?

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** या दुनियेत कोणी माणूस असा निघाला नाही की जो गुरूच्या विरुद्ध असेल. 'गुरू नको' हे शब्द सुद्धा कोणत्याही मनुष्याने बोलता कामा नये. अर्थात गुरू नको, या सगळ्या विरोधाभास असलेल्या गोष्टी आहेत. कोणी असे म्हटले की, 'गुरूची आवश्यकता नाही' तर ती एक दृष्टी आहे, त्याचा दृष्टीराग आहे हा.

म्हणजे एवढी गोष्ट समजण्याची गरज आहे की या जगात गुरूची आवश्यकता तर आहेच. गुरूवर चिडून चालणार नाही. गुरू या शब्दाने लोक अतिशय भडकले आहेत! आता यात मुख्य तत्त्वाचा आणि या गोष्टीचा काय संबंध?

## गुरूची गरज तर शेवटपर्यंत

हे तर 'गुरूची गरज नाही' असे म्हणून आपला 'व्ह्यू पॉईंट' (दृष्टिकोन) ठेवला आहे. बाकी काही नाही. एखादा अनुभव असा आला असेल की सगळ्या ठिकाणी फिरल्यानंतर, असे करता, करता, करता स्वत:ला आतूनच समाधान मिळू लागले, या श्रेणीत आलेत! म्हणून मग मनाला असे वाटू लागले की गुरू करणे, हे व्यर्थ ओझे आहे.

**प्रश्नकर्ता :** 'गुरूची गरज नाही' असे म्हणतात, पण ते एका ठराविक स्टेजला पोहोचल्यानंतर गुरू कामी येत नाहीत. त्यानंतर मग तुमच्या स्वत:वरच आधारीत असते.

**दादाश्री :** ते तर कबीरांनी सुद्धा सांगितले आहे की:

*'कबीर हदका गुरू है, बेहदका गुरू नहीं!'*

म्हणजे गुरूची गरज शेवटपर्यंत पडेल. 'बेहद' येईपर्यंत तर दमछाक होते.

**प्रश्नकर्ता :** सांसारिक कामात गुरूची गरज आहे, व्यावहारिक ज्ञानात गुरूची गरज आहे. परंतु स्वत:ला, म्हणजे आपण जसे आहोत तसे पाहाण्यासाठी गुरूची गरज नाही, असेच ना?

**दादाश्री :** संसारात सुद्धा गुरू पाहिजे आणि मोक्षमार्गात सुद्धा गुरू

पाहिजे. क्वचितच कोणी असे बोलेल की 'गुरूची गरज नाही.' गुरूशिवाय तर चालणारच नाही. गुरू म्हणजे तर प्रकाश म्हटला जातो. शेवटपर्यंत गुरू पाहिजेत. श्रीमद् राजचंद्रानी म्हटले आहे की बाराव्या गुणस्थानकापर्यंत गुरूची गरज पडेल, बारावे गुणस्थानक म्हणजे भगवंत होण्यापर्यंत गुरूची गरज पडेल.

**प्रश्नकर्ता :** गुरूंचा विरोध करण्यासाठी मी हा प्रश्न केला नाही. पण मला हे समजून घ्यायचे आहे.

**दादाश्री :** हो, पण गुरूची खास गरज आहे या दुनियेत. अजूनही माझे सुद्धा गुरू आहेतच ना! मी संपूर्ण जगाचा शिष्य होऊन बसलो आहे. म्हणजे माझे गुरू कोण? तर लोक! अर्थात गुरूची गरज तर शेवटपर्यंत आहे.

जी गोष्ट सत्य आहे, तिला सत्य म्हणायला काय हरकत आहे! 'ज्ञानी पुरुष' तर, चुकीचे असेल तर लगेचच त्यास चुकीचे आहे असे सांगतात. मग तो राजा असो किंवा दुसऱ्या कोणीही असो! तुम्हाला ते मान्य नसेल तरीही माझी हरकत नाही पण मी हे चालू देणार नाही. मी तर साऱ्या जगाला सत्य सांगण्यासाठी आलो आहे. कारण आत्तापर्यंत पोलम्पोल चालली आहे, म्हणून तर हिंदुस्तानची ही दैनावस्था झाली आहे, पाहा तरी!

आम्ही गोष्टी गोल फिरवून बोलू शकत नाही. आता लोक काय शोधत असतात? तर पोकळ (काहीही) बोलून सुद्धा शांत राहायचे. पोकळ बोलूनही येथे गोंधळ उडाला नाही म्हणजे झाले! परंतु आमच्याकडून तसा एकही शब्द बोलला जाणार नाही. नाही तर आम्हाला तसेही बोलता येत होते पण नाही बोलू शकत. आम्हाला तर 'आहे त्याला आहे' सांगावे लागते व 'नाही त्याला नाही' सांगावे लागते. 'नाही त्याला आहे' असे म्हणू शकत नाही व 'आहे त्याला नाही' असेही म्हणू शकत नाही.

गुरू स्वत:च म्हणतात की 'गुरू करू नका,' मग तुम्ही कोण आहात या जागी? तसेच इकडे म्हणता, 'निमित्ताची गरज नाही' तेव्हा तुम्ही कोण आहात आता?

## निमित्तच महा उपकारी

**प्रश्नकर्ता :** हो, उपादान तयार असेल तर निमित्त आपोआपच मिळते, ही गोष्ट प्रचलित आहे.

**दादाश्री :** उपादान तर आपल्या येथे पुष्कळ लोकांचे फार उच्च कोटीचे आहे परंतु त्यांना निमित्त मिळाले नाही म्हणून ते भटकत राहिले. तेव्हा हे वाक्यच चुकीचे आहे की, 'उपादान तयार असेल तर निमित्त आपोआप मिळते.' हे वाक्य बोलण्यात भयंकर जोखीम आहे, 'ज्ञानाची विराधना करायची असेल तरच असे वाक्य बोलावे!

**प्रश्नकर्ता :** निमित्त आणि उपादान याविषयी आणखी सविस्तर समजवा. उपादान तयार असेल तर निमित्त आपोआप मिळते. आणि जर निमित्त मिळत राहतील परंतु उपादान तयार नसेल, मग अशा परिस्थितीत निमित्त काय करेल?

**दादाश्री :** या ज्या लिहिलेल्या गोष्टी आहेत ना, त्या सर्व करेक्ट (बरोबर) नाहीत. करेक्ट असेल तर एकच वस्तू करेक्ट आहे की निमित्ताचीही गरज आहे आणि उपादानाचीही गरज आहे. परंतु उपादान जरी कमी असेल पण जर त्याला निमित्त मिळाले तर त्याचे उपादान वाढते.

निमित्तच उपकारी आहे. या शाळा बंद केल्या तर? असे मानले की 'मुले हुशार असतील, उपादान तयार असेल, तेव्हा निमित्त येऊन मिळेल' असे समजून शाळा वगैरे बंद केल्या तर चालेल?

**प्रश्नकर्ता :** तसे तर चालणार नाही. पण ही तर व्यवहाराची गोष्ट झाली.

**दादाश्री :** नाही, व्यवहारात सुद्धा तीच गोष्ट आणि यात सुद्धा तीच गोष्ट! यात सुद्धा निमित्ताची मुख्य गरज आहे.

जर शाळा बंद केल्या, पुस्तके काढून टाकली, तर कोणताही मनुष्य काही शिकणार नाही, लिहिणार नाही. निमित्त असेल तर आपले काम होईल, नाही तर काम होणार नाही. तर निमित्तामध्ये काय काय आहे?

पुस्तके निमित्त आहेत, मंदिरे निमित्त आहेत, जिनालय निमित्त आहेत. ज्ञानी पुरुष निमित्त आहेत. आता ही सर्व पुस्तके, मंदिरे नसतील तर या उपादानाचे काय होईल? म्हणजे निमित्त असेल तरच काम होईल. अन्यथा काम होणार नाही.

चोवीस तीर्थंकरांनी पुन्हा पुन्हा हेच सांगितले की, 'निमित्तास भजा. उपादान जरी कमी असेल तरी पण निमित्त मिळाल्यावर त्याचे उपादान जागृत होईल.' पण तरी उपादानाबद्दल सांगतात ते यासाठीच की तुला निमित्त मिळाल्यानंतर सुद्धा तू जर उपादान अजागृत ठेवलेस, उपादान जागृत ठेवले नाहीस आणि डुलकी घेतलीस तर तुझे काम होणार नाही, व तुला मिळालेले निमित्त व्यर्थ जाईल. म्हणून सावध रहा, असे त्यांचे म्हणणे आहे.

उपादान म्हणजे काय? तर तयार ठेवणे, तूप तयार ठेवणे, वात तयार ठेवणे, हे सर्व तयार ठेवणे. लोकांनी तर हे सर्व अनंत जन्मांपासून तयारच ठेवले आहे पण फक्त दिवा प्रज्वलित करणारा कोणी भेटला नाही. तूप, वात सर्व काही तयार आहे पण प्रज्वलित करणारा हवा! अर्थात मोक्ष प्राप्तीसाठी निमित्त होतील अशी शास्त्रे मिळाली नाहीत, आणि मोक्षप्राप्ती करवून देणारे निमित्त असे ज्ञानी पुरुषही भेटले नाहीत. ही सगळी साधने उपलब्ध होत नाहीत. निमित्त भेटत नाही म्हणून तर सतत भटकत राहतात.

लोक निमित्ताला अशा प्रकारे समजले आहेत की, 'उपादान तयार असेल तेव्हा तुला निमित्त आपोआप मिळेल.' परंतु आपोआप मिळेल याचा अर्थ असा होत नाही. भावना तर असलीच पाहिजे. भावनेशिवाय तर निमित्त देखील भेटत नाही.

म्हणजे या गोष्टीचा दुरुपयोग झाला आहे. निमित्त असे सांगतात की निमित्ताची गरज नाही! स्वत: निमित्त असून सुद्धा असे बोलतात.

**प्रश्नकर्ता :** हो, असे श्रीमद् राजचंद्र सुद्धा सांगतात.

**दादाश्री :** फक्त श्रीमद् राजचंद्रच नाही, तीर्थंकरांनी सुद्धा हेच

सांगितले आहे की निमित्ताशिवाय कुठलेही काम होणार नाही. म्हणून 'उपादान असेल तर निमित्त येऊन मिळेल, निमित्ताची गरज नाही' ही तीर्थंकरांची गोष्ट नाही किंवा श्रीमद् राजचंद्राचीही गोष्ट नाही. असे विधान जे करतात त्यांची जबाबदारी आहे. यात दुसऱ्या कोणाचीही जबाबदारी नाही.

कृपाळुदेवांनी एक गोष्ट सांगितली आहे की, 'दुसऱ्या कोणाचा शोध घेऊ नकोस, केवळ एका सत्पुरुषास शोधून त्यांच्या चरणकमळावर सर्व भाव अर्पण करून वर्तत जा. तरी सुद्धा जर मोक्ष मिळाला नाही तर माझ्याकडून घेऊन जा.' नाही तर असेच लिहिले असते ना की तू आपला घरी झोपून रहा, आणि उपादान जागृत करत रहा, तर तुला निमित्त येऊन मिळेल.

## ती गोष्ट खरी, पण निश्चयात

**प्रश्नकर्ता :** दुसरी एक अशी पण मान्यता आहे की 'निमित्ताची आवश्यकता आहे यास तर स्वीकृती आहे पण निमित्त काहीच करू शकत नाही ना!

**दादाश्री :** निमित्त काहीच करू शकत नाही असे जर कधी झाले ना, तर मग काही शोधायचे राहिलेच नाही ना! पुस्तक वाचण्याचीही काय गरज आहे? मंदिरात जाण्याची काय गरज? कोणी बुद्धीमान व्यक्तीने विचारले की, 'साहेब, मग तुम्ही येथे कशासाठी बसला आहात? आम्हाला तुमचे काय काम आहे? ही पुस्तके कशासाठी छापली आहेत? मंदिर कशासाठी बांधले आहे? कारण निमित्त तर काहीच करू शकत नाही ना!' असे म्हणणाराही कोणी निघेल की नाही?

आंधळा मनुष्य जर असे म्हणेल की, 'मी माझे डोळे बनवीन आणि मी पाहीन, तरच खरे.' तेव्हा आपण हसू की नाही? अशा या सर्व गोष्टी करतात. शाळेत एक शिक्षक आहेत, त्यांना मुलांची गरज आहेच पण मग मुलांना शिक्षकांची गरज नाही (!) काय हा वेडेपणा चालला आहे! ज्यांना निमित्त म्हणतात, ज्ञानीपुरुष किंवा गुरू, ते सगळे निमित्त म्हटले जातात, त्यांनाच उडवून टाकतात.

'ज्ञानीपुरुष' निमित्त आहेत आणि तुमचे उपादान आहे. उपादान कितीही तयार असेल पण ज्ञानीपुरुषाच्या निमित्ताशिवाय कार्य होणार नाही. कारण आध्यात्मिक विद्या हे एकच कार्य असे आहे की ते निमित्ताशिवाय प्रकट होत नाही. निमित्ताशिवाय प्रकट होत नाही असा माझा बोलण्याचा भावार्थ आहे पण तो नव्याण्णव टक्के एवढाच आहे, एक टक्का त्यात सुद्धा सूट असते. निमित्ताशिवाय सुद्धा प्रकट होत असते. परंतु तो नियम मानला जात नाही, त्याला नियमात बसवले जात नाही. नियमाप्रमाणे तर निमित्तानेच प्रकट होते. अपवाद ही वेगळी गोष्ट आहे. नियमाला नेहमी अपवाद असलाच पाहिजे, तरच त्यास नियम म्हटले जाते.

मग त्यात लोक कुठपर्यंत घेऊन गेले की 'सगळ्या वस्तू वेगवेगळ्या आहेत, एक वस्तू दुसऱ्या वस्तूसाठी काहीच करू शकत नाही.' त्याच्याशी यास जोडून दिले. त्यामुळे त्यांना असेच वाटते की कोणी कोणासाठी काही करू शकत नाही.

**प्रश्नकर्ता :** लोक असेच म्हणतात की कोणी कोणासाठी काही करू शकत नाही.

**दादाश्री :** हे वाक्य तर भयंकर चुकीचे आहे.

**प्रश्नकर्ता :** शास्त्रात असे म्हटले आहे की कोणी कोणासाठी काही करू शकत नाही, ते काय आहे?

**दादाश्री :** ती तर वेगळीच गोष्ट आहे. शास्त्र वेगळेच सांगू इच्छितात आणि लोक समजतात वेगळेच! चोपडण्याचे औषध पितात आणि मरून जातात, त्याला कोण काय करणार? त्यात मग डॉक्टरांचा काय दोष?

जर कोणी कोणासाठी काहीच करू शकत नाही, असे असते तर, वकील कामी आलेच नसते ना! हे डॉक्टर कामी आलेच नसते ना! बायकोही कामी आली नसती! पण हे सगळे तर एकमेकांच्या कामी येतात.

**प्रश्नकर्ता :** कोणी कोणासाठी काही करू शकत नाही ही जी गोष्ट लिहिली आहे, ती कुठल्या संदर्भात लिहिली गेली आहे?

**दादाश्री :** ती गोष्ट निश्चयामध्ये सांगितली आहे, व्यवहारात नाही. व्यवहारात तर सर्वांशी देणेघेणे (संबध) असतेच आणि निश्चयामध्ये कोणी कोणाचे काहीही करू शकत नाही. एक तत्त्व दुसऱ्या तत्त्वास कोणतीही मदत करू शकत नाही पण ती निश्चयाची गोष्ट आहे, व्यवहारात तर सगळे काही होते. हे चुकीचे वाक्य समजावल्यामुळे या पब्लिकचे पुष्कळ नुकसान झाले आहे.

**प्रश्नकर्ता :** म्हणूनच ही गोष्ट समजून घेण्याची इच्छा आहे.

**दादाश्री :** कुठलेही तत्त्व कोणालाही मदत करू शकत नाही, नुकसान करू शकत नाही, कुठलीही तत्त्वे एकमेकात मिसळत नाहीत, असे सांगू इच्छितात. त्याच्या ऐवजी ही गोष्ट लोकांनी व्यवहारात खेचून आणली. नाही तर व्यवहारामध्ये तर पत्नीशिवाय चालले नसते, बायकोला पतीशिवाय चालले नसते. व्यवहार सगळा परावलंबी आहे. निश्चय परावलंबी नाही, निश्चय स्वावलंबी आहे. आता व्यवहारात त्या निश्चयाला आणले, तर काय अवस्था होईल?

## 'खोट्याचे' ज्ञान आवश्यक

ही गोष्ट तुमच्या लक्षात येते का? मला माझी गोष्ट खरी ठरवायची नाही. तुम्हाला योग्य वाटत असेल तरच ती गोष्ट स्वीकारा. मला कोणत्याही गोष्टीला खरी ठरवायची नाही. तुम्हाला योग्य वाटली तर स्वीकारा आणि नाही स्वीकारले तरी माझी हरकत नाही. मला तर कोणत्याही परिस्थितीत सत्य बोलले पाहिजे. नाही तर या लोकांनी असेच सर्व चालवून घेतले आहे.

**प्रश्नकर्ता :** पण हा तर त्यांचा दृष्टिकोन आहे ना?

**दादाश्री :** ते बरोबर आहे, पण हे सत्य जर मी उघड केले नाही तर लोक त्या सत्यास झाकून ठेवण्याच्याच मागे आहेत आणि हे सत्य कोणी हिमतीने बोलू शकत नाही. 'हे खोटे आहे' असे तुम्हाला वाटले की नाही वाटले?

**प्रश्नकर्ता :** हो दादा.

**दादाश्री :** खोट्याचे ज्ञान व्हायला पाहिजे. एका माणसाने मला सांगितले की, 'हे खोटे आहे' असे मला ज्ञान झाले. मला तर एवढेच हवे होते. कारण हे तर अनिश्चित राहते, यात शंका राहते की हेही थोडे खरे आहे आणि तेही थोडे खरे आहे. तोपर्यंत तर त्यातून काही तथ्य निघणार नाही. 'हे खोटे आहे' समजले पाहिजे, त्यानंतर समाधान वाटेल.

म्हणजे स्पष्ट कोणी बोलतच नाहीत आणि असेच सर्व चालवत राहतात. माझ्यासारखे 'ज्ञानी पुरुष' असे स्पष्ट बोलू शकतात, आणि मी जसे आहे तसे बोलू शकतो.

## 'आहे निमित्त,' तरी सुद्धा 'सर्वस्व'च

तुम्ही विचारा, सगळे काही विचारू शकता, कुठलाही प्रश्न विचारु शकता. पुन्हा असा योग जुळून येणार नाही. म्हणून सगळे काही विचारा. प्रश्न चांगले आहेत आणि हे सर्व ज्ञान प्रकट होईल तेव्हाच लोकांना समजेल ना! आम्ही तुम्हाला अगदी शेवटपर्यंतची गोष्ट सांगू. तुम्ही विचाराल तसे आम्ही उत्तर देऊ.

**प्रश्नकर्ता :** असे सुद्धा म्हटले जाते की ज्ञान गुरूकडून सुद्धा होत नाही आणि गुरूशिवाय सुद्धा होत नाही. हे समजवा.

**दादाश्री :** गोष्ट खरीच आहे ना! जर कधी गुरूने असे सांगितले की, 'माझ्यामुळे झाले' तर ती खोटी गोष्ट आहे आणि शिष्याने म्हटले की, 'गुरूशिवाय झाले' तर ती गोष्टही खोटी आहे. आम्ही काय म्हटले? की हे तुमचेच तुम्हाला देत आहोत. आमचे काही सुद्धा देत नाही.

**प्रश्नकर्ता :** पण त्यासाठी आपण निमित्त तर आहातच ना?

**दादाश्री :** हो, निमित्त तर आहेच ना! आम्ही स्वत:च तुम्हाला सांगतो ना की, आम्ही तर निमित्त आहोत. केवळ निमित्त! पण तुम्ही जर निमित्त मानले तर तुमचे नुकसान होईल, कारण उपकारी भाव निघून जाईल. जितका उपकारी भाव तेवढा अधिक चांगला परिणाम तुम्हाला मिळेल. उपकारी भावालाच भक्ती म्हटली आहे.

**प्रश्नकर्ता :** दादाजी, आम्ही जर आपल्याला निमित्त मानले तर उपकारी भाव निघून जातो, हे समजले नाही.

**दादाश्री :** आम्ही तर तुम्हाला सांगतो की आम्ही निमित्त आहोत पण तुम्ही जर आम्हाला निमित्त मानले तर तुम्हाला लाभ मिळणार नाही. तुम्ही उपकार मानलेत तर फळ मिळेल, हा नियमच आहे या जगाचा. पण हे निमित्त असे आहे की मोक्षास घेऊन जाणारे निमित्त आहे. म्हणून महान उपकार माना. तिथे अर्पण करण्यास सांगितले आहे. फक्त उपकारच मानायचे एवढेच नाही पण मन-वचन-काया सर्व अर्पण करा. सर्वस्व अर्पण करायला वेळच लागणार नाही असा भाव यायला हवा.

वीतरागांनी सुद्धा म्हटले आहे की ज्ञानीपुरुष तर असे म्हणतात की 'मी तर निमित्त आहे' पण मुमुक्षुंनी 'ते निमित्त आहेत' असे कधीही मानू नये. मुमुक्षुंनी निमित्तभाव दाखवू नये की 'ओहो, तुम्ही तर निमित्त आहात, मग यात तुम्ही काय करणार?' 'तेच आमचे सर्वस्व आहेत' असेच त्यांनी बोलावे. नाही तर याला व्यवहार चुकलात असे म्हटले जाईल. तुम्ही तर असेच म्हणावे की हेच 'आम्हाला मोक्षाला घेऊन जाणारे आहेत' असे म्हणावे. आणि ज्ञानी पुरुष असे सांगतात की 'मी निमित्त आहे', अशा तऱ्हेचा दोघांचा व्यवहार म्हटला जातो.

वस्तुस्तिथीत हा इतका सरळ मार्ग आहे, समभाव असलेला मार्ग आहे, अजिबात अडचणरुप नाही आणि तरी सुद्धा मार्ग दाखविणारे आणि कृपा करणारे स्वत: काय म्हणतात? की 'मी निमित्त आहे.' ' पाहा ना, डोक्यावर पगडी घालत नाही ना, नाही?' नाही तर किती मोठी (मानाची) पगडी घालून फिरतील! म्हणजे आम्ही देणारे सुद्धा नाही, आम्ही तर निमित्त आहोत. डॉक्टरकडे गेल्यावर रोग बरा होतो. सुताराकडे गेल्यावर रोग बरा होईल का?

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** म्हणून ज्या गोष्टींचे जे निमित्त आहेत, तिथे गेलो तरच आपले काम होईल. म्हणून क्रोध-मान-माया-लोभ घालवायचे असतील, हे सगळे अज्ञान दूर करायचे असेल, तर ज्ञानींकडे जावे लागेल.

## सत् साधन सामावले 'ज्ञानींच्या' आत

म्हणून म्हणतात की सत् साधन हवेत. सत् साधन म्हणजे काय? सत्देव, सत्गुरू आणि सत्धर्म! खरोखर तर शास्त्र सुद्धा सत्साधन नाहीत, मूर्ती सुद्धा सत्साधन नाही. फक्त ज्ञानी पुरुषच सत्साधन आहेत. त्यांच्यात सर्वच सामावले. जिथे सत्देव, सत्गुरू आणि सत्धर्म हे तीन एकत्र असतील त्यांना म्हणतात ज्ञानी पुरुष! जेव्हा विधी करतात तेव्हा ते सत्देव आहेत, बोलतात तेव्हा सत्गुरू आहेत आणि ऐकतात तेव्हा सत्धर्म आहे. तिघांचा संगम एकाच ठिकाणी आहे! एकाचीच आराधना करा, दुसरी भानगडच नको. नाही तर तिघांची आराधना करावी लागेल. येथे तर एकातच सगळे सामावून गेले.

**प्रश्नकर्ता :** जैनीजममध्ये तर गुरूभावासारखे काही नसतेच.

**दादाश्री :** नाही, तुम्ही म्हणता तसे नाही. खरे तर देव, गुरू आणि धर्म, यावरच त्यांची स्थापना आहे. सत्देव, सत्गुरू आणि सत्धर्मावर तर त्याचा सर्व आधार आहे. महावीर भगवंतांनी, चोवीस तीर्थंकरांनी काय सांगितले? की गुरूशिवाय या जगात चालणारच नाही. म्हणून सत्देव, सत्गुरू आणि सत्धर्म हे तीन साथीला असतील तर मोक्ष मिळेल, असे थोडेफार काही कानावर आले आहे का?

सत्धर्म म्हणजे भगवंतांनी सांगितलेले शास्त्र-आगम, तो आहे सत्धर्म. सत्धर्म तर आहे, भगवंतांनी सांगितलेली शास्त्रे आहेत पण गुरूशिवाय ती समजावणार कोण? आणि सद्गुरू तर आपल्या येथे असतात पण ते सुद्धा आता सद्गुरू राहिले नाहीत. कारण त्यांना आत्मज्ञान नाही म्हणून! म्हणजे सद्गुरू तर पाहिजेच. ते जेव्हा तुमच्या घरी (आहार) घ्यायला येतात तेव्हा तुम्ही त्यांना आहार द्यावे. आणि त्याच्या बदल्यात तुम्ही त्यांच्याकडे शिकायला जायचे, अशी व्यवस्था भगवंतानी केलेली आहे. प्रत्येक व्यक्तीला, ऐंशी वर्षाच्या मनुष्याला सुद्धा सद्गुरूची गरज असते. आणि सत्देव म्हणजे काय? तर वीतराग भगवंत. आता ते जर प्रत्यक्ष हजर नसतील तर त्यांची मूर्ती ठेवतात. परंतु सद्गुरू तर प्रत्यक्षात हजर हवेच. त्यांची मूर्ती ठेवून चालणार नाही.

## मनाने मानलेले चालत नाही

**प्रश्नकर्ता :** गुरू नेमले पाहिजेत ही गोष्ट खरी आहे. पण आपल्या मनानेच कोणाला तरी गुरू मानले तर चालते का?

**दादाश्री :** तसे काही चालणार नाही. सांगणारा त्याच्या समोर पाहिजे की तू ही चूक केली आहेस म्हणून. आणि जर मनाने मानून घ्या असे म्हणत असाल तर मग या बायकोला मनानेच मानून घ्या ना! एका मुलीला पाहून मनातच माना की माझे लग्न झाले! मग लग्न नाही केले तरी चालेल का?

**प्रश्नकर्ता :** समजा कोणी गुरू परदेशात जाऊन तिथे कायमसाठी राहिले असतील व ते येथे परत येणारच नसतील आणि मला जर त्यांना गुरू मानायचे असेल तर मी त्यांचा फोटो ठेऊन त्यांना माझे गुरू मानू शकत नाही का?

**दादाश्री :** नाही. त्याने काहीच निष्पन्न होणार नाही. गुरू म्हणजे, आपल्याला जे मार्ग दाखवतील ते गुरू. फोटो मार्ग दाखवत नाही. म्हणून ते गुरू कामाचे नाहीत. आपण आजारी असू आणि डॉक्टरचा फोटो आपल्या समोर ठेवून त्याचे ध्यान करीत राहिलो तर काय आजार बरा होईल?

## 'आपले' गुरू कोण?

**प्रश्नकर्ता :** दादाश्री तुम्हाला ज्ञान प्रकट झाले तेव्हा तुम्ही कोणाला गुरू मानले होते का?

**दादाश्री :** आम्हाला कोणी प्रत्यक्ष गुरू तर भेटले नाहीत. वास्तवात गुरू कोणाला म्हणता येईल? की जे प्रत्यक्ष भेटले असतील त्यांना. नाही तर हे सर्व फोटो तर आहेतच ना! कृष्ण भगवंत प्रत्यक्ष भेटले तर कामाचे. नाही तर फोटो तर लोकांनी विकले आणि आम्ही ते सजवले! आम्हाला या जन्मात कोणी डिसायडेड (ठराविक) गुरू भेटले नाहीत, की हेच गुरू आहेत. गुरू जर प्रत्यक्ष असतील तर त्या प्रत्यक्ष गुरूला धारण करून सहा महिन्यात, बारा महिन्यात त्यां दोघांमध्ये गुरू-शिष्याचे नाते प्रस्थापित होते,

त्यांना गुरू म्हटले जाते. आमचा असा कोणताच संबंध स्थापित झाला नाही, प्रत्यक्ष कोणीच भेटले नाही.

कृपाळुदेवांवर अधिक भाव होता! पण ते प्रत्यक्ष नव्हते. म्हणून त्यांचा गुरूच्या रूपात स्वीकार करत नाही. गुरूप्रमाणे स्वीकार केला असे मी कोणाला म्हणेल? तर प्रत्यक्ष मला सांगतील, प्रत्यक्ष आदेश देतील, उपदेश करतील त्यांना मी गुरू म्हणेल. कृपाळुदेव मला पाचच मिनींटासाठी जरी भेटले असते ना, तरी मी त्यांची गुरूपदी स्थापना केली असती, असे मला समजले होते! मी गुरूपदी कोणालाही स्थापन केले नव्हते. इतर संतांचे मी दर्शन घेतले होते. पण त्या गुरूपदावर जर माझे अंत:करण स्थिरावेल तरच मी गुरू करेल, नाही तर गुरू करणार नाही. ते संत खरे होते, ही गोष्ट नक्की पण आपल्या मनाची संतुष्टी झाली पाहिजे ना. पण आपले अंत:करण त्यांच्या ठिकाणी स्थिरावले पाहिजे ना!

## उपकार, पूर्वीच्या गुरूंचे

आता, या जन्मात माझे गुरू नाहीत, याचा अर्थ असा होत नाही की मला कधीच गुरू नव्हते.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे मागच्या जन्मात तुमचे गुरू होते?

**दादाश्री :** गुरूशिवाय तर मनुष्य पुढे येतच नाही. गुरूशिवाय तर पुढे आलेलेच नसतात. माझे म्हणणे असे आहे की बिन गुरूचे कोणी असूच शकत नाही.

**प्रश्नकर्ता :** मग मागच्या जन्मी तुमचे गुरू कोण होते?

**दादाश्री :** ते खूप चांगले गुरू असतील, पण ते आता आम्हाला कसे समजणार!

**प्रश्नकर्ता :** श्रीमद् राजचंद्रांचे सुद्धा गुरू होते ना?

**दादाश्री :** त्यांना या जन्मात गुरू लाभले नव्हते. त्यांनी एवढे लिहिले आहे की आम्हाला जर सद्गुरू मिळाले असते तर आम्ही त्यांच्या

मागे-मागे गेलो असतो! पण त्यांचे ज्ञान खरे आहे. त्यांना अंतिम दशेमध्ये जे ज्ञान प्रकट झाले, ते आत्मज्ञान प्रकट झाले होते.

**प्रश्नकर्ता :** पण दादाजी आपल्यालाही जे ज्ञान झाले, ते गुरूशिवायच झाले ना?

**दादाश्री :** हा सगळा आम्ही मागचा हिशोब घेऊन आलो आहोत. पूर्वी गुरू भेटले होते, ज्ञानी भेटले होते त्यांच्याकडून सामान घेऊन आलो होतो. पण कोणत्यातरी चुकीमुळे ते थांबले गेले असावे. म्हणून या जन्मात गुरू भेटले नाहीत पण मागच्या जन्माचे गुरू असतीलच ना? मागच्या जन्मात गुरू भेटले असतील आणि या जन्मात ज्ञान प्रकट झाले!

या जन्मात तर मला असा काही विश्वास नव्हता की इतके अगाध ज्ञान प्रकट होईल. पण तरी ते सुरतच्या स्टेशनवर अचानकच प्रकट झाले. तेव्हा माझी खात्री पटली की हे तर आश्र्यर्यकारक विज्ञान आहे! लोकांचे पुण्य उदयास आले असावे. कोणाला तरी निमित्त बनवावेच लागते ना? तर आता लोक समजतात की दादानां ज्ञान असेच प्रकट झाले, परंतु तसे नाही, मागच्या जन्मात गुरू केले होते, त्याचे हे फळ प्राप्त झाले. तात्पर्य, गुरूशिवाय काहीही साध्य होत नाही. गुरू परंपरा चालूच राहणार आहे.

## जिवंत गुरूंचेच महत्त्व

**प्रश्नकर्ता :** गुरू हयात नसतील तरी सुद्धा स्वत:च्या शिष्यास मार्गदर्शन देतात की नाही?

**दादाश्री :** प्रत्यक्ष गुरू असतील तरच कामाचे. परोक्ष तर कामाचेच नाहीत. सदेह हजर नसणारे असे परोक्ष गुरू काहीही मदत करत नाहीत. तरी देखील परोक्ष गुरू कशा प्रकारे मदत करतात? तर जे गुरू आपल्याला भेटले असतील आणि दहा-पंधरा वर्षे आपल्याला त्यांचा लाभ मिळाला असेल, आपण त्यांची सेवा केली असेल व त्या गुरूंबरोबर दहा-पंधरा वर्षे संलग्नता राहिली असेल, आणि त्यानंतर जर त्यांचा देहांत झाला असेल तर मात्र थोडा लाभ मिळू शकतो. नाही तर डोकेफोड करून सुद्धा काहीही लाभ होत नाही!

**प्रश्नकर्ता :** म्हणजे जे गुरू आम्ही पाहिलेच नाहीत, ते काहीच मदत करत नाहीत?

**दादाश्री :** ते दोन आणे मदत करतात. एकाग्रतेचे फळ मिळते आणि ते सुद्धा भौतिक फळ मिळते. त्यापेक्षा तर आत्ताचे 'चार आणे कमी' फळ देणारे गुरू बरे.

**प्रश्नकर्ता :** ज्या गुरूंनी समाधि घेतली असेल, ते गुरू नंतर आपल्याला मदत करतात?

**दादाश्री :** ज्या गुरूंनी समाधि घेतली असेल, त्यांच्या जिवंतपणीच जर आपला त्यांच्याशी संबंध आला असेल, त्यांचे प्रेम संपादन केले असेल, त्यांची कृपा प्राप्त केली असेल आणि नंतर त्यांनी देहत्याग केला असेल, तर त्यांची समाधि असेल तरीही काम होते ना! एकदा तरी ओळख झाली पाहिजे. परंतु ज्यांनी पाहिलेच नसेल त्यांचे काम होत नाही, मग त्यांच्या समाधिवर डोके फोडले तरी त्यातून काहीही निष्पन्न होणार नाही.

हे तर महावीरांचे फोटोही उपयोगी पडत नाहीत आणि कृष्ण भगवंताचे फोटो देखील उपयोगी पडत नाहीत. प्रत्यक्ष असतील तरच उपयोगाचे. लोक किती जन्मांपासून महावीर आणि कृष्ण भगवंतांना भजत आले आहेत. लोकांनी काही कमी भक्ती केली आहे? भक्ती करून-करून थकून गेले. रोज मंदिरामध्ये जाऊन सुद्धा धर्मध्यान साधले जात नाही! शिवाय यामध्ये पण मुदत असते. या औषधांची सुद्धा मुदत संपण्याची तारीख असते, ती तुम्हाला माहीत आहे ना? एक्सपायरी डेट! (मुदत संपण्याची तारीख) तसे येथे सुद्धा आहे. परंतु लोक तर समजल्याशिवायच जे आत्ता हजर नाहीत त्यांचेच गुणगान करीत राहतात.

**प्रश्नकर्ता :** जिवंत गुरूची एवढी अपेक्षा का राहत असेल?

**दादाश्री :** जिवंत गुरू नसेल तर काहीच होत नाही, काही साध्य होत नाही. त्यांच्यापासून फक्त भौतिक लाभ होतो. कारण तितका वेळ चांगल्या कामात घालवला, त्याचा लाभ होतो. जर गुरू स्वत: येथे हजर

असतील तरच ते तुमचे दोष दाखवतील व तुम्हाला दोष मुक्त करतील. तुमच्या सगळ्या चुका तुम्हाला दिसू लागल्यानंतर गुरूची गरज भासत नाही. आमच्या सगळ्याच चुका आम्हाला दिसतात त्यामुळे या जगात फक्त आम्हालाच गुरूची आवश्यकता नाही. बाकी तर सर्वांना गुरूची आवश्यकता आहे. जे गुरू या जगातून निघून गेले आहेत, जे आता हयात नाहीत, त्यांचे गुणगान करीत राहिलात तर त्यातून काहीही साध्य होत नाही.

**प्रश्नकर्ता :** अर्थात गुरूच्या रुपात मूर्ती किंवा फोटो असेल तरीही ते चालणार नाही?!

**दादाश्री :** काहीही चालणार नाही. तो फोटो हस्ताक्षर करू शकत नाही. आज आम्ही इंदिरा गांधींचा फोटो घेऊन बसलो तर त्यांचे हस्ताक्षर घेऊ शकतो का? म्हणून आज जे जिवंत आहेत, तेच हवेत. आज इंदिरा गांधी किंवा जवाहरलाल नेहरू काहीही मदत करू शकत नाहीत. आत्ता जे हजर आहेत तेच मदत करू शकतील. दुसरे कोणीही मदत करू शकत नाही. हजर असतील त्यांचे हस्ताक्षर चालेल, जरी पूर्ण हस्ताक्षर नसले तरी त्यांची इनिशिअल्स (आद्याक्षर) असतील तरीही चालेल आणि इंदिरा गांधींचे पूर्ण हस्ताक्षर असले तरी सुद्धा चालणार नाही.

## मूर्ती ही सुद्धा परोक्ष भक्ती

**प्रश्नकर्ता :** एक संत म्हणतात की या ज्या जड वस्तू आहेत जसे की मूर्ती, फोटो यांचे अवलंबन घेऊ नये. जे तुमच्या नजरेसमोर जिवंत (गुरू) दिसतात, त्यांचा आधार घ्यावा.

**दादाश्री :** ते योग्यच सांगतात की जर कुणी चांगले, जिवंत गुरू भेटले तर आपल्याला आपली संतुष्टी होते. पण जोपर्यंत गुरू भेटत नाहीत, तोपर्यंत मूर्तीचे दर्शन घ्यावे. मूर्ती ही पायरी आहे, ती पायरी सोडून चालणार नाही. जोपर्यंत अमूर्त प्राप्त होत नाही, तोपर्यंत मूर्ती सोडून चालणार नाही. मूर्ती नेहमी मूर्तच देणार. मूर्ती अमूर्त देऊ शकत नाही. स्वत:चा जो गुणधर्म असेल तोच बजावणार ना! कारण मूर्ती ही परोक्ष भक्ती आहे. गुरू सुद्धा परोक्ष भक्ती आहे, परंतु गुरूमध्ये लवकर प्रत्यक्ष भक्ती होण्याचे साधन

आहे. जिवंत मूर्ती आहेत ते. तेव्हा जिथे प्रत्यक्ष उपस्थित असतील तिथे जावे. भगवंताच्या मूर्तीचे सुद्धा दर्शन करा, दर्शन करण्यात काहीच गैर नाही. कारण त्यात आपली भावना आहे आणि पुण्यही बांधले जाते, म्हणून मूर्तीचे दर्शन घेतले तरी चालेल. पण मूर्ती आपल्याशी काही बोलत नाही. कोणी सांगणारा तर हवाच ना? सांगणारा नको का? मग असा कोणी शोधून काढला नाही?

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** मग आता केव्हा शोधणार?

## स्वछंद थांबतो, प्रत्यक्षच्या अधीनच

म्हणून म्हटले आहे ना की सजीवन मूर्तीशिवाय एकटे पडू नका. कोणी तरी सजीवन मूर्ती शोधून काढा आणि मग तिथे त्यांच्याजवळ बसा. तुझ्यापेक्षा तर ते दोन आणे तरी चांगले असतील.तू बारा आणे असशील तर चौदा आणेवाल्या मूर्तीपाशी जाऊन बैस. पूर्वी जे होऊन गेले आहेत, ते आज तुझे दोष दाखवण्यासाठी येणार नाहीत. जे सजीवन असतील तेच दोष दाखवतील.

म्हणूनच कृपाळुदेवांनी सांगितले आहे ना, 'सजीवन मूर्तीच्या लक्ष्यशिवाय जे काही पण करण्यात येते, ते या जीवासाठी बंधनरुप आहे. हे आमचे हृदय आहे.' हे एकच वाक्य इटसेल्फ (स्वत:च) सर्व काही सांगून जाते. कारण सजीवन मूर्तीशिवाय जे काही कराल तो स्वछंद आहे. जर प्रत्यक्ष हजर असेल तरच स्वछंद थांबेल. नाही तर स्वछंद कोणाचाच थांबत नाही.

**प्रश्नकर्ता :** पण जर प्रत्यक्ष सद्‌गुरूंचा योग नसेल तर जे सद्‌गुरू होऊन गेले आहेत, त्यांची जी वचने असतील, त्यांचा आधार घेऊन जर पुरुषार्थ केला तर त्याला समकित प्राप्त होईल, असे सुद्धा म्हटले आहे. ही गोष्ट खरी आहे की नाही?

**दादाश्री :** ते तर करतातच ना! आणि समकित झाल्यानंतर तरी ताप उतरला आहे हे लक्षात येईलच ना! समकित झाले तर ताप उतरला

आहे हे लक्षात नाही का येणार? ताप चढलेली स्थिती आणि ताप उतरलेली स्थिती समजेल की नाही? दृष्टीत बदल झाला आहे की नाही, हे समजणार नाही का? समकित म्हणजेच दृष्टीबदल! कदाचित अपवाद असतो, एखाद्यासाठीच अपवाद असतो. पण येथे आम्ही अपवादाची चर्चा करीत नाही, आम्ही सगळी सामान्य चर्चा करीत आहोत.

**प्रश्नकर्ता :** सद्गुरूंची जी वचने आहेत, त्यांचा आधार घेऊन काही पुरुषार्थ केला तर तो मनुष्य प्राप्ती करू शकतो ना?

**दादाश्री :** त्याने काहीही निष्पन्न होत नाही ना! मग तर कृपाळुदेवांचे वाक्य खोडून टाका की 'सजीवन मूर्तीच्या लक्ष्यशिवाय जे काही केले जाते ते जीवासाठी बंधनकारकच असते. हे आमचे हृदय आहे.' हे किती मोठे वाक्य आहे! तरी सुद्धा लोक जे काही करतात ते चुकीचे नाही. 'हे तुम्ही जे काही करीत आहात ते चुकीचे आहे, आणि त्यामुळे मोक्ष मिळणार नाही,' असे जर आम्ही सांगितले तर तो इतरत्र पत्ते खेळण्यासाठी निघून जाईल. चुकीच्या मार्गावर चालू लागेल. त्यापेक्षा तर तो जे काही करत आहेत ते चांगलेच आहे. पण कृपाळुदेवांनी सांगितल्यानुसार चाला. प्रत्यक्ष सद्गुरू हुडकून काढा!

कृपाळुदेवांनी तर पुष्कळ जोर देऊन सांगितले आहे की, सजीवन मूर्तीशिवाय काहीही करू नका. तो स्वच्छंद आहे, निव्वळ स्वच्छंद आहे! जो स्वत:च्याच शहाणपणाने पुढे चालत आहे, त्यास मोक्ष कधीच मिळणार नाही. कारण माथी कुणी वरिष्ठ नाही, माथी कोणी गुरू किंवा ज्ञानी नसेल तर मग काय होईल? स्वच्छंद! ज्याचा स्वच्छंद थांबेल त्याचा मोक्ष होतो, असाच काही मोक्ष होत नाही.

सर्वात उत्तम म्हणजे गुरूला विचारले पाहिजे, परंतु असे गुरू या काळात कुठून आणणार? त्याऐवजी कोणत्याही एका व्यक्तीस गुरू बनवले तरी चालेल. तुमच्यापेक्षा मोठे असतील, तुमची काळजी घेत असतील आणि तुम्हाला वाटले की, माझे मन येथे स्थिरावते, तर तिथे तुम्ही बसा आणि स्थापना करा. कदाचित, त्यांच्यात एक-दोन चुका असतील तर

निभावून घ्या. तुमच्यात पुष्कळ चुका आहेत आणि त्यांच्यात तर एक-दोन चुका असतील, मग तिथे तुम्ही न्यायाधीश कशाला बनता? तुमच्यापेक्षा मोठे आहेत म्हणून ते तुम्हाला नक्कीच पुढे घेऊन जातील. न्यायाधीश बनणे हा भयंकर मोठा अपराध आहे.

जोपर्यंत सम्यक् दर्शन होत नाही, तोपर्यंत स्वच्छंद जात नाही. किंवा मग एखाद्या गुरूच्या अधीन राहून वागत असेल तर त्याची सुटका होईल, पण संपूर्ण अधीन, पूर्णपणे अधीन राहून वागणे असेल तेव्हाच! गुरूच्या अधीन राहत असेल त्याची तर गोष्टच वेगळी आहे. जरी गुरू मिथ्यात्वी असतील तरी हरकत नाही पण शिष्य गुरूच्या अधीन, पूर्णपणे अधीन राहिला तर त्याचा स्वच्छंदपणा निघून जाईल. कृपाळुदेवांनी तर अगदी सत्य लिहिले आहे, पण आता ते सुद्धा समजणे कठीण आहे ना! जोपर्यंत स्वच्छंद जात नाही, तोपर्यंत कसे काय समजेल? स्वच्छंद जाणे ही सहजसाध्य गोष्ट आहे का?

**प्रश्नकर्ता :** जोपर्यंत ज्ञानी भेटत नाहीत, तोपर्यंत स्वच्छंद जाणारच नाही ना!

**दादाश्री :** नाही, जरी वेडाखुळा गुरू माथी ठेवला असेल आणि शिष्य आयुष्यभर शिष्यतेचा विनय राखून वागत असेल तर त्याचा स्वच्छंद गेला असे म्हणता येईल. गुरूच्या विरुद्ध जाऊन या लोकांनी त्यांना शिव्या दिल्या आहेत. मनुष्यात असे सामर्थ्य नाही की तो विनय न चुकता राहील. कारण थोडे जरी उलटसुलट दिसले की बुद्धी वेडेपणा करतेच!

माथी ज्ञानी मिळाले नाही तर गुरू तरी पाहिजेतच. नाही तर मनुष्य स्वच्छंदपणेच वागत राहील. या पतंगाची दोरी सोडून दिली तर पतंगाची काय दशा होईल?

**प्रश्नकर्ता :** गटांगळ्या खातच राहील.

**दादाश्री :** हो, हे पतंगाची दोरी सोडल्यासारखे आहे. जोपर्यंत आत्मा हाती लागत नाही तोपर्यंत पतंगाची दोरी सुटलेली आहे. तुमच्या लक्षात आले ना हे?

## दर्शनानेच होतो नतमस्तक

**प्रश्नकर्ता :** हो. गुरू केलेच पाहिजेत. गुरूशिवाय ज्ञान मिळत नाही, हा सिद्धांत बरोबर आहे.

**दादाश्री :** बरोबर आहे. आता 'गुरू' हे विशेषण आहे. 'गुरू' हा शब्दच नाही, 'गुरू' च्या विशेषणावरून गुरू आहे, म्हणजेच जर असे विशेषणवाले असतील तर ते गुरू आणि असे विशेषणवाले असतील तर ते भगवंत!

**प्रश्नकर्ता :** खऱ्या गुरूंची लक्षणे कोणती?

**दादाश्री :** जे गुरू प्रेम देतात, जे गुरू आपल्या हिताचाच विचार करतात तेच खरे गुरू. असे खरे गुरू कोठून मिळणार! गुरुंना असे पाहताक्षणीच आपले पूर्ण शरीर कुठलाही विचार न करता (त्यांच्या चरणांवर) झुकले जाईल.

म्हणूनच लिहिले आहे ना,

*'गुरू ते कोने कहेवाय जेने जोवाथी शिश झूकी जाय'*

('गुरू कोणास म्हणावे, की ज्यांना पाहताक्षणीच नतमस्तक होऊ.)

पाहताक्षणीच आपण नतमस्तक होतो, त्यांना म्हणतात गुरू. म्हणजे गुरू असतील तर त्यांचे विराट स्वरूप असले पाहिजे. तरच आपल्याला मुक्ती मिळेल, नाही तर मुक्ती मिळणार नाही.

## गुरू, जे डोळ्यात भरतील असे

**प्रश्नकर्ता :** गुरू कोणास करावे हाही एक प्रश्नच आहे ना?

**दादाश्री :** जिथे आपले मन स्थिरावेल त्यांना गुरू करा. मनाची स्थिरता झाल्याशिवाय गुरू करू नका. म्हणून आम्ही काय म्हटले आहे की जर गुरू करणार असाल तर ते डोळ्यात भरतील असे गुरू करा.

**प्रश्नकर्ता :** 'डोळ्यात भरतील असे' म्हणजे काय?

**दादाश्री :** हे लोक लग्न करतात तेव्हा मुली बघतात, तेव्हा ते

काय पाहतात? मुलगी डोळ्यात भरेल अशी शोधतात. जर जाडी असेल तर तिच्या वजनाने जोर पडतो, डोळ्यांवरच जोर पडतो, वजन भारी वाटते! बारीक असेल तर त्याला दु:ख होते. पाहताक्षणीच डोळ्यात समजते. त्याचप्रमाणे 'गुरू डोळ्यात भरतील असे' म्हणजे काय? तर आपल्या डोळ्यात सर्व प्रकारे फिट होतील, त्यांची वाणी फिट होईल, त्यांचे वागणे फिट होईल, असे गुरू करावेत!

**प्रश्नकर्ता :** हो, बरोबर आहे. असे गुरू असतील तरच त्याला त्यांचा आश्रय जाणवेल.

**दादाश्री :** हो, जर गुरू आमच्या हृदयात भरतील असे असतील, त्यांनी सांगितलेल्या सर्व गोष्टी आपल्याला आवडल्या तर आपण आश्रित होऊन जातो, मग आपल्याला दु:ख राहत नाही. गुरू, ही तर एक महान गोष्ट आहे. आपले मन स्थिरावले आहे असे वाटले पाहिजे. आपल्याला जगाचा विसर पाडतील अशांना गुरू करावे. ज्यांना पाहताक्षणीच आपण जग विसरून जातो, जगाची विस्मृती होते, अशांना गुरू करा. नाही तर गुरूचे माहात्म्यच उरणार नाही ना!

## ती किल्ली समजून घ्यावी

गुरूचे महात्म्य खुपच आहे पण कलियुग असल्यामुळे हे सगळे असे झाले आहे. दुषम काळामुळे गुरुंमध्ये स्वारस्य उरले नाही. गुरू वनस्पती तूपासारखे झाले आहेत, त्यामुळे काम होत नाही ना! आणि ते सगळे गुरूकिल्लीशिवायच वावरतात. हो, एक व्यक्ती मला म्हणाली की, 'तुम्ही तर आमचे गुरू आहात' मी म्हटले, 'नाही रे बाबा, मला गुरू म्हणू नकोस. मला ते आवडत नाही. गुरूचा अर्थ काय आहे? बाहेर सगळीकडे विचारून ये' गुरूचा अर्थ वजनदार की हलका?

**प्रश्नकर्ता :** वजनदार

**दादाश्री :** मग वजनदार म्हणजे अवश्य बुडेल. तो तर बुडतोच पण त्यावर बसलेल्या सर्वांचीही जलसमाधी झालेली. जगात असेच होत आहे. मग मला गुरू कशाला करता! गुरुंना आपण विचारले पाहिजे की,

'हे गुरू महाराज, तुमच्याजवळ तुम्ही बुडणार नाहीत अशी गुरूकिल्ली आहे का? तुम्ही तर वजनदार आहात म्हणून बुडल्याशिवाय राहणार नाही आणि आम्हालाही बुडवाल. तेव्हा तुमच्याजवळ गुरूकिल्ली आहे का? तुम्ही बुडाल असे तर नाही ना? तरच मी तुमच्याजवळ बसेन.' त्यांनी 'हो' म्हटले तर बसावे.

**प्रश्नकर्ता :** असे तर कोणीच म्हणणारच नाही की, मी बुडेन असा आहे?

**दादाश्री :** हो, पण आपण म्हणायचे ना की 'साहेब, तुम्हाला अक्कल जरा कमी आहे' असे बोलल्यावर लगेच कळेल की हे बुडतील असे आहेत की नाही!

नाही तर बिन गुरूकिल्लीचे सर्व गुरू बुडलेच आहेत. ते तर बुडलेच, पण सर्व शिष्यांना सुद्धा बुडवले. मग कुठे जातील याचाही काही ठिकाणा नाही. गुरुंजवळ गुरूकिल्ली असेल तर ते बुडणार नाहीत. कारण पूर्वी गुरूंचे जे गुरू होते ना, ते परंपरागत किल्ली देत असत. आपल्या शिष्यांना काय सांगत असत? की तुम्ही गुरू व्हा पण ही गुरूकिल्ली तुमच्याजवळ ठेवा. म्हणजे तुम्ही बुडणार नाही आणि बुडवणार सुद्धा नाही. आजकालच्या गुरूंना मी विचारतो की, 'गुरूकिल्ली आहे का?' (तेव्हा ते विचारतात) 'ती कुठली किल्ली?' मग तर हे भटकून मेले. वर कुणाला बसू देऊ नका. ही गुरूकिल्ली तर विसरूनच गेलेत. गुरूकिल्लीचा काही ठावठिकाणा नाही. हे कलियुग आहे म्हणून बुडतात, सतयुगात बुडत नव्हते.

**प्रश्नकर्ता :** पण गुरूतर तारणहार असतात, ते बुडवित नाहीत.

**दादाश्री :** नाही, पण त्यांच्याजवळ गुरूकिल्ली असेल तर ते स्वत: तरतील आणि दुसऱ्यांनाही तारतील. जर गुरूकिल्ली नसेल ना, तर तू दु:खी होशील. लोक तर वाहवा-वाहवा करतीलच ना, पण नंतर त्या गुरूंचा मेंदू फाटेल. मेंदूची नसच तुटून जाईल. माझी वाहवा-वाहवा करीत नाहीत का लोक? म्हणजे गुरूकिल्ली असेल तर कामाचे. गुरूकिल्ली म्हणजे असे काही स्वत:जवळ साधन असणे की जी किल्ली बुडू देत नाही. ती किल्ली म्हणजे समज आहे, आणि गुरू ती खाजगीत-प्रायव्हेटली

देतात. जे महान गुरू आहेत, ज्ञानी पुरुष, ते प्रायव्हेटली देतात की तुम्ही अशा तऱ्हेने शिष्यांबरोबर काम घ्याल तर तुम्ही बुडणार नाही आणि दुसरे सुद्धा बुडणार नाहीत.

**प्रश्नकर्ता :** गुरू होण्यासाठी गुरूकिल्ली हवी, तर ती किल्ली म्हणजे नेमके काय?

**दादाश्री :** ज्ञानी पुरुष त्याला अशी समज देतात की, 'तू असा आहेस आणि हे सगळे असे आहे. तू येथे गुरू होऊन बसला नाहीस. नाव असलेला-नामधारी गुरू होऊन बसला आहेस. तू निनावी आहेस. तू लघुत्तम राहून गुरूता कर, तर तू तरशील आणि दुसऱ्यांनाही तारशील.' हे तर त्यांच्याजवळ गुरूकिल्ली नाही आणि गुरू होऊन बसले आहेत. 'ज्ञानी' पुरुषाकडून गुरूकिल्ली समजून घेतली पाहिजे. 'ज्ञानी' पुरुषाकडून गुरूकिल्ली आणली पाहिजे तर त्याची सेफसाईड (सुकर मार्ग) राहील.

म्हणून लोक आम्हाला विचारतात की, 'तुम्ही कोण आहात' मी म्हणालो, 'मी तर लघुत्तम पुरुष आहे. माझ्यापेक्षा छोटा जीव या दुनियेत दुसरा कोणीच नाही.' आता लघुत्तम पुरुष कधी कुठे बुडेल का?

**प्रश्नकर्ता :** नाही बुडणार.

**दादाश्री :** लघुत्तम! म्हणजे फक्त स्पर्श होईल पण बुडणार नाही. आणि माझ्यासोबत बसलेत, ते सुद्धा बुडणार नाहीत कारण ज्ञानी पुरुष स्वत: लघुत्तम असतात आणि तरणतारण झालेले असतात. स्वत: तरून गेलेले असतात आणि अनेक लोकांना तारण्यास समर्थ असतात.

## फरक, ज्ञानी आणि गुरूमध्ये...

**प्रश्नकर्ता :** गुरू आणि ज्ञानीपुरुष, या दोघांमधील फरक समजवा.

**दादाश्री :** ज्ञानी पुरुष आणि गुरूमध्ये तर पुष्कळ फरक आहे. गुरू नेहमी सांसारिक गोष्टींसाठी करण्यात येतात. मुक्तीसाठी तर, ज्ञानी पुरुषाशिवाय मुक्तीच नाही. गुरू तर आम्हाला संसारात पुढे घेऊन जातात आणि स्वत: जसे आहेत तसे आम्हाला बनवतात. याच्या पुढचे देऊ शकत

नाही आणि मुक्ती तर ज्ञानी पुरुषच देतात. म्हणून व्यवहारात गुरूची गरज आहे आणि निश्चयात ज्ञानी पुरुषाची गरज आहे. दोघांचीही गरज आहे.

गुरू काय करतात? तर स्वत: पुढचे शिकत जातात आणि पाठीमागच्याला शिकवत जातात. मी तर ज्ञानी पुरुष आहे, शिकणे-शिकवणे हा माझा धंदा नाही. तुम्हाला जर मोक्ष पाहिजे असेल तर मी सर्व उलगडा करून देतो, दृष्टी बदल करवून देतो. आम्ही तर, जे सुख आम्ही अनुभवले ते सुख त्याला प्राप्त करवून देतो आणि बाजूला होतो.

गुरू ज्ञान देतात आणि ज्ञानी पुरुष विज्ञान देतात. ज्ञान संसारात पुण्य बांधते, मार्ग दाखवते. विज्ञान मोक्षाला घेऊन जाते. गुरू तर एक प्रकारचे शिक्षक म्हटले जातात. स्वत: काही नियम घेतलेले असतील आणि त्यांची वाणी चांगली असेल तर समोरच्यालाही नियमात आणतात. दुसरे काही करीत नाहीत, परंतु त्यामुळे संसारात तो मनुष्य सुखी होतो कारण तो नियमात आला म्हणून. आणि ज्ञानी पुरुष तर मोक्षाला घेऊन जातात. कारण त्यांच्याकडे मोक्षाचे लायसन्स आहे.

सांसारिक गुरू असतील त्यास काही हरकत नाही. सांसारिक गुरू तर करायलाच हवेत की ज्यांना आम्ही फॉलो (अनुसरण) करतो. परंतु ज्ञानींना गुरू म्हटले जात नाही, ज्ञानींना तर परमात्मा म्हटले जातात. देहधारी रूपात परमात्मा!! कारण ते देहाचे मालक नसतात, मनाचे मालक नसतात, वाणीचे मालक नसतात.

गुरूंना तर ज्ञानी पुरुषांकडे जावे लागते, कारण गुरूंच्या अंतरंगात क्रोध-मान-माया-लोभ आदींची निर्बळता असते. अहंकार आणि ममता असते. आपण काही वस्तू वगैरे दिली तर ते हळूच त्या वस्तूस आत ठेऊन घेतात. जिथे बघाल तिथे अहंकार आणि ममता! पण लोकांना गुरूंची सुद्धा गरज भासतेच ना!

## अनासक्त गुरू कामाचे

**प्रश्नकर्ता :** अर्थात आसक्ती नसलेले गुरू हवेत, असाच अर्थ झाला ना?

**दादाश्री :** हो, आसक्ती नसलेले हवेत. आसक्तीवाले असतील, धनाची आसक्ती असेल किंवा दुसरी कोणतीही आसक्ती असेल तर काय कामाचे? आपल्याला जो रोग आहे तोच रोग त्यांना सुद्धा आहे, दोघेही रोगी. मग त्यासाठी हॉस्पिटलमध्ये जावे लागते! यांना मेंटल हॉस्पिटलचे रोगी म्हणतात. कोणत्याही प्रकारची आसक्ती नसलेले गुरू केले तर ते कामाचे.

रोज भजी खात असतील किंवा लाडू खात असतील तरी सुद्धा हरकत नाही, फक्त आसक्ती आहे की नाही एवढेच पाहावे लागेल. अरे, कोणी फक्त दूध पिऊन जगत असतील पण आसक्ती आहे किंवा नाही एवढेच पाहावे लागेल. हे तर या गुरूंनी तऱ्हेतऱ्हेचे नखरे दाखवले आहेत. 'आम्ही हे खात नाही, आम्ही ते खात नाही!' अरे, सोड ना ही झंझट. जे असेल ते खा ना! खाण्यास मिळत नाही की खात नाही! हे तर लोकांसमोर नखरे दाखवायचे असतात. हा एक प्रकारचा बोर्ड (पाटी) आहे की, 'आम्ही हे खात नाही, आम्ही हे करत नाही.' लोकांना स्वत:कडे आकर्षित करण्यासाठी असे बोर्ड लावलेले आहेत. मी असे बरेच बोर्ड हिंदुस्तानात पाहिले आहेत. अर्थात आसक्तीरहित गुरू असावे. मग तो खात असेल किंवा नसेल, ते पाहण्याची आपल्याला गरजच नाही.

ज्यांच्यात किंचितमात्र आसक्ती असेल, असे गुरू करुन काही काम होणार नाही. असे आसक्तीवाले गुरू भेटल्यामुळेच तर सारी दुनिया ठेचा खात राहिली आहे. ज्याला आसक्तीचा रोग नसतो, त्यांना गुरू म्हणतात. किंचितमात्र आसक्ती असू नये.

## किती कमीपणा चालवून घेतला जाईल?

**प्रश्नकर्ता :** गुरूची गती गहन असते, म्हणून त्यांचा पूर्वपरिचय झाल्यानंतरच समजते. बाह्य दिखाव्याने काहीच समजत नाही.

**दादाश्री :** त्यांच्यासोबत दहा-पंधरा दिवस राहिलात, तर चंचलतेचा ठाव लागेल. आणि जोपर्यंत ते चंचल आहेत ना, तोपर्यंत आपले काही काम होत नाही. ते अचल झालेले हवेत.

दुसरी गोष्ट म्हणजे त्यांच्यात क्रोध-मान-माया-लोभ याचा एक सुद्धा परमाणू असता कामा नये, किंवा काही अंशी तरी कमी झालेले असतील तरी चालेल, चालवून घेऊ. परंतु हे परमाणू त्यांच्यात जर ठासून भरलेले असतील, मग तर ते आपल्यातही आहेत आणि त्यांच्यातही आहेत, तेव्हा आपल्याला काय मिळणार? अर्थात जे कषायांनी भरलेले असतील त्यांना गुरू करू नये. जे जराशी छेड काढताच फणा दाखवतात त्यांना गुरू करू शकत नाही. जे अकषायी असतील किंवा मग मंद कषायवाले असतील, तर तसे गुरू करता येतील. मंद कषाय म्हणजे दोष आवरू शकतील अशी दशा असणारे. स्वत:ला क्रोध येण्याआधीच क्रोधाला आवरतात म्हणजेच स्वत:च्या कंट्रोलमध्ये असायला हवेत. असे गुरू चालतील. जेव्हा की ज्ञानी पुरुषांमध्ये क्रोध-मान-माया-लोभ नसतात, असे परमाणू नसतातच. कारण ते स्वत: वेगळे राहतात या देहापासून, मनापासून, वाणीपासून सगळ्यांपासून ते वेगळे राहतात!

## सद्‌गुरू कोणाला म्हणता येईल?

**प्रश्नकर्ता :** आता सद्‌गुरू कोणास म्हणावे?

**दादाश्री :** असे आहे ना, सद्‌गुरू कोणास म्हणावे ही खूप कठीण गोष्ट आहे. शास्त्रीय भाषेत सद्‌गुरू कोणास म्हटले जाते? तर सत् म्हणजे आत्मा, तो ज्याला प्राप्त झाला आहे असे गुरू ते सद्‌गुरू!

सद्‌गुरू, ते तर आत्मज्ञानीच म्हटले जातात, त्यांना आत्म्याचा अनुभव झालेला असतो. सर्व गुरूंना आत्मज्ञान झालेले नसते. म्हणून जे निरंतर सत्‌मध्येच राहतात, अविनाशी तत्त्वात राहतात, ते सद्‌गुरू! म्हणजे सद्‌गुरू हे तर ज्ञानी पुरुषच असतात.

**प्रश्नकर्ता :** श्रीमद् राजचंद्र यांनी सांगितलेलेच आहे की प्रत्यक्ष सद्‌गुरूशिवाय मोक्ष होतच नाही.

**दादाश्री :** हो, त्याशिवाय मोक्ष होतच नाही. सद्‌गुरू कसे असावेत? तर कषायरहित असावेत, त्यांच्यात कषाय नसतातच. आपण

मारले, शिव्या दिल्या, तरी सुद्धा त्यांना कषाय होत नाहीत. फक्त कषायरहित एवढेच नाही, तर बुद्धी पण नष्ट झालेली पाहिजे. बुद्धी असता कामा नये. या बुद्धीवंतांजवळ तुम्ही मोक्ष मागण्यास गेलात परंतु त्यांचाच मोक्ष झालेला नाही, मग तुमचा कसा होईल? म्हणजे चापट मारली तरी सुद्धा काही परिणाम होत नाही, शिव्या दिल्या तरी परिणाम होत नाही, चोप दिला तरी परिणाम होत नाही, तुरुंगात डांबले तरी सुद्धा परिणाम नाही. म्हणजे द्वंद नसते, द्वंद्वातीतच असतात ते. द्वंद्व समजता का तुम्ही? नफा-नुकसान, सुख-दु:ख, दया-निदर्यता. जिथे एक असतो तिथे दुसरा असतोच, याला म्हणतात द्वंद्व! म्हणजे जो गुरू द्वंद्वातीत असेल, त्याला सद्‌गुरू म्हणता येईल.

या काळात सद्‌गुरू नसतात. क्वचितच कुठे तरी असतात, बाकी, सद्‌गुरू नसतातच! हे लोक गुरूंना गैर समजूतीमुळे सद्‌गुरू मानून बसले आहेत. त्यामुळेच तर हे सगळे फसले आहेत! नाही तर सद्‌गुरू भेटल्यानंतर चिंता होईल का?

## मोठा फरक, गुरू आणि सद्‌गुरुंमध्ये

**प्रश्नकर्ता :** प्रत्येक जण स्वत:च्या गुरूंनाच सद्‌गुरू मानून बसला आहे, हे काय आहे?

**दादाश्री :** आपल्या हिंदुस्तानात सर्व धर्माचे लोक आपापल्या गुरूला सद्‌गुरूच म्हणतात. फक्त गुरू कोणीच म्हणत नाही. परंतु याचा अर्थ लोकभाषेत आहे. जगात जे अतिशय उच्च चारित्र्यवाले गुरू असतात, त्यांना आपले लोक सद्‌गुरू म्हणतात. पण खरोखर त्यांना सद्‌गुरू म्हणता येत नाही. त्यांच्यात प्राकृतिक गुण खूप उच्च प्रकारचे असतात, त्यांना खाण्यापिण्यामध्ये समता असते, व्यवहारात समता असते. व्यावहारीक चारित्र्यगुण फार उच्च प्रकारचे असतात, परंतु त्यांना आत्मा प्राप्त झालेला नसतो. म्हणून त्यांना सद्‌गुरू म्हणता येत नाही.

असे आहे ना, गुरू दोन प्रकारचे असतात. एक गाईडरूपी गुरू असतात. गाईड म्हणजे आपण त्यांना फॉलो करावे (अनुसरावे) लागते. ते पुढे-पुढे चालतात मॉनिटरसारखे, त्यांना गुरू म्हणतात. मॉनिटरचा अर्थ

तुम्हाला समजतो का? ज्यांना आपण फॉलो करतो.समोर तीन रस्ते आले तर ते ठरवतात की, 'भाऊ, ह्या रस्त्याने नाही, त्या रस्त्याने चाला.' मग आपण त्या रस्त्याने चालतो. त्यांना फॉलो करावे लागते, परंतु ते आपल्या पुढेच असतात. इकडे-तिकडे कुठे जात नाहीत. आणि दुसरे आहेत ते सद्गुरू! सद्गुरू म्हणजे आपल्याला या जगातील सर्व दु:खांपासून मुक्त करतात. कारण ते स्वत: मुक्त झालेले असतात! ते आपल्याला त्यांच्या फॉलोअर्स (अनुयायी) म्हणून ठेवत नाहीत, आणि गुरूंना तर फॉलो करत राहावे लागते, त्यांच्या विश्वासावर चालावे लागते. तिथे मग आपला शहाणपणा दाखवू नये. गुरूशी सिन्सियर राहावे. जितके सिन्सियर असाल, तितकी शांती लाभेल.

गुरू तर आपण जेव्हापासून शाळेत शिकण्यासाठी जातो तेव्हापासूनच गुरुंची सुरुवात होते, ते थेट अध्यात्म्याच्या दरवाज्यापर्यंत गुरू पोहोचवतात. पण अध्यात्मात प्रवेश करु शकत नाही कारण गुरू स्वत:च अध्यात्माच्या शोधात असतात. अध्यात्म म्हणजे काय? तर आत्म्याच्या सन्मुख होणे ते. म्हणजे सद्गुरू आपल्याला आत्मसन्मुख करतात.

अर्थात हाच आहे गुरू आणि सद्गुरूंमधील फरक!

## असे गुरू मिळाले तरी चांगले

लोक गुरूला समजलेच नाहीत. हिंदुस्तानातील लोक गुरूला समजलेच नाहीत की गुरू कोणाला म्हणतात! येथे कोणीही भगवे कपडे घालून बसला असेल तर लोक त्याला 'गुरू' म्हणतात. शास्त्रातील दोन-चार शब्द कोणी बोलले म्हणजे आपले लोक त्याला 'गुरू' म्हणतात, पण ते गुरू नाहीत.

एक व्यक्ती मला म्हणाली, 'मी गुरू केले आहेत.' तेव्हा मी म्हटले, 'तुझे गुरू कसे आहेत' हे तू मला सांग. आर्तध्यान-रौद्रध्यान होत नसतील तर ते गुरू. त्याशिवाय इतर कोणालाही गुरू म्हणणे हा गुन्हा आहे. त्यांना साधू महाराज म्हणू शकतो, त्यागी म्हणू शकतो, पण गुरू म्हणणे हा गुन्हा आहे. नाही तर जर सांसारिक समज हवी असेल तर वकील सुद्धा गुरू आहे, मग तर सगळेच गुरू आहेत ना!

जे गुरू धर्मध्यान करवू शकतात त्यांना गुरू म्हणता येते. धर्मध्यान कोण करवू शकतो? तर जे आपले आर्तध्यान आणि रौद्रध्यान सोडवू शकतात तेच धर्मध्यान करवू शकतील. ज्या गुरूंना कोणी शिव्या दिल्या तरी रौद्रध्यान होत नसेल तर समजावे की यांनाच गुरू करण्यासारखे आहे. आज आहार मिळाला नसेल तरी आर्तध्यान होत नाही तर समजावे की यांना गुरू करता येईल.

**प्रश्नकर्ता :** आर्तध्यान, रौद्रध्यान होत नसेल तर मग त्यांना सद्गुरू नाही का म्हणू शकत?

**दादाश्री :** सद्गुरुंजवळ तर भगवंतांचे प्रतिनिधित्व असते. जे मुक्त पुरुष असतात त्यांना सद्गुरू म्हटले जाते. गुरूंचे अजून तऱ्हेतऱ्हेची कर्म खपायची बाकी असतात. आणि सद्गुरूंनी तर बराचशा कर्मांची निर्झरा केलेली असते. म्हणून आर्तध्यान, रौद्रध्यान होत नसेल तर ते गुरू. आणि जे हातात मोक्ष देतात ते सद्गुरू. सद्गुरू मिळणे कठीण आहे, परंतु गुरू मिळाले तरी पुष्कळ चांगले.

## सद्गुरुंच्या शरणी, आत्यंतिक कल्याण

**प्रश्नकर्ता :** मग कोणाला शरण जावे? सद्गुरूंना की गुरूंना?

**दादाश्री :** सद्गुरू भेटले तर त्यासारखे दुसरे काहीच नाही, पण जर सद्गुरू भेटले नाहीत तर मग गुरू केलेच पाहिजेत. भेदविज्ञानी असतील, त्यांना सद्गुरू म्हटले जाते.

**प्रश्नकर्ता :** तर मग प्रथम गुरू करावेत की सद्गुरू?

**दादाश्री :** गुरू असतील तर मार्गी लागेल ना! आणि जर सद्गुरू भेटले, तर कल्याणच करतील. जरी त्याला गुरू मिळाले असतील किंवा नसतीलही, पण सद्गुरू तर सर्वांचेच कल्याण करतात. गुरू भेटल्यावर तो योग्य मार्गावर येतो, मग त्याला वेळच लागत नाही. कारण त्याच्यात कोणतीही उलट लक्षणे नसतात. परंतु ज्याला सद्गुरुंचा हात लागला त्याचे तर कल्याणच झाले.

**प्रश्नकर्ता :** सत् प्राप्त झालेली माणसे आहेत का?

**दादाश्री :** नसतात. या काळात तर क्वचितच कुठे तरी असतील. नाही तर नसतातच! अशी माणसे कुठून आणायची? असा माल (असले गुण) असेल तर ही दुनिया उज्वलित नाही का होणार? प्रकाश नाही का होणार?

**प्रश्नकर्ता :** मग सद्‌गुरूशिवाय हे भव-जंजाळ कसे संपेल?

**दादाश्री :** हो, सद्‌गुरू नाहीत म्हणून तर हे सर्व अडून राहिले आहे ना!

**प्रश्नकर्ता :** श्रीमद्‌जी म्हणतात की सद्‌गुरूंना शरण जा, नवव्या जन्मात मोक्ष मिळेल, तर यात ते काय सांगू इच्छितात?

**दादाश्री :** सद्‌गुरूंना शोधणे ही कठीण गोष्ट आहे ना! तसे सद्‌गुरू येथे मिळतील असे नाही. ही सोपी गोष्ट नाही. सद्‌गुरू ज्ञानी असले पाहिजेत. ज्ञानी नसतील असे गुरू असतात, परंतु त्यांना संपूर्ण समज नसते. आणि ज्ञानी तर तुम्हाला संपूर्ण समज देतात, सगळी हकीगत समजावून सांगतात. ज्यांना कुठलीही गोष्ट जाणण्याची बाकी राहिली नाही त्यांना ज्ञानी म्हणतात! फक्त जैनांचेच जाणतात असे नाही, तर इतर सर्वच जाणतात त्यांना ज्ञानी म्हणतात! त्यांना भेटलात तर नवव्या जन्मात मोक्ष मिळेल किंवा दोन जन्मातही मोक्ष मिळेल असे आहे.

परंतु सद्‌गुरू मिळणे हे कठीणच आहे ना! आता तर खरे गुरूच नाहीत, मग सद्‌गुरू कसे असतील? आणि श्रीमद् राजचंद्रांसारखे सद्‌गुरू होते, पण तेव्हा लोक त्यांना ओळखू शकले नाहीत.

## ओळखीनंतरच शरणागती

**प्रश्नकर्ता :** अशा सद्‌गुरूंची ओळख कशी असते? त्यांना ओळखायचे कसे?

**दादाश्री :** ते तर प्रज्वलित दिव्यासारखे ओळखू येतील, असे असतात. त्यांचा सुगंध दरवळतो. पुष्कळ सुगंध दरवळतो.

**प्रश्नकर्ता :** पण सद्‌गुरूंना ओळखायचे कसे, की हेच खरे सद्‌गुरू आहेत?

**दादाश्री :** असे आहे की, स्वतःच जर रत्नपारखी असेल तर त्यांचे डोळे पाहूनच ओळखेल. त्यांची वाणी, वर्तन आणि विनय मनोहर असते. मनाचे हरण होईल असे असते. आपल्याला वाटते की ओहोहो! आपल्या मनाचे हरण होत आहे.

**प्रश्नकर्ता :** कित्येक वेळा गुरूंचा-सद्गुरूंचा व्यवहार असा असतो की तो पाहून मनुष्याचा निश्चय डगमगू लागतो, तर त्यासाठी काय करावे?

**दादाश्री :** व्यवहार पाहून निश्चय डगमगू लागला तर बारकाईने चौकशी करावी की आपली शंका खरी आहे की खोटी. स्वतःच्या बुद्धीचा वापर करुन जितके पडताळून पाहता येईल तितके पाहा. तरी सुद्धा जर तुम्हाला अनुकूल वाटत नसेल तर तुम्ही दुसऱ्या दुकानात जावे पण त्यांना त्रास न देता. आपण दुसरे दुकान (गुरू) शोधावे, तिसरे दुकान शोधावे, असे करता करता कधीतरी योग्य दुकान सापडेल.

**प्रश्नकर्ता :** परंतु आमचा विकास झाल्याशिवाय आम्ही सद्गुरूंना कसे ओळखू शकू?

**दादाश्री :** आपण आधीच त्यांना विचारायचे की, 'साहेब, मला व्यापार नको आहे. मला मुक्तीची गरज आहे. तेव्हा आपण मुक्त झाला असाल तर मी येथे आपल्या सेवेसाठी बसू का? त्यात काय हरकत आहे?' परंतु कोणी असे सांगणारा आहे की, 'मी तुम्हाला मुक्ती देईन?' तेव्हा मग साक्षी-बिक्षीची गरजच नसते.तुम्ही लगेच त्यांना सांगा की, 'मी सहा महिने तुमच्याजवळ बसेन आणि तुमच्या म्हणण्यानुसार वागेन आणि फळप्राप्ती झाली नाही तर इथून निघून जाईन.' परंतु असे कोणी बोलणार नाही, या जगात असे कोणी बोलणारच नाही. विचारण्यास काय हरकत आहे?! 'साहेब आपली मुक्ती झाली असेल तर मला सांगा. मला मुक्ती हवी आहे. मला दुसरी स्टेशन्स (स्थानके) परवडत नाहीत. मला मधले स्टेशन नको.' असे स्पष्टच सांगा. मग ते म्हणतील, 'भाऊ, मीच मधल्या स्टेशनवर उभा आहे.' तेव्हा आपण समजू ना की आपल्याला मधले स्टेशन नको. म्हणजे अशा तऱ्हेने शोधले तरच सापडेल, नाही तर

सापडणारच नाही. आपण विनयपूर्वक त्यांना विचारावे. असे न विचारताच बसून राहिलात म्हणून तर अनंत जन्म भटकतच राहिले ना, ते साहेब मधल्या स्टेशनवर राहत असतील आणि आम्ही पण तिथेच राहू, मग याचा काय फायदा?

**प्रश्नकर्ता :** तर मग सद्गुरूला शोधण्यासाठी पुस्तकी ज्ञान कसे उपयोगी पडेल?

**दादाश्री :** ते उपयोगी पडत नाही ना! त्यामुळेच तर हे भटकणे झाले. अनंत जन्मांपासून पुस्तकी ज्ञान शिकलो तरी सुद्धा भटकणे, भटकणे आणि भटकणे! सद्गुरूंची भेट होणे ही तर खूप मोठी गोष्ट आहे. परंतु ज्याला मुक्तीची कामना आहे, त्याला सर्व काही मिळते. मुक्तीची कामना हवी. आणि पुजले जाण्याची कामना असलेल्यांना उशीरच लागणार, कितीतरी जन्मांपर्यंत भटकतच राहावे लागेल. आपल्या लक्षात आले ना हे? कशाची कामना आहे? मान-पूजा आदीची कामना! 'या, या, या, शेठ!' म्हणतात, गर्वरस चाखतात. ते चाखणे सुद्धा राहून जाते ना लोकांचे! ते चाखण्याची मजा काही वेगळीच असते ना!

## सद्गुरू भेटले हीच योग्यता

**प्रश्नकर्ता :** सद्गुरू भेटल्यानंतर सद्गुरुंच्या आदेशानुसार साधना तर करावीच लागते ना?

**दादाश्री :** साधनेचा मग अंत होतो. सहा महिने किंवा बारा महिने लागतात. त्यासाठी चाळीस-चाळीस वर्ष लागत नाहीत.

**प्रश्नकर्ता :** ती तर जशी ज्याची योग्यता.

**दादाश्री :** योग्यतेची गरजच नाही. जर सद्गुरुंची भेट झाली, तर योग्यतेची गरजच उरत नाही. सद्गुरू भेटले नाहीत तर मात्र योग्यतेची गरज! सद्गुरू जर बी.ए. झाले असतील तर तितकी योग्यता आणि बी.ए.बी.टी. झाले असतील तर तेवढी योग्यता. त्यात आपल्या योग्यतेची गरजच नसते.

**प्रश्नकर्ता :** ही दुनियादारीची योग्यता नाही, पण याची योग्यता वेगळी आहे ना?

**दादाश्री :** नाही, सद्गुरू मिळाले, म्हणजे कोणत्याही योग्यतेची गरज नाही. सद्गुरू मिळाले हेच मोठे पुण्य समजले जाते.

**प्रश्नकर्ता :** मग सद्गुरू मिळाल्यानंतर कुठलीही साधना करावी लागत नाही का? फक्त सद्गुरूंमुळेच सर्व पूर्ण होते?

**दादाश्री :** नाही, ते जे साधन सांगतात तेच सर्व करावे लागते, परंतु तिथे योग्यतेची गरज नसते. योग्यतावाल्यांच्या मनात तर असे असते की, 'मला तर हे सर्व समजतेच ना!' योग्यता तर उलट नशा चढवते. योग्यता असेल तर त्यास टाकून देण्यासारखे नाही, ती असेल तर चांगलीच गोष्ट आहे. पण आपल्याला हे समजले पाहिजे की नशा चढली असेल तर नशा उतरायला तर हवी. ती योग्यता आणि सद्गुरूंचे मिलन यामध्ये नशा बाधक ठरते. योग्यतावाले अंतर राखून असतात. आणि कमी योग्यतावाला असेल ना, तो तर असेच म्हणेल, 'साहेब, मला तर अक्कलच नाही, मी आता तुमच्या शरणी आलो आहे. तुम्हीच माझी सुटका करुन द्या.' तेव्हा मग सद्गुरू खुश होतात. बस, इतकेच म्हणण्याची गरज आहे. सद्गुरू आणखी काहीच मागत नाहीत आणि कोणती योग्यताही शोधत नाहीत.

## सद्गुरूंना सर्व समर्पण

**प्रश्नकर्ता :** फक्त सद्गुरूंची भक्ती केली पाहिजे, असे आपले म्हणणे आहे ना?

**दादाश्री :** पूर्णपणे अर्पणता असावी.

**प्रश्नकर्ता :** सद्गुरुंशी संपूर्ण समर्पणभावाने राहिले तर?

**दादाश्री :** तर काम होईल. समर्पण भाव असेल तर सर्व काम होते. मग काही शिल्लक राहणारच नाही. परंतु मन-वचन-कायेसहित समर्पण हवे.

**प्रश्नकर्ता :** असे समर्पण तर, श्रीकृष्ण भगवंत किंवा महावीर भगवंतांच्या तोडीचे असतील तरच ते समर्थ म्हटले जातील ना? की मग कोणत्याही साधारण व्यक्तीला समर्पण केले तरी चालेल?

**दादाश्री :** ते तर तुम्हाला असे विराट पुरुष वाटले तर करावे. तुम्हाला वाटेल की हे महान पुरुष आहेत, त्यांची सर्व कार्ये अशीच विराट वाटली, तर आपण त्यांना समर्पण करावे.

**प्रश्नकर्ता :** जे महान पुरुष होऊन गेलेत, म्हणजे जे हजारो वर्षांपूर्वी होऊन गेले आहेत, त्यांना आपण समर्पण केले तर त्यास समर्पण केले असे म्हणता येईल? त्यामुळे आपली प्रगती होईल का? की मग प्रत्यक्ष महापुरुषच हवेत?

**दादाश्री :** परोक्षापासून सुद्धा प्रगती होते आणि प्रत्यक्ष जर भेटले तर लगेचच कल्याण होऊन जाईल. परोक्ष, प्रगतीचे फळ देते आणि प्रत्यक्षाशिवाय कल्याण होत नाही.

समर्पण केल्यानंतर आपल्याला काहीच करावे लागत नाही. आपल्याकडे बाळ जन्माला आल्यानंतर बाळाला काहीच करावे लागत नाही, त्याचप्रमाणे समर्पण केल्यावर आपल्याला काहीच करावे लागत नाही.

तुम्ही ज्यांना समर्पणबुद्धी करता, तेव्हा त्यांच्यात जी शक्ती असेल ती शक्ती तुम्हालाही प्राप्त होते. ज्यांना समर्पण केले त्यांचे सर्व आपल्याला प्राप्त होते. जसे एका टाकीला दुसरी टाकी पाईपने जोडली तर, त्या एका टाकीमध्ये वाटेल तेवढा माल भरला असेल पण दुसऱ्या टाकीमध्ये तेवढीच लेव्हल (पातळी) होऊन जाते. समर्पण भावाचेही असेच आहे.

ज्यांचा मोक्ष झाला आहे, जे स्वत: मोक्षाचे दान देण्यास निघाले आहेत, तेच मोक्ष देऊ शकतात. तसेच आम्ही मोक्षाचे दान देण्यास निघालो आहोत. आम्ही मोक्षाचे दान देऊ शकतो. नाही तर कोणी मोक्षाचे दान देऊ शकत नाही.

**प्रश्नकर्ता :** सद्‌गुरू हे 'रिलेटिव्ह' नाहीत का?

**दादाश्री :** सद्‌गुरू हे रिलेटिव्ह आहेत, परंतु सद्‌गुरू जे ज्ञान देतात ते रियल आहे. त्या रियलमुळे आत्मरंजन होते. तो आनंद चरम कोटीचा आनंद आहे. रियल म्हणजे पर्मनेन्ट वस्तू आणि रिलेटिव्ह म्हणजे टेम्पररी वस्तू. रिलेटिव्हमुळे मनोरंजन होते.

**प्रश्नकर्ता :** तर मग सद्‌गुरू हे मनोरंजनाचे साधन आहे?

**दादाश्री :** हो! सद्‌गुरुंमध्ये ज्ञान असेल तर ते आत्मरंजनाचे साधन आणि ज्ञान नसेल तर ते मनोरंजनाचे साधन! आत्मज्ञानी सद्‌गुरू असतील तर आत्मरंजनाचे साधन. आत्मज्ञानी सद्‌गुरू असतील ना त्यांची तर निरंतर आठवण राहते, आणि तेच रियल, नाही तर सद्‌गुरूंची आठवण येतच नाही.

**प्रश्नकर्ता :** खऱ्या गुरूंना स्वत:चे सर्वस्व सोपवून दिले, त्यामुळे सर्व कार्य सिद्ध होतात. हे व्यवहारात किती अंशापर्यंत सत्य आहे?

**दादाश्री :** व्यवहारात तर हे पूर्ण सत्य आहे. गुरूंवर सोपवले तर त्याचा एक जन्म सुखाचा होतो. कारण गुरूंवर सोपवले म्हणजे गुरूंच्या आदेशानुसार चालला तर त्याला दु:ख राहत नाही.

## गुरूकृपेचे परिणाम

**प्रश्नकर्ता :** गुरू आणि गुरूकृपा यांची गोष्ट केली तर प्रश्न असा पडतो की गुरूकृपा म्हणजे काय नेमके? त्यात काही तथ्य आहे का?

**दादाश्री :** जितक्याही शक्ती आहेत ना, त्या सगळ्यांमध्ये तथ्यच असते, अतथ्य नसते. त्या सगळ्या शक्ती आहेत आणि शक्ती नेहमी काही वर्षांपर्यंत चालतात आणि नंतर हळूहळू संपत जातात.

**प्रश्नकर्ता :** गुरूंची कृपा प्राप्त करण्यासाठी शिष्याला काय करावे लागते?

**दादाश्री :** शिष्याने तर गुरूंची कृपा प्राप्त करण्यासाठी गुरूंना खुश ठेवले पाहिजे, आणखी काही करायला नको. ज्या तऱ्हेने खुश राहतील त्या तऱ्हेने त्यांना खुश ठेवावे. खुश ठेवल्याने कृपा उतरतेच. पण कृपा

किती प्राप्त होते? जितके टाकीत असेल, जितके गॅलन असतील त्याप्रमाणात होते. कृपादृष्टी म्हणजे काय? तर त्यांच्या सांगण्यानुसार करीत असतो म्हणून ते खुश राहतात, याचेच नाव कृपादृष्टी. आणि त्यांनी सांगितल्यापेक्षा उलट केले तर ते नाराज होतात.

**प्रश्नकर्ता :** मग गुरूंची कृपा सर्वांवरच असते असे नाही का?

**दादाश्री :** नाही, गुरूकृपा कित्येकांवर नसते सुद्धा. त्याने काही उलट केले तर कृपा होतही नाही.

**प्रश्नकर्ता :** मग त्यांना गुरू कसे म्हणता येईल? गुरूंची दृष्टी तर सर्वांवर सारखीच असली पाहिजे.

**दादाश्री :** हो, सारखी असली पाहिजे, पण तो मनुष्य गुरूंसोबत वाकडेपणा करत असेल तर काय करणार? ते जर ज्ञानी असतील तर एकसमानच असते. पण हे तर गुरू असतात, तिथे तुम्ही थोडा जरी वाकडेपणा केलात तर ते तुमच्यावरच उलटी करून टाकतील.

**प्रश्नकर्ता :** एकावर कृपा करतील आणि दुसऱ्यावर नाही, असे नसते. गुरूंची कृपा तर सर्वांवर एकसमानच असते ना?

**दादाश्री :** नाही, तरी पण आत जसे असेल तसे स्वत:चे फळ स्वत:ला मिळते. स्वत: उलट केले तर उलटच फळ मिळते. परंतु ज्ञानी पुरुष तर वीतरागी म्हटले जातात. त्यांना तुम्ही चापट मारली तरी देखील ते तुमच्यावर समानदृष्टी ठेवणे सोडत नाहीत. मग तुम्ही जे टाकाल, एक शिवी दिलीत तर शंभर शिव्या तुम्हाला परत मिळतील. एक फूल अर्पण केलेत तर, शंभर फुले परत मिळतील.

## अहंकार जातो कृपेमुळे की पुरुषार्थामुळे?

**प्रश्नकर्ता :** अहंकारापासून मुक्त होण्यासाठी स्व-पुरुषार्थाची गरज आहे की गुरूकृपेची गरज आहे?

**दादाश्री :** कृपेची गरज आहे. ज्यांचा अहंकार गेला असेल अशा सद्‌गुरुंच्या कृपेची आवश्यकता आहे, तेव्हाच अहंकार जाईल. अहंकार

नष्ट करणे हे गुरूचे काम नाही, हे तर ज्ञानी पुरुषांचे काम आहे! गुरू असे ज्ञान कुठून आणतील? त्यांचाच अहंकार जात नाही ना! ज्यांची ममता गेलेली नाही, त्यांचा अहंकार कसा जाईल? ते तर जेव्हा ज्ञानी पुरुष भेटतील आणि ज्या ज्ञानीपुरुषामध्ये बुद्धीचा एक अंश सुद्धा नसेल, म्हणून त्यांच्याजवळ आपला अहंकार निघून जातो.

**प्रश्नकर्ता :** मग या कलियुगात गुरूद्वारे संचित कर्म नष्ट होऊ शकतात?

**दादाश्री :** गुरूंद्वारे तर नष्ट होत नाहीत, परंतु त्यासाठी ज्ञानी पुरुष असले पाहिजेत, भेदविज्ञानी! ज्यांच्यात अहंकार नसेल, बुद्धी नसेल, असे भेदविज्ञानी असतील तर कर्म नष्ट होतात. आणि गुरू तर अहंकारी असतात, अहंकार असेपर्यंत असे काहीच होत नाही.

**प्रश्नकर्ता :** शास्त्रांमध्येही असे लिहिले आहे की गुरूगम्यच जाणले पाहिजे.

**दादाश्री :** हो, पण गुरूगम्य म्हणजे काय? आत्मा दिसला तरच त्यास गुरूगम्य म्हटले जाईल. नाही तर गुरूगम्य तर पुष्कळ लोक घेऊन फिरत असतात. आत्म्याचा अनुभव करवून दिला तर गुरूगम्य कामाचे ते तर जे आगम आणि आगमच्याही पुढे असतील, असे ज्ञानी पुरुष भेटले तर गुरूगम्य प्राप्त होते.

## गुरूमंत्र, घसरू देत नाही

**प्रश्नकर्ता :** प्रत्येक संप्रदायात आपापल्या गुरूंनी गुरूमंत्र दिलेला असतो, तर ते काय आहे?

**दादाश्री :** ते सगळे मागे पडू नयेत, घसरू नयेत यासाठी असे केले आहे. गुरूमंत्र जपून ठेवला तर तो घसरून पडणार नाही ना! परंतु त्याने मोक्षासंबंधीचे काहीच प्राप्त होत नाही.

**प्रश्नकर्ता :** गुरूंनी दिलेल्या नामस्मरणात साधारण मनुष्याने दिलेल्या नामस्मरणापेक्षा अधिक शक्ती असते का?

**दादाश्री :** गुरूंनी दिले असेल तर चांगले फळ देते. ते मग जसे गुरू, म्हणजे हे गुरूवर अवलंबून असते.

## गुरूंचे ध्यान करणे हितकारक

**प्रश्नकर्ता :** काही गुरू त्यांचे स्वत:चे ध्यान करायला सांगतात, हे योग्य आहे की नाही?

**दादाश्री :** असे आहे की, ध्यान तर गुरूंच्या सुखासाठी नाही, पण आपली एकाग्रता राहावी आणि शांती राहावी यासाठी ध्यान करायचे असते. पण गुरू कसे हवेत? आपले ध्यान टिकून राहील असे हवेत.

**प्रश्नकर्ता :** परंतु सद्गुरूंचे ध्यान करणे योग्य आहे की अन्य भगवंताच्या स्वरूपाचे ध्यान करणे योग्य आहे?

**दादाश्री :** भगवंताच्या ध्यानाविषयी माहितीच नाही तेव्हा मग काय कराल? त्यापेक्षा तर गुरूंचे ध्यान करावे. त्यांचा चहेरा तरी दिसेल! म्हणजे सद्गुरुंचे ध्यान करणे चांगले. कारण भगवंत तर दिसत नाहीत. भगवंत तर मी दाखवेल त्यानंतर भगवंताचे ध्यान होईल. तोपर्यंत ज्यांना सद्गुरू मानले आहे, त्यांचेच ध्यान करा. मी भगवंत दाखवेल, त्यानंतर तुम्हाला करावे लागणार नाही. जोपर्यंत करणे आहे, तोपर्यंत भटकणे आहे. म्हणजे काही पण करावे लागते, ध्यान पण करावे लागते तोपर्यंत भटकणे आहे. ध्यान सहज होत असते. सहज म्हणजे काहीच करावे लागत नाही, आपोआपच होत असते, तेव्हा समजावे की आता आपली सुटका झाली.

## शक्तिपात की आत्मज्ञान?

**प्रश्नकर्ता :** गुरू शक्तिपात करतात, ती काय क्रिया आहे? त्यामुळे शिष्याला काय फायदा होतो? ती सिद्धी, आत्मज्ञानासाठी शॉट कट (छोटा रस्ता) आहे का?

**दादाश्री :** आत्मज्ञानच प्राप्त करायचे आहे ना तुम्हाला? तुम्हाला आत्मज्ञानाचीच गरज आहे ना? मग त्यासाठी शक्तिपाताची गरजच नाही. शक्ती खूप डीम (क्षीण) झाली आहे का? तर मग विटामिन घ्या!

**प्रश्नकर्ता :** नाही, नाही. गुरू शक्तिपात करतात ती काय क्रिया आहे?

**दादाश्री :** पाच फूट रुंद नाला असेल आणि त्यावरून जर उडी मारता येत नसेल, उडी मारताना त्याला पुन्हा-पुन्हा अपयश हाती लागत असेल तर आपण म्हणू, 'अरे उडी मार, मी आहे ना तुझ्या पाठीशी.' तेव्हा मग तो उडी मारतो! म्हणजे गुरू अशा प्रकारे हिम्मत देतात. आणखी काय करतील? तुमची हिम्मत कमी झाली आहे का?

**प्रश्नकर्ता :** गुरूशिवाय तर हिम्मत कमीच पडणार ना!

**दादाश्री :** तर एखाद्या गुरूंना सांगा, ते तुम्हाला हिम्मत देतील आणि गुरू राजी (खुश, प्रसन्न) नसतील तर माझ्याजवळ या. गुरू राजी असतील तर माझ्याकडे येऊ नका. *राजीपो* (गुरूंची कृपा आणि प्रसन्नता)च संपादन करायचा आहे या जगात! कारण गुरूंचे काय देणेघेणे? फक्त तुम्हाला कशाप्रकारे सुख प्राप्त होईल, तुम्हाला आत्मज्ञान कसे प्राप्त होईल, हाच त्यांचा उद्देश असतो.

**प्रश्नकर्ता :** कित्येक गुरू शक्तिपात करतात, म्हणून मी हा प्रश्न विचारला.

**दादाश्री :** ते ठीक आहे. तसे करतात, ते मीही जाणतो पण याची गरज कुठपर्यंत असते? असे गुरू शक्तिपात करून दूर होतात, शेवटपर्यंत साथ देत नाहीत. ते काय कामाचे? साथ देतील ते आपले गुरू.

**प्रश्नकर्ता :** चमत्कारी गुरू असतील तर तिथे जावे का?

**दादाश्री :** ज्यांना काही लालूच असेल त्यांनी तिथे जावे. ते आपली सगळी लालूच पूर्ण करतील. ज्यांना वास्तविक हवे असेल, त्यांना तिथे जाण्याची गरज नाही. चमत्कार घडवून मनुष्याला स्थिर करतात ना, पण जर खऱ्या बुद्धीवंतांनी ते पाहिले तर त्यांना विकल्प उभा राहील!

## गुरू कुठपर्यंत पोहोचवितात?

दोन मार्ग आहेत, एक पायरी-पायरीने वर चढण्याचा मार्ग,

क्रमानुसार, क्रमिक मार्ग आणि दुसरा हा अक्रम मार्ग आहे, हा लिफ्टचा मार्ग आहे. म्हणून यात दुसरे काहीच करायचे नाही. त्या कर्मानुसार क्रमिक मार्गाने जितके गुरू केले असतील, ते गुरू आम्हाला वर चढवतात, मग गुरू सुद्धा प्रगती करतात आणि हे (शिष्य) सुद्धा प्रगती करतात असे करत-करत शेवटपर्यंत पोहोचतात. पण सर्वात प्रथम दृष्टी बदलली की, त्यानंतरचे गुरू ते खरे गुरू आणि खरा शिष्य. दृष्टी बदलत नाही तोपर्यंत सगळे बालमंदिर! हो, गुरूंसाठी मोह नक्कीच होतो, परंतु आसक्ती नसावी. आसक्ती असेल तर ती फार चुकीची गोष्ट समजली जाते. आसक्ती तर तिथे चालणारच नाही!

**प्रश्नकर्ता :** गुरूंचा मोह असेल, तर तो मोह बाधा उत्पन्न करतो का?

**दादाश्री :** मोह तर फक्त, 'माझे कल्याण करीत आहेत' एवढ्या पुरताच! कोणी म्हणेल, गुरुंमध्ये अभिनिवेश (आपल्या मतास खरे मानून धरुन ठेवणे) असेल तर? त्यास हरकत नाही. ते तर चांगलेच आहे. गुरू जिथपर्यंत पोहोचले असतील तिथपर्यंत तर पोहोचवतील. आपण ज्यांची भक्ती करू, ते जिथपर्यंत स्वत: पोहोचले असतील तिथपर्यंत आम्हालाही पोहोचवतील.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे जिथपर्यंत पोहोचले असतील, तिथपर्यंतच पोहोचवू शकतील?

**दादाश्री :** हो, आपली शास्त्रे इतकेच सांगतात की जिथपर्यंत पोहोचले असतील, तिथपर्यंत पोहोचवतील. त्यानंतर पुढे दुसरे गुरू भेटतील. आणि गुरू तर, स्वत: जितक्या पायऱ्या चढले असतील तेवढ्या पायऱ्या आपल्याला चढवतील. ते दहा पायऱ्या चढले असतील आणि आपण सात पायऱ्या चढलो असू तर आपल्याला दहा पायऱ्यांपर्यंत पोहोचवतात. अजून कितीतरी, करोडो पायऱ्या चढायच्या बाकी आहेत. या काही थोड्याथोडक्या पायऱ्या नाहीत!

## गुरूपेक्षा शिष्य सवाई...

**प्रश्नकर्ता :** जरी गुरू स्वत: शेवटपर्यंत पोहोचले नसतील, पण

जर शिष्याजवळ अधिक भक्तिभाव असेल तर तो गुरूपेक्षाही पुढे नाही का जाऊ शकत?

**दादाश्री :** हो, पण कुणी एखादाच! सगळे नाही पोहोचत. त्याला मग पुढे दुसरे गुरू करावे लागतील. एखादा असा हुशार असेल ना, तर त्याचे डोके असे चालेल आणि तो मार्ग पकडतो आणि चालून शेवटपर्यंत पोहोचतो. परंतु तो अपवादच असेल!

**प्रश्नकर्ता :** गुरूंच्या उपदेशामुळे शिष्य मुक्ती प्राप्त करतो आणि गुरू मात्र तिथल्या तिथेच राहतात, असे सुद्धा घडते का?

**दादाश्री :** हो, असे सुद्धा घडते. गुरू तिथल्या तिथेच राहतात आणि शिष्य पुढे निघून जातो.

**प्रश्नकर्ता :** तर यात पुण्याचा उदय काम करते?

**दादाश्री :** हो, पुण्याचाच उदय! अरे गुरू शिकवतात तेव्हा कित्येक शिष्य तर म्हणतात की, 'असे काही नसते!' तेव्हा त्याला नक्की 'काय असावे' याचा विचार येतो की, 'हे असे असावे.' म्हणजे त्याला लगेचच ज्ञान उत्पन्न होते. 'असे नसते' असे जर त्याला वाटले नसते तर त्याला ज्ञान उत्पन्न झाले नसते.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे 'असे नसते' असा विकल्प उभा करण्यासाठी त्याला निमित्त मिळाले?

**दादाश्री :** हो, ते निमित्त मिळाले इतकेच! त्या कारणामुळे त्याच्या ज्ञानाचा उदय झाला की 'असे असते, असे नसते, म्हणून हे असेच आहे.' अर्थात पुण्य तऱ्हेतऱ्हेचे परिवर्तन घडवून आणते. पुण्य काय करीत नाही? त्यासाठी पुण्यानुबंधी पुण्य पाहिजे.

## तेव्हा संपूर्ण शुद्धी होते

क्रमिक मार्गात कसा व्यवहार आहे? तर गुरू स्वत: जितका त्याग करतात ना, तेवढा त्याग त्यांच्या शिष्यांना करायला सांगतात की ' एवढे करा, तुम्ही एवढा त्याग करा' म्हणजे तिथे तप-त्याग या सर्व कसौटीत

उतरावे लागते. परंतु गुरूच्या कृपेमुळे त्याला आत कसलीही उपाधी वाटत नाही आणि परत त्या गुरूचे स्वत:च्या गुरूच्या कृपेने चालत असते. म्हणजे या गोष्टींचा कधी अंतच येत नाही, आणि अशीच गाडी चालत राहते. सगळे गुरू साफ करतात. एक गुरू जर केले असतील, तर ते गुरू तुमचा सर्व मळ (अशुद्धी) साफ करतात. आणि त्यांचा जो मळ असेल, तो तुमच्यात घालतात. नंतर दुसरे गुरू भेटतात, ते परत तुमच्यात जो मळ असेल तो साफ करतात आणि त्यांचा मळ तुमच्यात घालतात. ही आहे गुरू परंपरा!

जसे की कपडे धुण्यासाठी आपण साबण घालतो, तो साबण काय करतो? कपड्याचा मळ काढतो. परंतु साबण स्वत:चा मळ कपड्यात घालतो. मग साबणाचा मळ कोण काढेल? त्यावर लोक काय म्हणतात? 'अरे, साबण घातला पण टिनोपॉल का घातले नाही?' 'पण टिनोपॉल कशाला घालू? साबणाने मळ तर गेला ना!' आता हे जे टिनोपॉल पावडर असते ना आपल्याजवळ, त्याला आपले लोक काय समजतात? त्यांना असे वाटत असेल की हे कपडे पांढरे करण्याचे औषध असावे! पण नाही, ते तर साबणाचा मळ काढते पण आता या टिनोपॉलने स्वत:चा मळ घातला. त्यासाठी तू दुसरे औषध शोधून काढ की ज्यामुळे टिनोपॉलचा मळ निघेल. या दुनियेत प्रत्येक जण आपापला मळ सोडत जातो. असे कुठपर्यंत चालू राहते? जोपर्यंत शुद्ध स्फटिक औषध सापडत नाही, तोपर्यंत!

तुम्ही गुरू केले नाही आणि येथे आलात म्हणून हा फायदा झाला. जर गुरू केले असते, तर त्यांनी त्यांचा मळ चढवला असता. असा कोण असेल की जो मळ सोडत नाही? तर ज्ञानीपुरुष! ते स्वतः मलीन नसतात, शुद्ध स्वरूपच असतात आणि समोरच्याला शुद्धच बनवितात. दुसरी झंझटच नाही. ज्ञानी पुरुष नवा मळ चढवत नाहीत. अर्थात ज्ञानी पुरुषाजवळ संपूर्ण शुद्धीचा मार्ग आहे, म्हणून शेवटी ज्ञानी पुरुष भेटले, तर सर्व मळ स्वच्छ होतो!

## कमतरता चारित्र्यबळाची, शिष्यांमध्ये

क्रमिक मार्गात गुरू माथी असतात आणि त्यांच्याबरोबर फक्त दोन

किंवा तीनच शिष्य असतात, अधिक नसतात. खरे शिष्य की जे गुरूंच्या पदचिन्हांवरून चालणारे असतात, असे शिष्य दोन किंवा तीन असतात. असे आपल्या शास्त्रात विवेचन केले आहे. तो मार्ग तर खूप कठीण असतो ना! तिथे सांगतील, 'तुझे जेवणाचे ताट दुसऱ्याला द्यावे लागेल' तेव्हा म्हणे, 'नाही साहेब, मला हे जमणार नाही, मग तर मी माझ्या घरीच निघून जाईल.' कोण थांबणार तिथे! म्हणून शास्त्रकारांनी म्हटले आहे की क्रमिक मार्गातल्या प्रत्येक ज्ञानींच्या मागे दोन-चार शिष्यच झालेत, त्याहून अधिक नाही.

**प्रश्नकर्ता :** शिष्यांमध्ये इतके चारित्र्यबळ नसते का?

**दादाश्री :** हो, ते बळ कुठून आणतील? यांचे सामर्थ्यच किती असेल? सगळ्यांना जेवण वाढत असाल आणि त्याला श्रीखंड वाढले नाही, तर तो चिडत राहतो. अरे, एका दिवसापुरतेच, एकदाच जरी असे घडले तरी एवढी चिडचिड करतोस? पण तो चिडतच राहतो! अरे, त्याला दुसऱ्यांपेक्षा कमी श्रीखंड वाढले असेल तरीही चिडचिड करतो! मग असे लोक चारित्र्यबळ आणणार तरी कुठून?

आणि मी जर एखाद्या दिवशी सगळ्यांना असे सांगितले की, 'तुम्हाला आवडणारे पदार्थ वाढले गेले तर तुम्ही त्यातले थोडेसे चाखून लगेच दुसऱ्यांना देऊन टाका आणि तुम्हाला नावडते पदार्थ स्वत:साठी ठेवा' तर काय होईल?

**प्रश्नकर्ता :** सगळे निघून जातील.

**दादाश्री :** हो, निघूनच जातील. 'बरं, आम्ही निघतो दादा,' म्हणतील! नंतर दुरुनच नमस्कार करतील!!

या क्रमिक मार्गात गुरूंचे कसे असते? तर हा जो आम्ही व्यवहार करत आहोत तोच खरा आहे आणि त्याचे कर्ते आम्ही आहोत. म्हणून याचा त्याग आम्ही करायला हवा. असा व्यवहार असतो. एकीकडे व्यवहार भ्रांतीपूर्ण आणि दुसरीकडे 'ज्ञान' शोधतात, तर ते सापडेल का? आपल्याला काय वाटते? सापडेल?

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** मुळात तिथे रस्ताच उलटा आहे. तिथे! म्हणून तर क्रमिक मार्गाच्या ज्ञानींनाही चिंता आणि शिष्यानांही चिंता! निव्वळ संताप, संताप आणि संताप!! गुरूंना देखील संताप! त्या तीन शिष्यांना जर सांगितले की, 'आज तुम्ही चरणविधी कंठस्थ करून या, तुम्ही इतकी पदे (भजने) कंठस्थ करून या' तेव्हा मग एखादा शिष्य डोके खाजवतो की आता गुरूंनी सोपवले तर आहे, पण हे कसे होणार? घरी जाऊन कंठस्थ करतो, पण कंठस्थ होत नाही त्यामुळे रात्रभर मनात कुढत राहतो. वाचत जातो आणि जळफळत राहतो. चिडचिड होत असल्यामुळे गुरूविषयी अभाव निर्माण होतो की असे अवघड काम कशासाठी देतात! गुरूंनी सांगितलेले करायला आवडत नाही, मग काय होणार? अभाव होतो. हाच तर क्रमिक मार्ग. गुरू सुद्धा मनात विचार करतात की 'हे सर्व कंठस्थ केले नाही तर आज मी त्यांना खडसावेल.' आता शिष्य तिथे जातो ना, तेव्हा जाता-जाताच त्याला भीती वाटते की, 'गुरू काय म्हणतील नि काय नाही?, काय म्हणतील नि काय नाही?' अरे! मग गुरू कशासाठी केलेस? असेच राहायचे होते ना! खडसावतील याची इतकी भीती वाटत असेल तर गुरूशिवायच पडून राहायचे होते ना! नाही तर खडसावण्याचा प्रसाद घ्यायला हवा. खडसावण्याचा प्रसाद चाखायला नको का?

मग सकाळी जेव्हा ते शिष्य गुरूकडे येतात, तेव्हा त्यांच्यातला दोन शिष्यांनी गुरूंनी सांगितल्याप्रमाणे केलेले असते पण एका शिष्याला ते करता आले नसेल, तर तो गुरुंजवळ जाऊन बसतो, पण त्याच्या तोंडावरूनच साहेब ओळखतात की याने 'काहीच केलेले दिसत नाही' त्याच्या तोंडावरुनच कळते. म्हणून साहेब मनातल्या मनातच चिडत राहतात की, 'हा काहीच करत नाही, काहीच करत नाही' शिष्याने कंठस्थ केलेले नसते म्हणून त्याला ओरडतात! गुरूंचे डोळे रागाने लाल झालेले असतात, डोळे अगदी लालच असतात. हा शिष्य काही करेल असा नाही, म्हणून गुरू सारखे चिडत राहतात आणि तो शिष्य घाबरत राहतो. आता याचा मेळ कसा बसेल? म्हणून तिथे फक्त तीनच शिष्य की, जे त्यांच्या मागे

लागलेले असतात. तेवढ्याच शिष्यांना ते पोषण देऊ शकतात. बाकीचे सगळे तर दर्शन करून निघून जातात.

क्रमिक मार्गात शेवटपर्यंत बेचैनी जात नाही. गुरू आणि शिष्य, दोघांनाही बैचैनी! पण ही बैचैनी म्हणजे तप आहे. म्हणून तोंडावर तेज येते. कारण जसे भेसळयुक्त सोन्याला तापवले तरच त्यात थोडी-थोडी सुधारणा होते ना! खरे सोने लखलखू लागते ना!

## भेद, गुरूशिष्यामध्ये...

**प्रश्नकर्ता :** सामान्यत: बाहेर गुरू-शिष्य यांच्यात अंतर राहते ना, की मग ते एकरूपच राहतात?

**दादाश्री :** एकरूप झालेत की मग तर त्या दोघांचेही कल्याण होईल. पण हे तर शिष्याकडून काचेचा पेला फुटला तर गुरू चिडल्याशिवाय राहतच नाहीत. नाही तर गुरू-शिष्य जर पुण्यवान असतील आणि दोघेही एकरूप बनून राहिले तर दोघांचेही कल्याण होईल. पण असे घडत नाही. अरे, क्षणभरासाठीही स्वत:चा स्वत:वरच विश्वास बसत नाही, असे हे जग आहे, मग शिष्यांवर कसा विश्वास बसेल? शिष्याने जर कधी दोन पेले फोडले तर गुरू रागाच्या भराने डोळे वटारतात.

अर्थात नुसत्या अडचणीच, दिवसभर अडचणी! आणि गुरूंना सांगत सुद्धा नाहीत की, 'साहेब माझ्या अडचणी तुम्ही पदरी घ्या.' आणि हो, गुरूंना तुम्ही असेही विचारू शकता की, 'साहेब, आपण इतके महान असून देखील इतके का चिडता?

**प्रश्नकर्ता :** परंतु गुरूंना आम्ही असे कसे विचारु शकतो? आम्ही तर असे विचारु शकत नाही ना?

**दादाश्री :** गुरूंना विचारु शकत नसाल, मग ते गुरू काय कामाचे! शिष्यांशी मतभेद होत असेल, तेव्हा आपल्याला हे नाही कळत की यांचे तर शिष्यांशी मतभेद होतात, मग तुम्ही कसले गुरू? जर एका शिष्याबरोबरही सरळ राहू शकत नाहीत, मग तुम्ही संपूर्ण जगाशी सरळ कसे राहाल? तसे तर तुम्ही सगळ्यांना सल्ला देता की, 'भाऊ, भांडण

मुळीच करू नका'. येथे तर तुमचे कोणी नातेवाईकही नाहीत, तुम्ही एकटेच आहात, तरीही या शिष्यावर का चिडत राहता? त्याने तुमच्या पोटी जन्म तर घेतलेला नाही, मग तुम्हा दोघांमध्ये कषाय होण्याचे कारणच काय? कषाय तर या व्यवहारी लोकांना होतात. पण हा बिचारा तर बाहेरून येऊन शिष्य झाला आहे, त्याच्यावरही तुम्ही कषाय करत राहता?

एखादे पुस्तक जरी इकडे-तिकडे झाले तर गुरू काय म्हणतात? कितीतरी गोष्टी सुनावतात, की, 'तुला अक्कल नाही, तुला भानच नाही.' त्यावर शिष्य काय म्हणतो? 'पुस्तक काय मी खाऊन टाकले? येथेच कुठेतरी पडले असेल, तुमच्या झोळीत नसेल तर खाटेच्या खाली असेल.' पण शिष्य 'खाऊन टाकले? असे बोलतो! अरे, यापेक्षा तर घरातील झंझट बरी. यापेक्षा बायकोचेच शिष्य व्हावे, ती ओरडेल पण मग भजी खायलाही देते ना! काही स्वातंत्र्य तर हवे ना? म्हणजे असे गुरू भेटतात, इतकी सेवा करतो तरी सुद्धा वेड्यासारखे बोलतात, मग काय होणार?

**प्रश्नकर्ता :** बायको स्वार्थासाठी रागावते आणि ते गुरू निस्वार्थपणे रागावतात, या दोघात फरक नाही का?

**दादाश्री :** गुरूचे निस्वार्थ वागणे नसते. जगात निस्वार्थ मनुष्य कोणी नसतोच. ते निस्वार्थी दिसतात खरे पण जिकडून-तिकडून स्वार्थ करून, स्वार्थाच्याच तयारीत असतात. ते सगळे स्वार्थी आहेत, दिखावाच आहे हा सर्व. हे तर ज्याच्या लक्षात येईल तोच ओळखू शकेल.

बाकी, गुरू आणि शिष्य दोघेही भांडतच राहतात दिवसभर. दोघांचे पटतच नाही. आपण गुरूंना भेटायला जाऊ आणि विचारु की, 'हे सर्व काय आहे?' तर ते म्हणतील की, 'तो चांगला नाही, फार वाईट शिष्य भेटला आहे!' आपण ही गोष्ट शिष्याला सांगायची नाही आणि नंतर त्या शिष्याला विचारावे की, 'काय भाऊ, हे सर्व काय होते?' तर तो म्हणेल, 'हे गुरूच बेकार आहेत, इतके वाईट गुरू भेटलेत'! मग यात कोणाची गोष्ट खरी? यात त्यांचा दोष नाही. कारण काळच तसा आला आहे. या काळामुळेच असे सर्व घडत असते. पण मग असा काळ येतो तेव्हाच तर ज्ञानीपुरुष प्रकटतात!

शिष्याला कितीही येत असेल, पण हे गुरू सगळे असेच भेटतात ना! कलियुगातील गुरू कसे असतात? शिष्य म्हणतो की, 'मी तर अज्ञानी आहे, मी काही जाणत नाही' तरी सुद्धा गुरू त्या बिचाऱ्याला मारत राहतात, पुढची प्रगती करू देत नाहीत. मरेपर्यंत गुरू त्याला चुकाच दाखवत राहतात आणि पुष्कळ छळतात, हैराणच करुन टाकतात. तरी सुद्धा शिष्याला सांभाळणारेही काही गुरू असतात. पण शेवटी गुरू म्हणजे दारूखानाच समजा, कधी ना कधी फुटल्याशिवाय राहणारच नाही.

या काळात शिष्यांची सहनशक्ती नाही, आणि गुरुंमध्ये तशी उदारताही नाही. गुरुंमध्ये तर पुष्कळ उदारता असावी, अतिशय उदार मन असावे. शिष्यांचे सर्व निभावून घेण्याची उदारता असायला हवी.

## धर्म असा बदनाम झाला

शिष्याने शिव्या दिल्या तरीही समता राखतो त्याला गुरू म्हणतात. शिष्य तर निर्बळ असतोच, पण गुरू निर्बळ असतील का? तुम्हाला काय वाटते? गुरू निर्बळ नसणारच ना! कधी शिष्याकडून चूक झाली, तो जर काही उलट-सुलट बोलला तर गुरू फणा काढतात, मग शिष्य तरी कसा आज्ञेत राहील? शिष्याकडून जरी चूक झाली पण गुरूंनी चूक केली नाही तेव्हाच तो शिष्य आज्ञेत राहू शकतो. गुरूंकडूनच चूक झाली, तर शिष्य कसा आज्ञेत राहील? गुरूची एक जरी चूक पाहिली ना तरी, शिष्य आज्ञेत राहणार नाही. पण तरी सुद्धा गुरूंच्या आज्ञेत राहिला की मग कल्याणच झाले!

सगळीकडेच स्वछंदी झाले आहेत. शिष्य गुरूंना मानत नाहीत आणि गुरू शिष्याला मानत नाही! शिष्य मनात विचार करेल की, 'गुरूंना जरा अक्कल कमी आहे. म्हणून आम्ही आमच्या परीने वेगळ्या प्रकारे विचार करु. गुरू तर सांगतील, पण आम्ही तसे करू तर ना! म्हणजे हे सर्व असे झाले आहे. गुरू शिष्याला सांगतील की, 'असे कर' तेव्हा शिष्य तोंडावर 'हो' म्हणतो पण नंतर करतो काही तरी वेगळेच. इतका अधिक स्वछंद चालू आहे. कोणी एका शब्दाचेही योग्य प्रकारे पालन केले नाही. मग शिष्य म्हणेल, 'गुरू तर बोलतील, जरा चक्रमच आहेत.' म्हणजे हे सर्व असे चालत असते.

नाही तर खऱ्या गुरूशिष्यामध्ये तर प्रेमाचे बंधन इतके सुंदर असते की गुरू जे बोलतील, ते त्याला खूप आवडते. असे तर प्रेमाचे बंधन असते. पण आता तर या दोघांची भांडणेच चालू असतात. गुरू म्हणतील, 'असे कर, मी तुला सांगतोय?' पण शिष्य करीतच नाही. म्हणजे तिथे तर दिवसभर सासु-सुनेच्या कटकटीच्या भांडणांसारखे गुरू-शिष्यांमध्येही भांडणे आहेत. शिष्याच्याही मनात असे येते की, 'इथून पळून जाऊ?' पण पळून जाईल तरी कुठे बिचारा? घरातून तर पळाला, घरची अब्रू तर घालवली, आता कुठे जाईल? त्याला ठेवणार तरी कोण? नोकरीवर सुद्धा कोणी ठेवणार नाही. आता यात काय करु शकतो? गुरूंचेही माहात्म्य राहिले नाही, आणि शिष्याचेही महात्म्य राहिले नाही, आणि पूर्ण धर्मही बदनाम झाला!!

## शिष्याजवळ हवा फक्त विनय

कित्येक ठिकाणी गुरूंच्या आधारावरच शिष्य असतात. शिष्यांची संपूर्ण चिंता त्या गुरूंच्या डोक्यावर असते. अशा तऱ्हेने शिष्यांचा व्यवहार चालत राहतो. दुनियेत काही खरे गुरूही असतात, गुरूंच्या डोक्यावर काही शिष्यांचे ओझे असते आणि गुरू जे करतील ते ठीक. म्हणून शिष्यांवर जबाबदारी नाही आणि शांती राहते. कुठला तरी आधार तर हवाच ना! निराधार मनुष्य जगू शकत नाही.

**प्रश्नकर्ता :** तर मग तिथे शिष्याला काहीच करण्याची गरज नाही?

**दादाश्री :** शिष्य तर, तो बिचारा काय करू शकेल! तो जर करू शकत असता तर मग गुरूंची आवश्यकताच राहिली नसती ना? शिष्याकडून काही सुद्धा होऊ शकत नाही, तो तर गुरूकृपेमुळेच पुढची प्रगती करत राहतो. मनुष्य स्वतः काहीच करू शकत नाही.

**प्रश्नकर्ता :** गुरूची कृपा हवी, पण शिष्याला सुद्धा करावे तर लागतेच ना?

**दादाश्री :** काहीच करायचे नसते, फक्त विनय बाळगला पाहिजे. या जगात करण्यासारखे आहे तरी काय? विनय बाळगावा. दुसरे काय

करणार? हे काही खेळणी खेळायची नाही किंवा घरच्या देवघरातील मूर्तींना स्नान घालायचे नाही, असे तसे काहीच नाही.

**प्रश्नकर्ता :** पण मग स्वत: काहीच करायचे नाही? गुरूच सर्व करतील?

**दादाश्री :** गुरूच करतील, स्वत: काय करणार?

**प्रश्नकर्ता :** मग त्याला गुरू कशा तऱ्हेने पोहोचवतात?

**दादाश्री :** गुरूंनी स्वत:च्या गुरूंपासून आणलेले असते, ते त्याला देतात. हे सर्व परंपरेने चालत आलेले आहे. म्हणून गुरू जे देतील ते शिष्याने स्वीकारावे.

**प्रश्नकर्ता :** काही गुरू म्हणतात की, अभ्यास करा तर 'वस्तू' मिळेल.

**दादाश्री :** हो, बहुतेक सगळे असेच म्हणतात ना! दुसरे काय म्हणतील? 'हे करा, ते करा, ते करा.' करण्याने कधी भ्रांती जाते का? जर गुरूंच्या म्हणण्यानुसारच करायचे असेल तर असे घडणारच नाही ना? कुणी सांगितले की, 'आज खरे बोला' पण खरे बोललेच जात नाही ना? असे तर पुस्तकेही बोलतात. पुस्तके नाही का बोलत? परंतु त्यामुळे काहीच साध्य होत नाही? पुस्तकात सांगतातच ना की, 'प्रामाणिकपणे वागा,' पण कोणी वागला? लाखो जन्मांपर्यंत तेच तेच केले, दुसरे काहीच केले नाही. नुसती तोडफोड, तोडफोड, तोडफोडच केली आहे.

## वर्तेल तेवढेच वर्तवू शकेल

गुरूंकडे गेल्यावर आपल्याला काहीच पाळावे लागत नाही. पाळायचे असेल तर आपण त्यांना म्हणावे की, 'नाही साहेब, तुम्ही पाळा, मी कसे पाळणार? मी पाळू शकलो असतो तर तुमच्याकडे कशाला आलो असतो? आता नाही पाळले जात याचे काय कारण? तर समोरची व्यक्ती की जी पालन करण्यास सांगत आहे, ती स्वत:च पाळत नाही. नेहमी, जिथे गुरू पाळतात तिथे शिष्य अवश्य पालन करतोच. म्हणजे हे सगळे बनावटीच आहे. मग गुरू आपल्याला सांगतात, 'तुमच्यात शक्ती नाही, तुम्ही पालन

करीत नाहीत.' अरे, माझी शक्ती तुम्ही कशाला शोधता? तुमची शक्ती हवी. या सगळ्यांना मी सांगितले आहे की, 'माझ्यात शक्ती हवी. तुमच्या शक्तीची गरज नाही.' बाहेर तर सगळीकडे असेच आहे! गुरू बनून बसला असेल तर त्याच्याजवळ त्याची स्वत:ची शक्ती हवी. पण हे तर लोकांवरच लादतात. की, 'तुम्ही काही करीत नाही!' अरे बाबा, मी करू शकलो असतो तर तुमच्याजवळ कशासाठी आलो असतो? येथे कशाला धडपडलो असतो?' या कलियुगातील लोकांना समजत नसल्यामुळे हे सगळे वादळ सुरु आहे. नाही तर माझ्यासारखे तर उत्तर देतीलच ना? गुरू चोख (शुद्ध) असतील तर आम्हाला अवश्य प्राप्ती होतेच. आणि नाही झाली तर गुरुंमध्येच *पोल* (पोकळपणा) आहे. हो, खरोखरच *पोल* आहे, हे मी तुम्हाला सांगतो!!

*पोलचा* अर्थ मी काय सांगू इच्छितो? की गुरू एकांतात बिडी ओढत असतील तर तुमची बिडी सुटणार नाही. नाही तर का सुटणार नाही? एक्जॅक्टली झालेच पाहिजे. पूर्वी सगळ्या गुरूंचा हा रिवाजच होता. गुरू म्हणजे काय? की स्वत: सगळ्या गोष्टींचे पालन करतात. म्हणून समोरच्यांकडून सुद्धा सहजच पालन होऊ शकते. हे तुमच्या लक्षात येते का?

**प्रश्नकर्ता :** गुरू पालन करतात म्हणून आपल्याकडूनही पालन होते. हे माझ्या बुद्धीत उतरत नाही.

**दादाश्री :** मग तर त्यापेक्षा पुस्तके बरी. पुस्तके असेच सांगतात ना? 'असे करा, तसे करा, अमके करा.' तर या जिवंत गुरूंपेक्षा तर पुस्तके बरी. जिवंताच्या तर असे पाया पडावे लागते!

**प्रश्नकर्ता :** पण त्यामुळे नम्रतेचा अभ्यास होतो ना?

**दादाश्री :** त्या नम्रतेचे काय करायचे? जिथे आपल्याला काही प्राप्ती होत नाही, मग आयुष्यभर जरी तिथेच राहिलो तरी सुद्धा आपले कपडे भिजणार नाहीत, तर ते पाणी आपल्या काय कामाचे? म्हणून हे सगळे व्यर्थ, वेस्ट ऑफ टाईम अँड एनर्जी! (वेळ व शक्तीचा अपव्यय आहे.)

आपल्या लक्षात आले नाही? मी तुम्हाला सांगेन की, 'हे तुम्ही सोडून द्या' आणि तुमच्याकडून ते सुटले नाही म्हणजे समजावे की माझ्यात दोष आहे. तुमच्याकडून सुटले नाही तर तुम्ही माझ्यात दोष काढला पाहिजे. तुम्ही सर्व प्रयत्न करून सुद्धा सुटत नसेल, तर त्याचे कारण काय? तर माझ्यात दोष आहे म्हणूनच! हो, याचे कारण हे की सांगणाऱ्यात दोष असलाच पाहिजे!!

'तुम्ही असे करा, हे करा' असे कोणी वचनबळ असलेला बोलेल तर चालेल. येथे तर वचनबळच नाही, म्हणून शिष्याची गाडी पुढे चालतच नाही. ही एक प्रकारची सांगण्याची वाईट सवयच झालेली असते.

## ती समर्थताच सर्व सांभाळते

आणि सगळीकडे नियम असाच असला पाहिजे की गुरूंनीच करुन द्यायला हवे. गुरुंजवळ लोक कशासाठी जातात? हे तर गुरूंकडून होत नाही म्हणून गुरूंनी शिष्याच्या डोक्यावर लादले की, 'तुम्ही काही करा, तुम्ही करत नाही, तुम्ही करत नाही.' म्हणून मग आपल्या लोकांनीही असे मानून घेतले. गुरू ठपका देतात आणि लोक ऐकून सुद्धा घेतात! अरे, अशी दुषणे ऐकून घ्यायची नसतात. पण हे गुरू खाऊन-पिऊन पाठी लागतात. शिष्यांना ओरडतच राहतात की, 'तुम्ही काही करत नाही, तुम्ही हे करत नाही, आम्ही तुम्हाला सांगतो की तुम्ही असे करून आणा.'

साधकाची दशा तर निर्बळच असते. सगळेच साधक काही असे मजबूत नसतात. आता निर्बळ व्यक्ती तर दुसरे काय दाखवणार? निर्बळताच दाखवणार. तुम्ही तर असेच सांगायचे की, 'साहेब, तुम्हाला आम्ही जसे हवे आहोत तसे तुम्हीच आम्हाला बनवून टाका. तुम्ही तर इतक्या मोठ्या गुरूपदावर बसले आहात आणि मला करून आणायला सांगता? पण मी तर अपंग आहे, मी तर पंगू आहे, तुम्हीच मला उभे करायचे आहे. तुम्ही मला खांद्यावर उचलायचे असते की मी तुम्हाला खांद्यावर उचलायचे? असे गुरुंशी आपण असे बोललो पाहिजे ना? परंतु आपल्या देशातील लोक इतक्या नरम स्वभावाचे आहेत म्हणून गुरूने काही सांगितले तर म्हणतील की, 'हो साहेब, उद्या करून आणतो.'

अरे, असे स्पष्टपणे सांगून दे ना! असे नाही का बोलू शकत? तुम्ही का बोलत नाहीत? हे मी कोणाच्या बाजूने बोलत आहे? कोणाच्या बाजूने बोलत आहे?

**प्रश्नकर्ता :** आमच्या बाजूनेच बोलत आहात.

**दादाश्री :** हो. तुम्ही असे सांगितले पाहिजे की, 'साहेब, तुम्ही तर बलवान आहात व मी निर्बळ आहे. हे तर तुम्ही जे सांगाल ते करायची माझी तयारी आहे, नाही तर माझे सामर्थ्यच नाही, म्हणून तुम्हीच करुन द्या आणि जर करणार नसाल तर मी दुसऱ्या दुकानात जाईल. तुमच्यात बरकत असेल तर सांगा आणि बरकत नसेल तर तसे सांगा, मी दुसऱ्या दुकानात जाईन. तुमच्याकडून असंभव असेल तर मी दुसऱ्या जागी जाईन, दुसरे गुरू करेन.

अर्थात गुरू कोणास म्हणावे? तर काही करायला सांगत नाहीत, ते म्हणजे गुरू! हे तर असेच गुरू बनून बसलेत. वर सांगतात, 'पंगुम् लंघयते गिरीम्'. अरे, असे म्हणतात. पण तुम्ही तर आम्हालाच सांगता की, 'तू चाल.' तुम्हीच तर मला सांगता की, 'मला तुझ्या खांद्यावर बसव' गुरू काय म्हणतात? की 'मला तुझ्या खांद्यावर बसव.' अरे, मी पंगू आणि तुम्ही माझ्या खांद्यावर बसायचे म्हणता? हा विरोधाभासच नाही का म्हटला जाईल? तुम्हाला काय वाटते?

**प्रश्नकर्ता :** याचा अर्थ असा झाला की शिष्याने कुठलीच मेहनत करायची नाही, सगळी मेहनत गुरूंनीच करायची?

**दादाश्री :** हो, गुरूंनाच करायची. तुम्हाला जर महेनत करावी लागत असेल तर तुम्ही त्यांना विचारले पाहिजे की, 'साहेब, मग तुम्ही काय करणार आहात? ते सांगा. जर तुम्हाला काहीच करायचे नसेल आणि असा हुकूमच करायचा असेल तर त्यापेक्षा मी माझ्या घरी बायकोचा हुकूम मानेल, बायको सुद्धा पुस्तकात बघून सांगेल. तुम्ही सुद्धा पुस्तकात बघून, शास्त्र बघूनच सांगता. तेव्हा ती सुद्धा पुस्तकात बघून सांगेल. तेव्हा 'असे करा' सांगून चालणार नाही. तुम्ही काही तरी करू लागा. माझ्याकडून होत नाही, ते तुम्ही करा आणि तुमच्याकडून होत नाही ते आम्ही करू.

अशी वाटणी करून घ्या.' त्यावर ते गुरू काय म्हणतात? 'आम्ही कशासाठी करू?' तेव्हा आपण म्हणायचे, 'मग तुमच्याकडे माझे काही भलं होणार नाही शुक्रवार बदलणार नाही आणि माझा शनिवार येणार नाही.' असे आपण सांगितले पाहिजे ना?

**प्रश्नकर्ता :** पण समोरची व्यक्तीच बरोबर नसेल तर काय?

**दादाश्री :** समोरच्या व्यक्तीला पाहण्याची गरज नाही. गुरू चांगले असले पाहिजेत. समोरची व्यक्ती तर तशीच आहे. समर्थ नाहीच बिचारा. तो तर असेच म्हणतो ना की, 'साहेब, मी समर्थ नाही, म्हणून आपल्याजवळ आलो आहे. आणि मी करायचे असते का? मग ते म्हणतील, 'नाही, तुला करावे लागेल.' तर मग ते गुरूच नाहीत. जर मला करावे लागत असेल तर तुम्हाला शरण कशासाठी येऊ? तुमच्यासारख्या समर्थास कशासाठी शोधून काढले? जरा इतका विचार तर करा! तुम्ही समर्थ आहात आणि मी तर निर्बळ आहे. माझ्याने होत नाही म्हणून तर तुम्हाला शरण आलो, आणि माझ्यात जर कर्तेपण राहणार असेल मग तुम्ही कसे आहात? तुम्हीही निर्बळच म्हटले जाणार ना! तुम्हाला समर्थ कसे म्हणता येईल? कारण समर्थ तर सर्व काही करू शकतात.

ही तर गुरुंमध्ये बरकतच नाही, म्हणूनच समोरच्या व्यक्तीला ओझे वाटते. गुरुंमध्ये बरकत नाही म्हणून समोरच्या व्यक्तीचा दोष काढतात. पतीमध्ये बरकत नसेल तर पत्नीचा दोष काढतो. निर्बळ पती बायकोवर शूरता दाखवतो, अशी म्हण आहे. तसेच हे गुरू सुद्धा निर्बळ आहेत ना, म्हणून शिष्यावर जोर दाखवतात शिष्याला छळतात की, 'तुमच्याकडून काही होत नाही.' मग मोठे गुरू होऊन येथे का बसलात? अरे, काही कारण नसताना शिष्यांना का ओरडता? बिचारे ते दु:खी आहेत म्हणून तर तुमच्याजवळ आले आहेत. आणि वर तुम्ही ओरडता. घरी पत्नी ओरडते आणि येथे तुम्ही ओरडता, तर याचा कधी पार येईल?

गुरू तर ते की जे शिष्याला ओरडत नाहीत, शिष्याचे रक्षण करतात, शिष्याला आसरा देतात. या कलियुगातील गुरूंना गुरू म्हणायचेच कसे? दिवसभर शिष्याला त्रास देत राहतात. हा योग्य रस्ताच नाही ना!

भगवंताच्या वेळी कोणी असे म्हणत नव्हते की, 'एवढे करावे लागेल.' परंतु हे सगळे तर म्हणतील, 'एवढे तर करावेच लागेल' मग शिष्य काय म्हणतील? 'साहेब, काही होत नाही, काहीच होत नाही' अरे, मग तर दगड बनशील. कारण जसे चिंतन करु तसे घडून येते. 'काहीच होत नाही' असे चिंतन केले तर असेच घडेल की नाही? लोकांना हे समजत नाही म्हणून सगळा घोटाळा चालतो. नेहमी, जे गुरू करुन देत नाहीत, ते गुरू म्हणजे डोक्यावरचे ओझे. तुम्हाला डॉक्टरांना असे नाही का सांगावे लागणार की, 'मला कुठला तरी आजार आहे, पण ते मला माहीत नाही. आपणहूनच काही तरी झाले आहे. तुम्ही मला या आजारातून मुक्त करा.'

**प्रश्नकर्ता :** हो, सांगावे लागते.

**दादाश्री :** म्हणजे गुरूंनीच करून दिले पाहिजे. सगळे तेच शिकवतात. मग वाचायला सांगतात की, 'एवढे वाचून या.' पण सगळे काही तेच शिकवतात. हे तर बायका-मुले असलेले, नोकरी करणारे लोक ते बिचारे केव्हा करतील? जेव्हा की गुरुंमध्ये तर खूप शक्ती असते, अपार शक्ती असते, ते सर्वच करून देतात. गुरूंनी असे सांगितले पाहिजे की, 'तुला समजत नाही, पण मी आहे ना तुझ्या पाठीशी! मी आहेच ना! तू घाबरू नकोस.' 'तुला समजत नसेल तर तू माझ्याकडून सर्व घेऊन जा.' आणि मी सुद्धा या सगळ्यांना सांगितले आहे की, 'तुम्हाला काहीच करायचे नाही. मला करायचे आहे. तुमच्यात जी कमतरता असेल ती सर्व मला काढायची.

## दादांनी लुटवले गहन ज्ञान

मी तर काय म्हणतो की तुम्ही सगळे माझ्याबरोबर चला, तर म्हणतात, 'नाही, तुम्ही एक पाऊल पुढे.' तेव्हा मी म्हणतो की एक पाऊल पुढे पण तुम्ही माझ्याबरोबर चला. मी तुम्हाला शिष्य बनवू इच्छित नाही. मी तुम्हाला भगवंत बनवू इच्छितो. तुम्ही आहातच भगवंत, तुमचेच पद तुम्हाला देऊ इच्छितो. मी म्हणतो की तू अगदी माझ्यासारखा हो, तू तेजस्वी हो. माझी जशी इच्छा आहे, तसा तू हो ना!

मी स्वत:जवळ काहीच ठेवले नाही, सगळे काही तुम्हाला देऊन टाकले आहे. मी काही सुद्धा खिशात ठेवलेले नाही. जे होते ते सगळेच दिले आहे, सर्वस्व देऊन टाकले आहे! पूर्ण दशेपर्यंतचे दिले आहे. आणि आम्हाला तुमच्याकडून काहीच नको. आम्ही देण्यासाठी आलो आहोत, आमचे सगळे ज्ञान देण्यासाठी आलो आहोत. म्हणून तर हे सगळे उघड केले. म्हणून लिहिले आहे ना, 'दादाच भोळे आहेत, लुटवले आहे गहन ज्ञान.'

ज्ञान कोणी लुटवतच नाही ना! अरे, ते लुटवु द्या ना! तरच लोकांना शांती लाभेल, समाधान होईल. माझ्याजवळ ठेवून मी काय करू? त्याला दाबून त्यावर झोपू?

आणि नियम असा आहे की या दुनियेत प्रत्येक वस्तू जी दिली जाते, ती कमी होते, आणि फक्त ज्ञानच दिल्याने वाढते. असा स्वभावच आहे. फक्त ज्ञानच! दुसरे काहीच नाही. दुसरे सगळे तर कमी होते. मला एक व्यक्ती म्हणाली की, 'तुम्ही जेवढे जाणत आहात ते सर्व का सांगून टाकता? थोडेसे डबीत ठेवत नाही?' मी म्हटले, 'अरे, देण्यामुळे तर माझे वाढते! माझेही वाढते आणि त्याचेही वाढत जाते, तर त्यात माझे काय नुकसान आहे? मला ज्ञान डबीत ठेवून गुरू बनून बसायचे नाही की तो माझे पाय चेपत राहिल. ती मग इंग्रजांसारखी परिस्थिती होईल, त्यांनी सर्व ज्ञान डबीत ठेवले होते. 'know-how' (माहिती) चे सुद्धा त्या लोकांनी पैसे घेतले. मग तर हे सगळे ज्ञान पाण्यात बुडून जाईल. आणि आपले लोक देतच राहायचे. मोकळ्या हातांनी देत असत. आयुर्वेदाचे ज्ञान देत असत, मग दुसरे ज्योतिषविद्येचे ज्ञान देत असत, अध्यात्मज्ञान देत असत, सर्व मोकळ्या हातांनी देत असत.

आणि हे काही लपवून ठेवलेले ज्ञान नाही. येथे व्यवहारात तर गुरू थोडेसे गाठीला बांधून ठेवतात. म्हणतील, 'शिष्यात वाकडेपणा आहे, तो डोक्यावर चढून बसेल. त्याने विरोध केला तर आपण काय करणार?' कारण त्या गुरूंना व्यवहाराचे सुख हवे असते. खाण्या-पिण्याचे, वगैरे सगळे काही हवे असते. पाय दुखत असतील तर शिष्य पाय चेपून देतात. तो शिष्य जर त्यांच्यासारखाच झाला तर मग तो पाय चेपणार नाही, मग काय होईल? म्हणून ते थोड्या चाव्या स्वत:जवळ ठेवतात.

म्हणजे गुरूंचे मत असे असते की आपण दहा टक्के आपल्याजवळ अनामत ठेवावे आणि बाकीचे द्यावे. त्यांच्याकडे सत्तर टक्के असेल, त्यापैकी १० टक्के अनामत ठेवतात. जेव्हा की माझ्याजवळ पंच्याण्णव टक्के आहे, ते सगळेच तुम्हाला देतो. तुम्हाला पचले तर पचले नाही तर जुलाब होतील. पण काही तरी फायदा तर होणारच ना!

म्हणून सध्या असे गुरू घुसले आहेत की जे डबीत थोडेसे ठेवून मग बाकीचे देतात. शिष्य समजतात की, 'अजूनपर्यंत आम्हाला मिळत नाही, पण हळूहळू मिळेल.' मग गुरू हळूहळू देतात. पण आत्ताच सर्व देऊन टाक ना की ज्यामुळे त्याचे मार्गी लागेल. कोणी देतच नाही ना! लालची लोक देतील का? ज्यांना संसाराची लालूच आहे तो मनुष्य जितका जाणत असतो तितके पुरेपूरे ज्ञान सरळ-सरळ देऊ शकत नाही. लालचीपणामुळे स्वत: जवळ ठेवतो.

**प्रश्नकर्ता :** पण त्यांना शिष्य भेटला आहे तो देखील लालचीच भेटला आहे ना! त्याला सर्व काही मिळवून घ्यायचे आहे ना?

**दादाश्री :** शिष्य तर लालचीच आहे. माझे म्हणणे आहे की शिष्य तर लालचीच असतो. त्या बिचाऱ्याची इच्छा तर आहे की, 'मला हे ज्ञान मिळाले तर बरे.' तशी लालूच असतेच. पण हे गुरू सुद्धा लालची? ते कसे परवडेल? म्हणून स्वत: एडव्हान्स होत नाहीत, स्वत: प्रगती करत नाहीत आणि शिष्यांना सुद्धा संकटात टाकतात. तर आता हे सर्व असे झाले आहे या हिंदुस्तानात.

## आणि असे मार्गी लावले

गुरू चांगले असतील तर दुसरी कुठली झंझट होत नसते. या काळात खरे गुरू मिळणे, व्यापारी (मनोवृत्ती) नसतील अशा गुरूंची भेट होणे, हे खूप मोठे पुण्य समजले जाते. नाही तर गुरू काय करतात? शिष्याकडून शिष्याचा उणेपणा काढून घेतात आणि मग त्या उणेपणाचाच लगाम पकडतात आणि जीव नकोसा करतात. तो बिचारा स्वत:चा उणेपणा गुरूंना नाही सांगणार तर कोणाला सांगणार?

**प्रश्नकर्ता :** सध्या काही गुरू आहेत, जे फक्त नावापुरते गुरू आहेत पण ते प्रत्यक्षात लोकांचे शोषणच करत असतात.

**दादाश्री :** आणि एखाद-दोन गुरू खरे असतील, सरळ असतील, पण त्यांच्यात योग्यता नसते. आणि ढोंगी गुरू तर खूप हुशार असतात आणि तऱ्हेतऱ्हेचे दिखावे करतात.

**प्रश्नकर्ता :** कोणताही मनुष्य मुक्त होण्यासाठी गुरूंचा आश्रय घेतो, पण त्या गुरूंच्या कचाट्यातून मुक्त होऊ शकत नाही. म्हणून गुरूपासून सुद्धा मुक्त होण्याची गरज असते, असे नाही का वाटत?

**दादाश्री :** हो, मला सुरत शहरात एक शेठ भेटले होते, ते मला म्हणू लागले, 'साहेब, मला वाचवा.' मी म्हटले, 'काय आहे? तुझे काही नुकसान झाले आहे का?' तेव्हा ते म्हणाले 'माझ्या गुरूंनी असे सांगितले आहे की 'मी तुझा सत्यानाश करीन.' त्यांनी खरोखर असे केले तर? माझे काय होईल? मग मी त्याला विचारले, 'त्यांच्याबरोबर तुझा असा काही व्यवहार झाला आहे का की ते इतके कठोर शब्द तुम्हाला बोलले? त्यांच्याशी काही देण्याघेण्याचा व्यवहार आहे? असे काही असेल, तर सांग ना?' तेव्हा त्यांनी सांगितले, 'माझे गुरू म्हणतात की, 'पन्नास हजार रुपये पाठवून दे, नाही तर मी तुझा सत्यानाश करीन' अरे, त्यांच्याशी तू पैशांचा व्यवहार केलास? तू उधार घेतलेस? त्यावर तो म्हणाला, 'नाही, उधार नाही पण ते जेव्हा जेव्हा म्हणतील की पंचवीस हजार दे, नाही तर तुझे सर्व बिघडेल, ते मग तुझे तुलाच माहीत, म्हणून मी घाबरून त्यांना पैसे देत होतो. आजपर्यंत सव्वा लाख रुपये देऊन झालेत. आता आणखी पन्नास हजार रुपये माझ्याजवळ नाहीत, मग मी कुठून आणू? म्हणून आता त्यांनी निरोप पाठवला आहे की तुला पूर्ण उध्वस्त करून टाकीन.'

तेव्हा मी सांगितले, 'भाऊ, चल, आम्ही तुला रक्षण देऊ. तू बरबाद होणार नाहीस. तुझे गुरू जे काही करतील, त्यासाठी आम्ही तुझे सहाय्यक बनू, तुला बरबाद होऊ देणार नाही. पण आता तिथे काहीही पाठवू नकोस. प्रेम वाटले, उत्साह वाटला तर पाठव. पण भीतीपोटी पाठवू नकोस. नाही

तर ते अधिकच उसळतील. तू घाबरू नकोस. तुझ्या गुरूंच्या विरुद्ध चिंतन करू नकोस. कारण तुझ्या चुकीमुळे गुरूंनी पैसे घेतले आहेत, त्यांच्या चुकीमुळे घतलेले नाही.

त्याच्याच चुकीमुळे पैसे घेतले ना! त्याला काही लालूच असेल तेव्हाच ना! काही लालूच असेल तेव्हाच त्याने हे गुरू केले होते ना! आणि तेव्हाच त्याने पैसे दिले ना! म्हणजे लालचीपणामुळेच फसले गेले. आणि हे लोक हातात आलेले सोडत नाही. दुषमकाळातील लोक, त्यांना स्वत:ची अधोगती होईल किंवा काय होईल, याची पर्वाच नसते. शिकार हातात यायला हवी. पण ते तर काय म्हणतात 'आमचे भक्त आहेत' असे म्हणतात ना? 'शिकार' म्हणत नाहीत, तेवढे बरे आहे आणि ते शिकारी लोक तर 'शिकार' म्हणतात.

मग मी त्याला विचारले, 'तू गुरूंच्या नावाने काही केले का?' त्याने सांगितले, 'हो, त्यांच्या फोटोची मी पूजा करीत होतो, तो मग तापी नदीत टाकून आलो.' त्यांनी मला खूप त्रास दिला, म्हणून मला खूप राग आला! म्हणून टाकून दिला. अरे, पण फोटोची पूजा कशाला केलीस? आणि पुजले होतेस तर मग तापीमध्ये का टाकलेस? गुरूंनी तुला असे सांगितले नव्हते की तू पूजा करून तापीमध्ये टाकून ये. नाही तर आधी पूजाच करायची नव्हती. पूजा केलीस म्हणून जबाबदारी तुझी आहे. हे तर तू चुकीचे केलेस. कालपर्यंत भक्ती करीत होतास आणि आज पाण्यात टाकलास! भक्ती करणारा तू आणि उपटून टाकणारा सुद्धा तूच. स्वत:च भक्ती करणारा आणि स्वत:च उपटून टाकणारा! हा गुन्हा आहे की नाही? मग भक्ती कशासाठी केलीस? आणि जर उपटायचे असेल तर विधिपूर्वक उपटून टाकावे. असे चालणार नाही. कारण ज्या फोटोची आजपर्यंत पूजा करत होतास, त्यास उद्या नदीत विसर्जन करणे, ही तर हिंसा म्हटली जाईल. आपण जाणतो की हा भगवंताचा फोटो आहे तरी पण त्याला पाण्यात बुडवणे ही आपली चूक आहे. जाणत नसू आणि अजाणतेपणी केले असेल तर हरकत नाही.

**प्रश्नकर्ता :** गुरूंनी असे केले म्हणून तर त्याला टाकून द्यावे लागेल ना? गुरू निमित्त बनलेच ना त्यात? ते दोषी ठरले ना?

**दादाश्री :** गुरूंनी जरी काहीही केले, तरी पण आपल्या हातून चूक होता कामा नये. आपल्या चुकीमुळे कर्मे आपल्यालाच भोवतात व त्यांनी केलेले चुकीचे कर्म त्यांना भोवते. तुम्ही माझा अपमान केला, शिव्या दिल्या आणि जर मी रागावलो तर ते कर्म मला भोवेल. मला तसे करण्याची गरजच काय? तुम्ही तर कर्म बांधाल. तुम्ही श्रीमंत असाल, शक्तीशाली असाल तर बांधा. आमच्यात तशी शक्ती सुद्धा नाही आणि आमची तशी श्रीमंतीही नाही! तशी शक्ती असेल तर कर्म बांधू ना! तेव्हा आपण असे म्हणू नये. हा कुत्रा चावला म्हणून काय आपण सुद्धा चावायचे? तो तर चावणारच ना!

**प्रश्नकर्ता :** अशा गुरूंचे फोटो नदीत टाकल्याने पाप कसे काय लागेल?

**दादाश्री :** असे बोलायचे नसते. आपण असे बोलू नये. त्या गुरुंमध्ये भगवंताचा वास आहे. ते गुरू भले वाईट असतील, पण त्यांच्यात भगवंत विराजमान आहेत ना! आपण त्यांना निर्दोषच पाहायला हवे. पूर्व जन्माचे कोणते तरी पाप असेल म्हणून आपण फसलो आणि असे गुरू भेटले, नाही तर भेटलेच नसते ना! मागच्या जन्माचा ऋणानुबंध म्हणूनच ते भेटले ना! नाही तर कसे भेटतील? दुसऱ्या कोणाला नाही आणि आपल्याच वाट्याला का आले?

नंतर त्यासाठी आम्ही विधी केला आणि त्याला सांगितले की, 'गुरूंच्या नावाने वाईट बोलू नकोस, त्यांच्याविषयी वाईट विचार करू नकोस. गुरूंसाठी वैरभावना ठेवू नकोस.' त्याच्याकडून मनापासून प्रतिक्रमण करवून घेतले, हे सगळे शिकवले. त्या व्यक्तीला योग्य रस्ता दाखवला आणि नदीत फोटो टाकला, त्याचा कशा तऱ्हेने विधी करावा तेही मी त्याला सांगितले. नंतर त्याचे मार्गी लागले.

मग तो वर्षभर गुरूकडे गेलाच नाही, तेव्हा गुरूंना समजले की कुणीतरी त्याला आमच्यापासून वेगळे केले आहे. वर्षभरानंतर गुरूंनी पत्र पाठवले की, 'तुम्ही या, तुम्हाला अजिबात त्रास देणार नाही.' ही जी पीट खाण्याची सवय आहे, लोभ-लालूच आहे तीच त्याला मारते! परंतु तो

आता तिथे जात नाही. कारण ही मासळी जर एकदा पकडल्यानंतर सुटली तर पुन्हा जाळ्यात सापडते का? जो लोभी-लालची असेल त्याला गुरू करू नये. लालची नसेल, स्वतंत्र असेल त्याला गुरू करावे. गुरू म्हणतील, 'चालते व्हा' तेव्हा म्हणावे 'साहेब, जशी तुमची मर्जी. आमचे घर आहेच, नाही तर माझी बायको सुद्धा माझी गुरूच आहे!'

## नाही तर बायकोला ही गुरू बनवू शकता

गुरू करणे जमत नसेल आणि गुरूंशिवाय चैन पडत नसेल तर बायकोला सांगा, तू उलटी फिरुन बस. मी तुझा गुरू म्हणून स्वीकार करेन. तोंडाकडे पाहू नकोस, हं! वळून बस म्हणायचे! जिवंत मूर्ती आहे ना!

हो, म्हणजे बाकोलाच गुरू बनवा. तुम्ही काय कराल? लग्न केले नाही का अजून?

**प्रश्नकर्ता :** लग्न केले आहे ना!

**दादाश्री :** मग तिला गुरू बनवा. ती तर आपल्या घरातलीच आहे ना. तूप सांडले तरी खिचडीमध्येच राहिल ना!

**प्रश्नकर्ता :** त्यामुळे काय फायदा? ज्ञानी हवे ना?

**दादाश्री :** तर आता बाहेरचे गुरू सुद्धा काय देणार आहेत? बाकी, बायकोला तर सगळ्यांनीच गुरू बनवलेलेच असते. कोणी तोंडानी स्पष्ट बोलत नाही एवढेच.

**प्रश्नकर्ता :** पण सगळ्यांसमोर असे बोलू शकत नाही ना!

**दादाश्री :** बोलत नाहीत, पण मी जाणतो सगळ्यांना. मी म्हणतो सुद्धा की अजून 'गुरू' आले नाहीत तोपर्यंत हा शहाणा दिसतो, पण तिला येऊ तर द्या! आणि त्यात काही हरकतही नाही. पण आपली अक्कल अशी असायला हवी की तिचा फायदा करुन घ्यायचा नाही. आपल्यासाठी भजी बनवते, जिलेबी बनवते, लाडू बनवते मग तिला गुरू बनवायला काय हरकत आहे? बाहेरच्या गुरूसाठी उल्हास येत नसेल तर बायकोलाच

सांगा, 'तू माझी गुरू, मी तुझा गुरू, चल ये बघू! उल्हास तर येईल ना! तिचा सुद्धा उल्हास वाढेल. ज्याला पाहून उल्हास वाटणार नाही त्याला गुरू बनवण्यापेक्षा बायकोलाच गुरू बनवले तर काय वाईट? कारण आत भगवंत बसले आहेत! मग ती शिकलेली असो किंवा नसो, त्याची काहीच किंमत नाही!

म्हणजे चांगले गुरू मिळाले नाही, तर शेवटी बायकोलाही गुरू बनवा! कारण गुरूला विचारून चाललेले उत्तम! विचारलेच नाही तर मग भटकत राहील. 'तुझे काय म्हणणे आहे? तू म्हणशील तसे करू' असे आपण विचारावे. आणि बायकोने नवऱ्यामध्ये गुरूस्थापना केली पाहिजे की, 'तुम्ही काय म्हणता, त्याप्रमाणे मी करीन,' हे दुसरे गुरू-ढोंगी गुरू करण्यापेक्षा तर (हे चांगले) कारण घरात काही भानगड तर नाही! म्हणून बायकोला गुरू मानून सुद्धा स्थापना करावी. परंतु एक तरी गुरू पाहिजे ना!

## गुरू मिळाले तरी सुद्धा?

**प्रश्नकर्ता :** गुरूदेव म्हणून मी एका संतांचा स्वीकार केला आहे, तर आता मी जप करण्यासाठी त्यांचे नामस्मरण करण्याऐवजी दुसऱ्यांचे नामस्मरण करू शकतो का?

**दादाश्री :** आपल्याला जर उणीव वाटत असेल तर दुसऱ्यांचे नामस्मरण करा. पण उणीव वाटते का कधी? नाही. मग क्रोध-मान-माया-लोभ होत नाहीत ना?

**प्रश्नकर्ता :** असे तर आत सगळे काही होते.

**दादाश्री :** मग चिंता?

**प्रश्नकर्ता :** चिंता वाटते, पण थोडी!

**दादाश्री :** चिंता आहे मग ज्यांचे नाव घेण्याने चिंता होत असेल त्यांचे नामस्मरण करण्याचा अर्थच काय आहे? मिनींगलेस! क्रोध-मान-माया-लोभ होत असतील तर त्या नाम स्मरणचा काय उपयोग? असे क्रोध-मान-माया-लोभ तर दुसऱ्यांना सुद्धा होतात आणि तुम्हाला सुद्धा होतात, म्हणजे तुमचे काम पूर्ण झाले नाही.

तर मग आता दुकान (गुरू) बदला. कुठपर्यंत एकाच दुकानात पडून राहणार? तुम्हाला पडून राहायचे असेल तर पडून राहा, बाकी मी तर तुम्हाला हा सल्ला देतो. तुमचे काम झाले असेल तर तिथे राहण्यास हरकत नाही. त्या एकाच जागी राहिले तर दुसऱ्या जागी लुडबुड करण्याची आवश्यकता नाही.

मतभेद होत असतील तर मग गुरूदेवांनी काय केले? गुरूदेव ते की जे सर्व दु:खं टाळतात.

**प्रश्नकर्ता :** त्या गुरूंची गोष्ट ठीक आहे. पण हे तर मी माझ्या अंत:स्फुरणेने गुरूंचा स्वीकार केला होता.

**दादाश्री :** ते ठीक आहे. त्यात काही हरकत नाही. पण आपण बारा वर्षांपर्यंत औषध घेतले आणि आतला रोग बरा झाला नाही तर जळो ते डॉक्टर! आणि जळो ते औषध! ठेव ते त्यांच्या घरी? अनंत जन्मात हेच केले, आणि भटकतच राहिलो!

**प्रश्नकर्ता :** परंतु त्यात गुरूदेवांची चूक काढायची की माझी स्वत:ची चूक?

**दादाश्री :** गुरूंची चूक! आता माझ्याजवळ साठ हजार लोक आहेत पण त्यांच्यापैकी कोणास दु:ख असेल तर ती माझीच चूक. त्या बिचाऱ्यांची काय चूक? ते तर दु:खी आहेत म्हणून तर माझ्याजवळ आले आहेत. तेव्हा ते जर सुखी झाले नाहीत तर ती माझीच चूक.

हे तर गुरूदेवांनी जबरदस्तीने डोक्यात ठसवले होते, कारण की ते स्वत: कोणाला सुखी करू शकत नाहीत, म्हणून म्हणतात, 'तुम्हीच वाकडे आहात म्हणून असे होत आहे.' वकील आपल्या अशिलास काय म्हणतात की, 'तुझे कर्म फुटके आहे, म्हणून असे उलटे झाले.'

नाही तर गुरू कसे असले पाहिजेत? की जे आपली सर्व दु:खं दूर करतील! बाकीच्यांना गुरू कसे म्हणावे?

**प्रश्नकर्ता :** पण मला माझ्या प्रकृतीचा दोष वाटतो आहे.

**दादाश्री :** प्रकृतीचा दोष नाही. गुरू तर आपली प्रकृती कशीही असो पण अंगावर घेतात. हे तर असेच गुरू बनून बसले आहेत. लोक तर कुठल्याही दुकानात बसून गयावया करतात. ते असे पाहत नाहीत की क्रोध-मान-माया-लोभ कमी झाले आहेत की नाही? मग याचा काय फायदा? परंतु आपल्या लोकांची हीच वाईट सवय आहे. ज्याच्या दुकानात बस्तान बसवले मग तिथे हे पाहत नाहीत की यांचे क्रोध-मान-माया-लोभ गेले? उणीवा गेल्या? मतभेद कमी झाले? चिंता कमी झाली? संताप कमी झाला? आधी-व्याधी-उपाधी कमी झाली? तर म्हणे, 'काहीच कमी झालेले नाही.' अरे, मग सोड ना, या दुकानातून निघून जा ना, इतकेही समजत नाही?

ही तर सगळी गुरूंचीच चूक आहे. कुठलेही गुरू (सोडण्यासाठी) हो म्हणत नाही. मी तर खरी गोष्ट सांगण्यासाठी आलो आहे. माझा कुणाबरोबर भेद नाही किंवा कुणाबरोबर काही भानगड नाही! बाकी, कोणी गुरू हो म्हणणार नाही. कारण त्यांची ध्वजा ठीक नाही. गुरू बनून बसलेत, लोकांच्या डोक्यावर चढून बसलेत!

## क्लेश संपवतील, ते खरे गुरू

गुरू तर तेच की आपल्याला अशी समज देतात की ज्यामुळे क्लेश होणार नाही. महिनाभरात कधीही क्लेश होणार नाही, अशा तऱ्हेने समजावतील, त्यांना गुरू म्हणता येईल. आपल्याला क्लेश होत असेल तर समजावे की गुरू मिळाले नाहीत. *कढापा-अजंपा* (बैचेनी, अशांती, क्लेश) होत असेल तर गुरू करण्यात काय अर्थ? गुरूंना आपण सांगितले पाहिजे की, 'साहेब, तुमचा *कढापा-अजंपा* गेलेला वाटत नाही, नाही तर माझा *कढापा-अजंपा* का जाणार नाही? माझा जाईल असे असेल तरच मी आपल्याकडे पुन्हा येईल.' नाही तर 'राम राम, जय सच्चिदानंद' म्हणावे! अशी दुकाने फिरून-फिरून तर आतापर्यंत अनंत जन्म भटकलो! आणि काही होत नसेल तर गुरूंना सांगावे की 'साहेब, 'तुम्ही खूप महान आहात, पण आमच्यात काहीच बदल होत नाही म्हणून जर काही उपाय असेल तर करून बघा, नाही तर आम्ही

आता इथून निघून जाऊ.' असे स्पष्ट सांगायला नको का? आम्ही दुकानात जातो तेव्हा सांगतो की 'भाऊ रेशमी माल नसेल तर जाऊ द्या, आम्हाला खादी नको.'

गुरू तर आम्ही ज्यांची समजून-उमजून पूजा केली असेल, आपला सगळा मालकी भाव सोपवला असेल, त्यांना गुरू म्हणता येईल. नाही तर कसले गुरू? आपला अंधार (अज्ञान) दूर केला असेल, व त्यांनी दाखवलेल्या रस्त्यावर आपण चाललो तर क्रोध-मान-माया-लोभ कमी होत जातील, मतभेद कमी होत जातील, चिंता-क्लेश अजिबात होणार नाही. क्लेश झाले तर ते गुरू नाहीच मुळी, ते सगळे खोटे आहेत!

## एकाच गुरूकडे मनुष्य जन्म वाया घालवू नका

लोक तर एक गुरू करून थांबले आहेत. आपण थांबू नये. समाधान होत नसेल तर गुरू बदलावेच. जिथे आपल्या मनाचे समाधान वाढेल, असंतोष होत नसेल, जिथे मनाला थांबावेसे वाटत असेल तिथे थांबावे. नाही तर दुसरे लोक थांबले आहेत, म्हणून तुम्ही थांबू नका. कारण त्यामुळेच तर अनंत जन्म बिघडले आहेत. मनुष्यत्व पुन्हा-पुन्हा येत नाही आणि तिथे थांबून राहिलात, तर आपला जन्म वाया जाईल. असे करता-करता शोधता-शोधता केव्हा तरी भेट होईल. भेट होईल की नाही? आपल्याला मुख्य वस्तू शोधायची आहे. आणि शोधणाऱ्याला ती सापडतेच. ज्याला शोधायचेच नाही, आणि 'आमचे मित्र जिथे जातात तिथे आम्हीही जाऊ,' मग काय? बिघडलेच सर्व.

## व्यवहारात गुरू : निश्चयात ज्ञानी

**प्रश्नकर्ता :** आम्ही ज्यांचा गुरू म्हणून स्वीकार केला आहे ते ज्ञानी नाहीत, ज्ञानी तर आपण म्हटले जाता. तर गुरू आणि ज्ञानी दोघांना सांभाळायचे की मग गुरूंना विसरून जायचे?

**दादाश्री :** आम्ही 'गुरू राहू द्या' असे म्हणतो. गुरू तर हवेतच सगळीकडे, व्यावहारिक गुरू असतील तर ते आपले हितेच्छु म्हटले

जातात, ते आपले हित पाहतात. व्यवहारात काही अडचण आली तर त्यांना विचारायला जावे लागते. व्यावहारिक गुरू तर हवेच, त्यांना आपण सोडायचे नाही आणि ज्ञानी पुरुष तर मुक्तीचे साधन दाखवतात, व्यवहारात हस्तक्षेप करीत नाहीत. ज्ञानीपुरुष तर मोक्षासाठी आहेत. आपल्या गुरूंचे आणि त्यांचे काही देणेघेणे नाही.

आधीच्या गुरूंना सोडायचे नाही. गुरू तर राहूच द्यावे. गुरूंशिवाय व्यवहार कशा तऱ्हेने चालवाल? आणि निश्चय जाणायचे असेल तर ज्ञानी पुरुषांकडून जाणू शकतो. व्यावहारिक गुरू संसारात मदत करतात, संसारात आम्हाला जी समज लागते ती समज देतात, व पुढची सगळी मदत करतात, काही अडचण असेल तर सल्ला देतात. अधर्मापासून मुक्त करतात आणि धर्म दाखवतात. ज्ञानी तर धर्म व अधर्म दोन्हीही सोडवतात आणि मुक्तीच्या दिशेकडे घेऊन जातात. आपल्या लक्षात आले ना? व्यावहारिक गुरू संसारात आपल्याला सांसारिक धर्म शिकवतात. कोणते चांगले काम करावे आणि कोणते वाईट काम सोडावे, या सगळ्या शुभ-अशुभच्या गोष्टी आपल्याला समजावतात. संसार तर राहणारच आहे, म्हणून ते गुरू राहू द्यावे आणि जर मोक्षास जायचे आहे, तर त्यासाठी ज्ञानीपुरुष, ते वेगळे! ज्ञानीपुरुष, हे भगवंत पक्षाचे म्हटले जातात.

## विसरू नये गुरूंचे उपकार

**प्रश्नकर्ता :** 'दादांना' भेटण्यापूर्वी कुणाला गुरू मानले असेल तर? तर त्याने काय करावे?

**दादाश्री :** तर त्यांच्याकडे जायचे ना! आणि जायचे नसेल तर जायलाच पाहिजे असे अनिवार्यही नाही. आपल्याला जायचे असेल तर जावे आणि जायचे नसेल तर नका जाऊ. त्यांना दु:ख होऊ नये म्हणून सुद्धा गेले पाहिजे. आपण विनय ठेवावा. येथे 'ज्ञान' घेताना मला कोणी विचारले की 'आता मी गुरूंना सोडून देऊ?' तेव्हा मी सांगतो की, 'सोडू नका.' अरे, त्या गुरूंच्या प्रतापानेच तुम्ही इथपर्यंत आलात. गुरूंमुळे मनुष्य काही मर्यादेत राहू शकतो. गुरू नसेल ना, तर मर्यादाच राहत नाही आणि गुरूंना आपण सांगू शकतो की, 'मला ज्ञानीपुरुष मिळाले

आहेत, त्यांचे दर्शन करण्यास जात आहे.' काही लोक तर आपल्या गुरूंना सुद्धा माझ्याजवळ घेऊन येतात, कारण गुरूनां सुद्धा मोक्ष हवाच असतो ना!

**प्रश्नकर्ता :** एकदा गुरू केले असतील आणि मग सोडून दिले तर काय होईल?

**दादाश्री :** पण गुरूंना सोडण्याची गरजच नाही. गुरूंना का सोडायचे? आणि मी कशासाठी सोडण्यास सांगेन? त्या भानगडीत मी कशाला पडू? त्यामुळे जे उलट परिणाम होतील, त्याचा गुन्हेगार मी ठरेन! आता त्या गुरूंची मनधरणी करून आपण त्यांच्याशी काम घेतले पाहिजे. असे आपण करु शकतो. आपल्याला जर या भाऊंकडून काम करवून घेता येत नसेल, जमत नसेल तर आपण त्यांच्याकडून कमी कामे घ्यावीत. पण सहज त्यांच्याकडे येणे-जाणे ठेवावे, त्यात काय हरकत काय आहे?

**प्रश्नकर्ता :** समजा आधी कोणी दुसरे गुरू केले असतील, नंतर आपण भेटलात, मग ते चहासारखे आणि हे जिलेबीसारखे होईल, त्याचे काय?

**दादाश्री :** चहा-जिलेबीसारखे होईल, ती वेगळी गोष्ट आहे. ते साहजिकच आहे. आम्ही जर असे म्हटले की, 'त्यांना सोडून द्या' तर ते उलट चालतील. म्हणून सोडून चालणार नाही. अगोड लागले तर अगोड पण सोडायचे नाही. त्यांना दु:ख होऊ नये म्हणून कधीतरी आपण जाऊन त्यांचे दर्शन घ्यावे. त्यांना असे वाटता कामा नये की, 'हा येत होता आणि आता येत नाही.' त्यांना जर कळले की तुम्ही आता दुसऱ्या जागी जातात, तर म्हणावे, 'आपल्या आराधनेमुळेच तर मला हा फायदा मिळाला आहे ना! आपणच या रस्त्याने मला चालायला शिकवले ना!' मग त्यांना आनंद वाटेल. आत्मसन्मुखताचा मार्ग कसा आहे? कोणी चहाचा एक कप जरी पाजला असेल ना, तर त्यालाही विसरायचे नाही. तुम्हाला हे कसे वाटते?

**प्रश्नकर्ता :** समजले नाही म्हणून हे विचारले.

**दादाश्री :** ठीक आहे, विचारून पक्के केले ते चांगले. प्रत्येक गोष्ट विचारून पक्की करावी.

म्हणजे आपण त्यांचा तिरस्कार करता कामा नये. ज्यांना गुरू केले असेल त्यांचा तिरस्कार करणे म्हणजे भयंकर गुन्हा म्हटला जातो. आपण त्यांच्याकडून काही तरी मिळवले होते ना? काही तरी मदत झालीच असेल ना? त्यांनी तुम्हाला एखादी पायरी तर चढवली असेल ना? म्हणून तुम्ही त्यांचे उपकार मानले पाहिजेत. म्हणजे आत्तापर्यंत जे प्राप्त झाले, त्याचे उपकार तर आहेतच ना! आपल्याला काही लाभ झाला तो विसरू शकत नाही ना! म्हणून गुरूंना सोडायचे नसते, त्यांचे दर्शन करायला हवे. त्यांना सोडले तर त्यांना दुःखं होईल, मग तो आपला गुन्हा म्हटला जाईल. तुमचे उपकार माझ्यावर असतील आणि मी तुम्हाला सोडून दिले तर तो गुन्हा म्हटला जाईल. म्हणून सोडता कामा नये, नेहमीच उपकार मानले पाहिजेत. एखादा छोटा उपकार जरी केला असेल आणि विसरून गेला, तर ती व्यक्ती खरी म्हटली जात नाही.

म्हणून गुरू असू द्या. गुरू असू द्यावे. गुरूंना दूर करु नका. कोणीही गुरू असेल तर त्यांना हटवण्याची गोष्ट करू नये. या दुनियेत हटवण्यासारखे काहीच नाही. हटवायला जाल तर आपण ज्यांच्या आधाराने चालत होता, त्यांचे विरोधी झालात असे म्हटले जाईल. विरोधी होण्याची आवश्यकता नाही.

## शिष्याच्या दृष्टिकोनातून

**प्रश्नकर्ता :** कोणत्या प्रकारच्या गुरूंना शरण गेले तर आत्म उन्नती संभव आहे?

**दादाश्री :** गुरू म्हणजे कधीच, आयुष्यभर आपल्या मनातून उतरणार नाहीत असे गुरू असावेत. जेव्हा पाहू तेव्हा मनात उल्हासच वाटला पाहिजे. जर असे गुरू भेटले तर त्यांना शरण जा.

**प्रश्नकर्ता :** आम्हाला वाईट विचार आला आणि लगेचच आम्ही भावना बदलतो. परंतु यात आपल्याला गुरूकृपा कितपत सहाय्यक होते?

**दादाश्री :** गुरूकृपेमुळे तर खूप मदत मिळते. परंतु आपली तशी भावना, तसे प्रेम असायला हवे. ज्यांच्यशिवाय आपल्याला करमत नाही, चैन पडत नाही असा भाव हवा. विरह वाटला पाहिजे.

गुरूंचे ज्ञान जितके कच्चे असेल, तितका काळ त्या शिष्याला अधिक लागेल. एक्जॅक्ट ज्ञान लगेचच फळ देते आणि जरी मला केवळज्ञान होता-होता थांबले आहे, परंतु भेद ज्ञान तर माझ्याजवळ आहेच आणि ते लगेचच फळ देईल असे आहे.

## गुरूंचे प्रेम-राजीपा

**प्रश्नकर्ता :** गुरू प्रसन्न झाले असे कधी मानले जाईल?

**दादाश्री :** ते तर आम्ही संपूर्ण आज्ञेत राहू तर ते प्रसन्न होतील. ते प्रसन्न झाले तर आम्हाला कळेल. रात्रंदिवस आम्हला प्रेमातच ठेवतील.

**प्रश्नकर्ता :** असे काही खास प्रकारचे वर्तन पाहून गुरू प्रसन्न होतात, पण नंतर आमच्या वर्तनात कदाचित कधी न्यून आले तर पुन्हा नाराज पण होऊ शकतात ना?

**दादाश्री :** असे आहे की, प्रसन्न कोणाला म्हणतात, की कधी नाराजच होणार नाहीत. शिष्य तर चुका करतच राहणार, परंतु ते नाराज होत नाहीत.

## अनोखी गुरूदक्षिणा

**प्रश्नकर्ता :** आध्यात्मिक गुरू नि:स्पृही असतील तर त्यांना गुरूदक्षिणा कशी देता येईल?

**दादाश्री :** त्यांची आज्ञा पालन करण्याने, त्यांची आज्ञा पाळली ना, तर त्यांना गुरूदक्षिणा पोहोचतेच. या आम्ही पाच आज्ञा देतो, त्या पाळल्या तर आमची दक्षिणा पोहोचली.

**प्रश्नकर्ता :** विद्यागुरू नि:स्पृही असतील तर त्यांना गुरूदक्षिणा कशा प्रकारे देता येईल?

**दादाश्री :** विद्यागुरू नि:स्पृही असतील तर त्यांची सेवा करून, शारीरिक सेवा आणि दुसरी कामे करून चुकवली जाऊ शकते. दुसरे सुद्धा बरेच प्रकार असतात. नि:स्पृही व्यक्तीची दुसऱ्या प्रकारेही सेवा केली जाऊ शकते.

## अंतर्यामी गुरू

**प्रश्नकर्ता :** बाह्य गुरू आणि अंतर्यामी गुरू या दोघांची उपासना एकाचवेळी केली जाऊ शकते का?

**दादाश्री :** हो, अंतर्यामी गुरू जर तुम्हाला मार्गदर्शन करत असतील तर मग बाह्य गुरूंची आवश्यकता नाही.

**प्रश्नकर्ता :** देहधारी गुरू असतील तर अधिक पुरुषार्थ होऊ शकतो.

**दादाश्री :** हो, प्रत्यक्ष गुरू असतील तर पुरुषार्थ लगेच होतो. अंतर्यामी तर तुम्हाला पुष्कळ मार्गदर्शन करतात. ते खूप उच्च कोटीचे समजले जाते. परंतु अंतर्यामी प्रकट होणे अतिशय दुर्लभ गोष्ट आहे. ते तर बाहेरचे जे गुरू आहेत, ते तुम्हाला अधिक मदत करतील.

नाही तर आत तुमच्या आत्म्याला गुरू बनवा, त्यांचे नाव शुद्धात्मा. त्यांना सांगा, 'हे शुद्धात्मा भगवान, तुम्ही मला मार्गदर्शन करा.' तर ते करतील.

## गुरूंची गरज कोणाला नाही?

**प्रश्नकर्ता :** आपल्याकडून यर्थाथ समकित झाल्यानंतर गुरूंची गरज नाही ना?

**दादाश्री :** नंतर गुरू नकोत, गुरूंची गरज कोणाला नसते? तर माझ्यासारख्या ज्ञानीपुरुषाला गुरूंची गरज नाही. ज्यांना स्वत:चे सर्वच दोष दिसतात!

**प्रश्नकर्ता :** आपण ज्ञान प्रदान केलेत तर सतत जागृत राहण्यासाठी गुरूंचा सत्संग अथवा गुरूंचे सानिध्य गरजेचे आहे का?

**दादाश्री :** हो, त्या सगळ्यांची गरज आहे ना! पाच आज्ञा पालन करण्याची गरज, सगळ्यांचीच गरज!

**प्रश्नकर्ता :** अर्थात गुरूंची गरज आहेच ना?

**दादाश्री :** गुरूंची गरज नाही. हे सगळे साध्य झाल्यावर मग कोण गुरू? साधकाचे गुरू असतात. मला साठ हजार लोक भेटले आहेत, त्यांनी गुरू करण्याची गरज नाही.

**प्रश्नकर्ता :** मग त्यांना सत्संगाची गरज आहे का?

**दादाश्री :** हो, सत्संगाची गरज आहे आणि पाच आज्ञा पाळण्याचीही गरज आहे.

**प्रश्नकर्ता :** आपण जेव्हा येथे असाल तेव्हा रोज येण्याची गरज आहे ना?

**दादाश्री :** मी जेव्हा येथे असेल तेव्हा लाभ घ्या. रोज नाही आलात व महिन्याने आलात तरी हरकत नाही.

**प्रश्नकर्ता :** तुमच्या अनुपस्थितीत त्या प्रकारच्या जागृतीची गरज आहे का? सत्संगाची गरज आहे का?

**दादाश्री :** गरज तर आहेच ना! पण जमेल तेवढे करावे. जेवढे जमेल तेवढे, तर तुम्हाला अधिक लाभ होईल.

**प्रश्नकर्ता :** आपण परदेशात जाता तेव्हा येथे पूर्ण रिकामे असते, येथे कोणी एकत्र येत नाहीत.

**दादाश्री :** असे तुम्हाला रिकामे वाटते, या सर्वांना रिकामे वाटत नाही. पूर्ण दिवस दादा भगवान त्यांच्या सोबतच असतात. पूर्ण दिवस, निरंतर, चोवीस तास सोबत असतात दादा भगवान. मी तिथे परदेशात असलो तरीही! जसे गोपींसाठी श्रीकृष्ण राहत होते ना, तसेच राहतात निरंतर!

## तो शिष्य म्हटला जाईल

तुम्हाला स्पष्टपणे समजले की नाही? स्पष्टपणे समजले तरच

परिणाम दिसेल. नाही तर त्याचा परिणाम कसा दिसेल? ज्या स्पष्टपतापूर्वक मी समजलो आणि ज्या स्पष्टीकरणामुळे मी सुटलो आहे, संपूर्णपणे सुटलो आहे, जो रस्ता मी आचरणात आणला तोच रस्ता मी तुम्हाला दाखवला आहे.

**प्रश्नकर्ता :** पण ही गोष्ट बाहेरच्या व्यक्तीला कशी समजेल?

**दादाश्री :** बाहेरच्यांसाठी नाही. हे तर तुम्ही समजायचे. बाहेरच्यांना समजेल अशी ही गोष्ट नाही. ही तर ज्याच्या डोक्यात जितकी उतरेल तेवढीच उतरेल! सगळ्यांना कदाचित नाही पण समजणार. त्यांच्यात तितकी शक्ती हवी ना! पचवण्यासाठी शक्ती असली पाहिजे ना? या माणसांचा काही ठिकाणा नाही, डोक्याचा ठिकाणा नाही, मनाचा ठिकाणा नाही, जिथे-तिथे चिडतात, जिथे-तिथे भांडतात. ते तर पूर्वीचे मनुष्य होते स्थिरावलेले!

बाकी हे तर दुर्दशा झालेले लोक! येथे बॉस ओरडतो, बायको ओरडते. एखादीच व्यक्ती यातून वाचेल. बाकी, आता तर दुर्दशाच झालेली आहे! हल्ली लोक गुरूंकडे कशासाठी जातात? लालचूमुळे (प्रलोभनांमुळे) जातात की, 'माझे हे ठीक करून द्या, माझे असे होऊ द्या, गुरूंनी मझ्यावर थोडी कृपा करावी आणि माझे दिवस बदलावेत!'

**प्रश्नकर्ता :** गुरू करताना शिष्याकडे कोणते गुण असले पाहिजेत?

**दादाश्री :** अलीकडच्या शिष्यांजवळ चांगले गुण कसे असतील? आणि तेही या कलियुगात! बाकी शिष्य तर कोणाला म्हणायचे की त्याच्या गुरूंनी वेडेपणा केला तरी त्याची श्रद्धा तुटणार नाही, त्याला म्हणतात शिष्य! गुरूंनी वेडेपणा केला तरीही आपली श्रद्धा ढळणार नाही. शिष्य म्हणून हे आपले गुण म्हटले जातात असे होईल का तुमच्याकडून?

**प्रश्नकर्ता :** अजून तर असा प्रसंग उपस्थित झाला नाही.

**दादाश्री :** तसे झाले तर काय कराल?

हो, गुरूंवर श्रद्धा ठेवाल तर अशी ठेवा की जी श्रद्धा ठेवल्यानंतर ढळता कामा नये. नाही तर सुरवातीपासूनच श्रद्धा ठेऊ नये, त्यात काय वाईट?

कालपर्यंत लोक त्यांना मानत होते आणि मग गुरूंनी वेडेपणा केला तर शिव्या देऊ लागले. हव्या तशा शिव्या देऊ लागले. अरे, मग त्यांना मानलेच कशासाठी? आणि जर मानले तर आता शिव्या देणे बंद कर. आतापर्यंत पाणी पाजून झाड वाढवले, त्या झाडालाच तू कापून टाकलेस? तुझी काय अवस्था होईल? गुरूंचे जे व्हायचे ते होईल पण तुझी काय दैनाअवस्था होईल?

**प्रश्नकर्ता :** आम्ही मनात गुरूंसाठी काही उच्च कल्पना केली असेल, ती खंडित होते म्हणून असे घडत असेल का?

**दादाश्री :** एक तर गुरू करु नका, आणि केल्यानंतर गुरूंनी जरी वेडेपणा केला तरीही तुमची दृष्टी बदलता कामा नये.

## पाहू नये चूक कधी गुरूंची

हे तर पाच दिवसातच गुरूंची चूक काढतात. तुम्ही असे का करता? अरे, त्यांची चूक काढता! गुरूंची चूक काढतात का हे लोक?

**प्रश्नकर्ता :** गुरूंची चूक कधीच काढू नये.

**दादाश्री :** हो, पण ते चूक काढल्याशिवाय राहतच नाहीत ना! हे कलियुगातील लोक! म्हणून मग अधोगतीत जातात. आताचे गुरू परफेक्ट नसतात. आता परफेक्ट गुरू कुठून आणणार? हे गुरू तर कसे? कलियुगातील गुरू!

समजा गुरूंकडून चूक झाली तरी सुद्धा तू जर त्यांचा शिष्य असशील तर तू त्यांना सोडू नकोस. कारण दुसरा सर्व कर्माचा उदय असतो. असे नाही का समजत तुला? तू कशासाठी दुसरे काही पाहतोस? त्यांच्या पदाला तू नमस्कार कर ना! ते जे करतात, ते तू पाहायचे नाहीस. हो, त्यांचा उदय आला आहे, म्हणून ते भोगत आहेत. त्यात तुझे काय देणेघेणे? तुला त्यांचे पाहण्याची गरजच काय? त्यांच्या पोटात मुरड पडली म्हणून काय त्यांचा गुरूपणा निघून गेला? त्यांना एक दिवस उलटी झाली तर काय त्यांचा गुरूपणा निघून गेला? तुमच्या कर्माचा उदय होतो मग त्यांच्या कर्माचा उदय होत नसेल? तुम्हाला कसे वाटते?

**प्रश्नकर्ता :** बरोबर आहे.

**दादाश्री :** गुरूंच्या पोटात मुरड पडली तर काय सगळ्या शिष्यांनी निघून जावे? आता माझ्या पोटात मुरड पडली तर तुम्ही सगळे निघून जाल का? म्हणजे असा अपराध करू नका. विरोधी व्हायचे नाही. ज्यांना तुम्ही पूजत होता, ज्यांचे तुम्ही अनुयायी होता, त्यांचेच तुम्ही विरोधी बनलात? मग तुमची काय अवस्था होईल? ते गुरूपद जात कामा नये. त्यांना दुसऱ्या दृष्टीने पाहू नका. परंतु आजकाल तर कित्येक लोक दुसऱ्या दृष्टीनेच पाहतात, नाही का?

## पुज्यता नष्ट होऊ नये, हेच सार

असे आहे ना, चाळीस वर्षांपासून जे आपले गुरू असतील आणि त्या गुरूंना असे काही झाले, तरी आपल्यात काहीही बदल होऊ देऊ नये. आपली दृष्टी तीच ठेवावी, ज्या दृष्टीने पहिल्यांदा पाहिले होते, तीच दृष्टी ठेवावी. नाही तर तो भयंकर अपराध म्हटला जातो. आम्ही तर सांगतो की गुरू कराल तर सावधानीपूर्वक करा. नंतर वेडपट निघाले, तरीही तू त्यांचा वेडेपणा पाहू नकोस. ज्या दिवशी तू गुरू केले होतेस त्यानंतर गुरूंना नेहमी तसेच पाहावे. मी तर त्यांची पूजा केल्यानंतर त्यांनी मारहाण केली किंवा दारू पीत असतील, मांसाहार करीत असतील तरी सुद्धा मी त्यांची पूजा सोडणार नाही. कारण ज्यांना मी पाहिले होते ते वेगळे होते आणि आज या प्रकृतीवश काही वेगळेच वर्तन होत आहे, परंतु हे त्यांच्या इच्छेविरुद्ध घडत आहे, असे लगेच समजावे. आपण एकदा हिरा पसंद करून घेतला, मग आता काय? तो पुन्हा काच होईल का? तो तर हिराच आहे.

त्यावर मी आता एक उदाहरण देतो. आम्ही स्वत: एक झाड लावले असेल आणि नंतर जर आम्हालाच तिथे रेल्वे लाईन घालायची असेल आणि ते झाड रेल्वे लाईनच्या आड येत असेल म्हणून ते झाड कापायची वेळ आली, तर मी सांगेन की मी झाड लावले आहे, मी त्याला पाणी घातले आहे, तेव्हा आता तुम्ही रेल्वे लाईनीत बदला करा पण झाड कापायचे नाही. म्हणजे मी एकाद्या महाराजांच्या पाया पडलो, मग त्यांनी

जरी काहीही केले तरी मी माझी दृष्टी बिघडवणार नाही. कारण ते कर्माधीन आहे. जे दिसत आहे ते सर्व कर्माधीन आहे. मी जाणतो की त्यांना कर्माच्या उदयाने घेरले आहे. म्हणून दुसऱ्या दृष्टीने बघू नये. जर झाड कापायचेच होते तर त्याचे पालन-पोषण करायचे नव्हते, आणि पालन-पोषण केले तर आता कापू नकोस. हा आमचा सिद्धांत आहे पहिल्यापासूनच! तुमचा सिद्धांत काय आहे? वेळ आली तर सरळ कापून टाकायचे?

म्हणून ज्यांची पूजा करता, त्यांना उपटून टाकू नका. नाही तर ज्यांची पूजा केली आहे, चाळीस वर्षांपासून ज्यांना पुजले आहे आणि एक्केचाळीसाव्या वर्षी उडवून टाकले, कापले तर चाळीस वर्षाचे तर गेले आणि वर दोषाने बांधले गेले.

तुम्ही नमस्कार करू नका आणि केला तर मग त्यांच्याविषयी पूज्यता नष्ट होता कामा नये. पूज्यता नष्ट होऊ नये हेच या जगाचे सार आहे! एवढेच समजायचे आहे.

## यात दोष कोणाचा?

**प्रश्नकर्ता :** परंतु या जगात आम्ही ज्या व्यक्तीला पूज्य मानतो, ती जोपर्यंत आमच्या अनुरूप असेल तोपर्यंत संबंध टिकतो आणि जर त्यांच्याकडून थोडेसे जरी उलटसुलट झाले की आमचा संबंध बिघडतो!

**दादाश्री :** हो, ते मातीमोल होते. बिघडते एवढेच नाही, परंतु विरोधी बनून जातो.

**प्रश्नकर्ता :** त्यांच्यासाठी जो भाव होता, तो सगळा संपला.

**दादाश्री :** संपला आणि वर विरोधी बनला.

**प्रश्नकर्ता :** मग यात चूक कोणाची?

**दादाश्री :** ज्याला उलटे दिसते ना, त्याचाच दोष! उलटे नाहीच काही या जगात. बाकी, जग तर पाहण्या-जाणण्यासारखे आहे, दुसरे काय? उलटे आणि सरळ असे तुम्ही कशास म्हणता? तर ती बुद्धी आपल्याला उकसावत असते.

**प्रश्नकर्ता :** उलटे-सरळ पाहणे हा पाहणाऱ्याचा दोष आहे, असे तुम्ही म्हणता ना?

**दादाश्री :** हो, तो बुद्धीचा दोष आहे. आपल्याला समजले पाहिजे की हे 'उलटे आणि सरळ' दाखवणारी बुद्धी आहे. तेव्हा आपण बुद्धीचे ऐकू नये. बुद्धी आहे तोपर्यंत ती असे सर्व करणारच. परंतु आपल्याला समजले पाहिजे की हा कोणाचा दोष आहे! आपल्या डोळ्यांनी उलटे दिसत असेल तर आपल्याला कळून येते की डोळ्यांनी तसे पाहिले!!

## सन्निपात, तरीही तीच दृष्टी

ज्ञानी पुरुषांना किंवा गुरूंना किंवा कोणालाही पूजले असेल आणि त्यानंतर जर कधी त्यांना सन्निपात झाला, तर ते चावायला धावतात, मारतात, शिव्याही देतात पण तरीही त्यांचा एकही दोष पाहू नये. सन्निपात झाला असेल आणि शिव्या दिल्या तर किती लोक धीराने घेऊ शकतील? म्हणजे तशी समजच नाही. गुरू तर तेच आहेत पण प्रकृतीत बदल झाला. मग कोणाचीही प्रकृती असो, सन्निपात होण्यास वेळच लागत नाही ना! कारण हे शरीर कशाचे बनलेले आहे? कफ, वायु व पित्ताचे बनलेले आहे. आत कफ, वायु आणि पित्ताने जरा उसळी मारली की सन्निपात होतो!

## गुरू-पाचवी घाती

आजच्या या पाचव्या आऱ्यातील (कालचक्राचा एक भाग) जे सर्व जीव आहेत ते कसे आहेत? पूर्वविराधक जीव आहेत. म्हणून गुरुंमध्ये जर प्रकृतीच्या दोषामुळे चुका झाल्या तर गुरूंचे दोष बघतात व विराधना करतात. गुरू केल्यानंतर जर विराधना करणार असाल, तुमचा कमकुवतपणा जर पुढे येणार असेल तर गुरू करू नका. नाही तर भयंकर दोष आहे. गुरू केल्यानंतर त्यांची विराधना करू नका. कसेही गुरू असतील तरी शेवटपर्यंत त्यांच्या आराधनेतच राहा. आराधना जरी नाही झाली तरी विराधना तर करूच नका. कारण गुरूंची चूक पाहणे ही पाचवी घाती आहे. म्हणून तर असे शिकवतात की, 'भाऊ, हे बघ, गुरू

हे पाचवी घाती आहे, म्हणून जर गुरूंची काही चूक दिसली तर तू मारला गेलास असे समज.'

एक माणूस माझ्याकडे आलेला, तो मला सांगत होता की, 'माझ्या गुरूंनी मला सांगितले होते, की 'तू इथून जा, आता पुन्हा कधी आमच्याजवळ येऊ नकोस.' तेव्हापासून मला तिथे जावेसे वाटत नाही.

तेव्हा मी त्याला समजावले की गेला नाहीस तरी हरकत नाही पण गुरूंची माफी मागून घे ना! जो माफी मागेल तो इथून, या दुनियेतून मुक्त होईल. तोंडी तर माफी मागितली, आता मनाने पण माफी मागायची. आणि तुला या चिठ्ठीत जे लिहून दिले आहे त्याप्रमाणे घरी प्रतिक्रमण करत रहा. मग त्याला प्रतिक्रमण विधी लिहून दिली.

तू ज्यांना गुरू केले आहेस, त्यांची निंदा करू नकोस. कारण इतर सर्व उदयकर्माच्या अधीन आहे. मनुष्य काहीच करू शकत नाही. आता अशावेळी हरकत न घेणे हाही एक गुन्हाच आहे! परंतु हरकत वीतरागतेने घ्यावी, अशी त्यांच्यावर धूळ उडवून नाही. 'असे व्हायला नको,' इतके तुम्ही त्यांना सांगू शकता, पण सर्व वरवर! कारण ते उदयकर्माच्या अधीन आहेत. मग त्यांचा दोष काढून काय फायदा? तुम्हाला कसे वाटते?

**प्रश्नकर्ता :** हो, बरोबर आहे.

**दादाश्री :** दुसरे म्हणजे गुरूंचे जे उपकार आहेत, ते उपकार मानले पाहिजेत. कारण त्यांनी तुम्हाला या सीमेच्या बाहेर काढले, तो उपकार विसरू नका. ज्या गुरूंनी इतके भले केले त्यांचे गुण विसरून कसे चालेल? म्हणून त्यांच्याकडे जायला पाहिजे. आणि गुरू अवश्य करावे व एक गुरू केल्यानंतर त्या गुरूंबद्दल अजिबात भाव बिघडवता कामा नये, एवढेच सांभाळायचे, बस.

## गुरूंसाठी उलटा विचार करु नये.

गुरूंनी जर शिष्याला म्हटले की, 'तुला अक्कल नाही' तर शिष्य तिथून निघून जातो. त्याला अपमान वाटतो म्हणून निघून जातो. तिथे तो

विरोधी बनतो की, 'स्वत:चे डोके चालत नाही आणि माझे गुरू होऊन बसले आहात.' असे म्हटल्यामुळे तर उलट वाईट परिणाम होतो.

अरे, काल तर तू पाया पडत होतास आणि आज दगड मारतोस? ज्यांचे पाय पुजले, त्यांना कधी मारू नये. आणि जर मारायचे असेल तर पुन्हा कधी पाया पडू नकोस!

गुरू म्हणतील, तुम्ही अकरा वाजता इथून कोठेही जायचे नाही. मग मन आत कितीही उड्या मारू लागले तरी सुद्धा जायचे नाही. असे काही शिष्य असतात की जे गुरू जरी कसेही वागले तरी पण ते गुरूच्या अधीन राहतात. परंतु आत्ताच्या गुरूंच्या अधिनतेत, तर ते गुरू सुद्धा इतके अधिक प्रमाणात कच्चे आणि कमकुवत असतात की शिष्य चिडून म्हणतात की, 'हे कसले बरकत नसलेले गुरू भेटलेत!' असे एकदा जरी बोलतात ना, मग सगळे केले-सवरलेले धूळीस मिळते.

गुरूंनी नव्व्याण्णव वर्षांपर्यंत सर्व चांगलेच केले असेल पण फक्त सहा महिनेच चुकीचे केले तर शिष्य सर्व काही संपवून टाकतो!

म्हणून गुरुंजवळ जर कधी अधीनतेने राहिला नसेल तर क्षणभरात सगळे संपवून टाकेल! कारण हा विस्फोटक (दारूखाना) आहे. या दुसऱ्या सगळ्या गोष्टी दारूखाना नाहीत. फक्त गुरुंजवळच दारूखाना आहे. सगळे काही केले असेल, परंतु तो दारूखाना फारच भयंकर आहे म्हणून खूप जागृत रहा, सावधान रहा, आणि जर एखादी ठिणगी उडाली तर नव्व्याण्णव वर्षे केले-सवरलेल्याची धूळधाण होईल! आणि भाजून मरेल ते वेगळेच!

## तिथे उपाय करावा लागतो

एक व्यक्ती मला सांगते की, 'एक मोठे संत पुरुष आहेत त्यांच्याकडे मी जातो, त्यांचे दर्शन घेतो, तरी सुद्धा आजकाल माझ्या मनात त्यांच्याविषयी वाईट विचार येतात.' मी म्हटले, 'कोणते विचार येतात?' तर त्याने सांगितले, 'ते नालायक आहेत, दुराचारी आहेत.' असे सर्व विचार येतात. मी विचारले, 'तुला असे विचार करणे आवडते?' तर तो

म्हणाला, 'चांगले वाटत नाही तरी पण येतातच. पण आता हे बंद कसे होतील? त्यासाठी कोणता उपाय करावा?' तुम्ही कोणता उपाय कराल? यात दोष कोणाचा? गुरूंचा?

**प्रश्नकर्ता :** ज्याला असे विचार येतात त्याचा.

**दादाश्री :** हो. म्हणून मी त्याला काय म्हटले की, 'भाऊ, तुला जर असे वाईट विचार आले ना की 'ते नालायक आहेत, इतके वाईट आहेत', तर असे विचार येणे हे आपल्या हातचा खेळ नाही. तेव्हा तुला असे बोलले पाहिजे की हे खूप उपकारी आहेत. मन 'वाईट आहेत' असे बोलत असेल तेव्हा तू 'खूप उपकारी आहेत' असे बोलावे. म्हणजे हे प्लस-माईनस होऊन संपून जाईल. म्हणून हा उपाय सांगत आहे.'

## गुरूभक्ती तर खोजा लोकांची

त्या वेळी तर मी त्या खोजा लोकांचे पाहिले की ते सर्व एका गुरूंना मानत होते. म्हणत होते की आमचे गुरू समर्थ आहेत! आणि एका गुरूने अमेरिकेत जाऊन विवाह केला म्हणून त्यांचे भक्त, नालायक आहेत, नालायक आहेत असे म्हणू लागले. सर्व शिष्य त्यांचे विरोधी झाले की गुरूंनी असा गुन्हा करायला नको. अरे, तुमच्या गुरूंना नालायक म्हणता? तुम्ही कोणाला नमस्कार करीत होतात? त्यावर तो म्हणाला, 'मग अशा गुरूंना नालायक नाही म्हणायचे?' मी म्हणालो, 'या खोजा लोकांना विचारा. मला त्यांची विशेषता ही वाटली की साऱ्या जगात त्यांचे भक्त मला खूप उच्च कोटीचे वाटले! त्यांच्या गुरूंनी एका परदेशी स्त्रीबरोबर विवाह केला तरी पण त्यांचे भक्त सोहळा साजरा करतात आणि आपल्या येथील एखाद्या गुरूने त्यांच्याच जातीतल्या स्त्रीशी विवाह केला तरीही मारून मारून त्यांची फजिती करतील. खोजा लोक तर त्यांच्या गुरूंनी परदेशी स्त्रीशी विवाह केला तरी सोहळा साजरा करतात. त्यांचे शिष्य तर म्हणतील, 'भाऊ, त्यांना सर्व अधिकार आहेतच. आपण मनाई करु शकत नाही!' आपण लगेच सोहळा साजरा केला पाहिजे. त्यांचे येथील सगळे अनुयायी खूप खुश झाले! त्या सर्वांनी येथे मिरवणूक काढली! गुरू जे करतात ते आपण करायचे नाही, आपण तर गुरू सांगतील ते करायचे.

दुनियेत गुरू करण्यास जर कोणाला आले असेल तर ते या खोजा लोकांना! तुमच्या गुरूंनी असा विवाह केला असेल, अरे, विवाह केला नसेल परंतु कोणाला जरासे ओरडले असतील तरी तुम्ही सगळे त्यांना मारता. या खोजा लोकांच्या गुरूंनी तर विवाह केला एका युरोपियन लेडीबरोबर! आणि त्या सगळ्या लोकांनी उसोहळा साजरा केला की आपले गुरू तर एका युरोपियन लेडीबरोबर विवाह करीत आहेत! यांना म्हणतात शिष्य. गुरूंचे उणे काढू नये. सगळ्यांचे उणे काढा, पण गुरूंचे उणे काढू नका. त्यात फार मोठी जोखीम आहे. नाही तर गुरू करूच नका.

मी गुरूंची आराधना करण्यास सांगत नाही, पण त्यांची विराधना करू नका. आणि जर आराधना केली तर कामच झाले, परंतु इतकी अधिक आराधना करण्याची शक्ती मनुष्यात नसते. मी काय म्हणतो की वेड्याला गुरू बनवा, अगदी वेड्याला गुरू बनवा, परंतु आयुष्यभर त्याच्याशी 'सिन्सियर' राहा, तर तुमचे कल्याण होईल. पूर्ण वेड्या गुरूशी सिन्सियर राहिल्याने तुमचे सर्व कषाय संपून जातील! पण एवढे समजले पाहिजे ना! एवढी बुद्धी चालली पाहिजे ना! म्हणूनच तर तुमच्यासाठी दगडाचे देव स्थापन केले, की ही प्रजा अशी आहे, म्हणून दगडाचे देव बसवा म्हणजे मग उणे काढणार नाहीत. तर म्हणे, 'नाही, दगडात सुद्धा उणे काढतात की हा श्रृंगार योग्य नाही!' ही प्रजा अति विचार करणारी आहे! अति विचारवंत, गुरूंचे दोष बघणारे लोक. स्वत:चे दोष बघण्याचे सोडून, गुरूंचे दोष बघतात! इतकी अधिक तर त्यांची अलर्टनेस (जागरूकता) आहे!

आम्ही खात्री देतो की कोणत्याही वेड्याला गुरू केले आणि आयुष्यभर त्याला निभावून घेतले तर तीन जन्मात मोक्ष होईल असे आहे. परंतु गुरू जिवंत असला पाहिजे. म्हणून तर लोकांना हे परवडले नाही आणि मूर्ती ठेवली.

माझे काय म्हणणे आहे की स्वत: ठरवलेले गुरू सोडू नये. गुरू करणे ही काही सोपी गोष्ट नाही. गुरू करा पण उत्तम प्रकारे पारख करून मगच करा.

## नाही तर घड्यास गुरू बनवा

**प्रश्नकर्ता :** परंतु जेव्हा गुरू केले असतील, तेव्हा त्यांना इतकी समज नसते.

**दादाश्री :** आणि जणू हे समजुतीचे पोते( !) झालेत, म्हणून आता गुरूला नाठाळ म्हणावे? त्यापेक्षा भीम होता ना, त्या भीमाची पद्धत वापरा. त्या दुसऱ्या चार भावांची पद्धत वापरायची आपल्याला गरज नाही. कारण कोणत्याही गुरूंना नमस्कार करावा लागला तर भीमाला हुडहुडी भरत असे, अपमानास्पद वाटत असे. म्हणून भीमाने काय विचार केला? की हे गुरू मला परवडत नाहीत. माझे भाऊ बसतात, त्यांना काही सुद्धा होत नाही आणि मला तर, गुरूंना पाहिल्याबरोबर माझा अहंकार उसळू लागतो, मला उलट-सुलट विचार येतात. पण तरी गुरू तर केलेच पाहिजेत. गुरुंशिवाय माझी काय अवस्था होईल? त्याने उपाय शोधून काढला.

एक मातीचा घडा होता, त्याला जमिनीमध्ये उलटा गाडला आणि त्यावर काळा रंग दिला आणि त्यावर लाल अक्षरात लिहिले, 'नमो नेमीनाथाय:' नेमीनाथ भगवंत श्याम होते-काळे होते म्हणून काळा रंग दिला! आणि मग त्याची भक्ती केली. हो, तो घडा गुरू आणि स्वत: शिष्य!

गुरू येथे प्रत्यक्ष डोळ्यांनी दिसत नव्हते आणि त्या प्रत्यक्ष गुरूंसमोर त्याला लाज वाटत होती, त्यांना नमस्कार करत नव्हता, आणि येथे घडा उलटा गाडून दर्शन केले, म्हणून भक्ती सुरु झाली, तरी सुद्धा फळ मिळत होते. कारण विष होत नव्हते. म्हणजे येथेही जर उल्हास वाटला तरी तुमचे कल्याण होईल!

सकाळ झाली, संध्याकाळ झाली की भीम तिथे जाऊन बसत असे. म्हणजे असे गुरू चांगले की आपल्याला कधी राग तर येणार नाही, काही झझंट तर नाही. राग आला तर घडा उकरुन काढावा. आणि त्या जिवंत माणसांवर श्रद्धा, ती तर मारूनच टाकते. कारण आत भगवंत बसलेले आहेत. त्या घड्यावर तर फक्त भगवंताचा आरोपणच आहे, आपणच भगवंताचे आरोपण केले आहे.

**प्रश्नकर्ता :** घड्याला गुरू बनवले, तरी देखील लाभ झाला?

**दादाश्री :** लाभ तर त्याला होणारच ना! असे प्रत्यक्षपणे नाही केले परंतु अप्रत्यक्षपणे तर केले ना! नेमीनाथ भगवंतांना नमस्कार तर केलाच ना! मग ते असे आहे की, इतके छोटे-छोटे बालक असतात, त्यांचे आई-वडील त्यांना म्हणतात की, 'दादाजींना नमस्कार कर.' परंतु बालक नमस्कार करत नाही. जेव्हा पुन्हा पुन्हा नमस्कार करायला लावतात तेव्हा असा मागे उभा राहून नमस्कार करतो. हे काय सूचित करते? अहंकारच आहे तो सगळा! त्याचप्रमाणे भीमाला सुद्धा अहंकार होता, म्हणून अशा तऱ्हेने घडा ठेवून सुद्धा केले. तरी देखील त्याला लाभ तर नक्कीच झाला. हो, खरोखर असे घडले. त्यावेळी नेमीनाथ भगवंत जिवंत होते.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे ते प्रत्यक्ष होते?

**दादाश्री :** हो. ते प्रत्यक्ष होते.

**प्रश्नकर्ता :** म्हणून एकंदरीत तर त्यांचीच भक्ती केली.

**दादाश्री :** हो, पण नामाने आणि स्थापनेने नेमीनाथ भगवंताची आराधना केली!

**प्रश्नकर्ता :** परंतु घड्याला आम्ही गुरू बनवले, तर तो जड पदार्थ झाला ना?

**दादाश्री :** असे आहे की, या दुनियेत जे काही डोळ्याने दिसते ते सगळे जड आहे, एकही चैतन्य दिसत नाही.

**प्रश्नकर्ता :** आपल्याला कोणी प्रश्न विचारला आणि आपण उत्तर देता, त्याप्रमाणे घडा तर उत्तर देत नाही ना?

**दादाश्री :** घडा उत्तर देत नाही. परंतु गुरू बनवून तुम्ही गुरूंचे आबाळ करणार असाल, म्हणजे नंतर तुम्ही बिघवडणार असाल, तर गुरू करू नका आणि नेहमी सरळ वागणार असाल तरच गुरू करा. मी तर खरा सल्ला देतो. मग जसे करावेसे वाटेल तसे करा. अधांतरी सोडून

दिलेत तर मोठी जबाबदारी आहे. गुरूंचा अधांतरी घात करणे त्यापेक्षा तर आत्मघात करणे चांगले.

## उत्थापन, हा तर भयंकर गुन्हा

गुरूला गुरूच्या रुपात मानू नका आणि मानलेत तर मग पाठ फिरवू नका. तुला ते पसंत नसेल तर लोटा ठेव! लोटा ठेवण्यास हरकत नाही. लोट्याला नमस्कार कर, मग जर बुध्दीने चूळबूळ केली नाही, तर तुझे काम होईल. आता इतके सगळे सांभाळणे कोणाला शक्य आहे ? हे सगळे कसे काय समजेल ?

**प्रश्नकर्ता :** गुरू करताना ते चांगले वाटतात. सद्गुणी वाटतात की यांच्यासारखा तर कोणीच नाही. परंतु एकदा गुरू केल्यानंतर काही गडबड आहे असे जर समजले तर काय करावे ?

**दादाश्री :** त्यापेक्षा तर स्थापन करूच नये. लोटा ठेवणे चांगले, तो कधी उकरावा तर लागत नाही. लोट्याची काही झंझटच नाही ना! तसा लोटा काही इतके सगळे काम करत नाही, पण तरी खूप मदत करतो.

**प्रश्नकर्ता :** गुरूची स्थापना तर केली, परंतु बुद्धी काही एकदम निघून जात नाही, म्हणून तिला उलटे दिसते. त्याला तो तरी काय करणार ?

**दादाश्री :** तसे दिसते, परंतु स्थापना केली, म्हणून आता उलटे करु नये. एकदा स्थापना केली, की मग बुद्धीला सांगावे की, 'येथे तुझे राज्य राहणार नाही, हे माझे राज्य आहे, येथे तुझी आणि माझी, दोघांची स्पर्धा आहे. आता मी आहे आणि तू आहेस.'

एक वेळा स्थापन करून मग उकरणे, तो तर भयंकर गुन्हा आहे. त्याचेच दोष लागले आहेत या हिंदुस्तानातील लोकांना! यांना तर गुरूची स्थापनाच करता येत नाही. आज स्थापना करतात आणि उद्या तर उत्थापन करतात. परंतु असे चालणार नाही. गुरू जे काही करत असतील, परंतु स्थापना केल्यानंतर तू त्यात कशासाठी डोकेफोड करतोस ? एकदा का मन बसले की, 'माझी हरकत नाही' असे म्हणून तुम्ही गुरू केलेत. मग

आता गुरुंच्या उणिवा का काढता? उणिवा काढणारे कधीही मोक्षला गेले नाहीत, परंतु नरकात गेले आहेत.

## नंतर मात्र गुरूचे दोष काढूच नयेत

तेव्हा कोणी चांगले गुरू शोधून काढावे की जे आपल्या हृदयास पटतील. असे गुरू शोधावे लागतील. आपल्या मनाला आनंद वाटेल असे गुरू हवेत. गुरू केल्यानंतर कायम मन संतुष्टी राहील, आपले मन त्यांच्याविषयी कधीच बिघडणार नाही असे असेल तर गुरू करावेत. हो, नाही तर नंतर त्यांच्याशी आपली लठ्ठालठ्ठी होईल. एकदा त्यांच्यावर मन स्थिरावल्यानंतर लठ्ठालठ्ठी होणार असेल तर ती लठ्ठालठ्ठी करू नका. एकदा का त्यांच्यावर मन स्थिरावले आणि पुन्हा आपल्या बुद्धीने चाचपू लागलो की, 'हे गुरू असे कसे निघाले?' तर मात्र चालणार नाही. बुद्धीला सांगावे की, 'ते असे असूच शकत नाहीत. आम्ही जसे पहिल्यांदा पाहिले होते तेच हे गुरू आहेत!'

म्हणून आम्ही काय म्हटले? की जे तुझ्या डोळ्यात भरतील असे असतील त्यांनाच गुरू बनव. मग जर कधी गुरू तुझ्यावर चिडले तर तू ते पाहू नकोस. प्रथम जे डोळ्यात भरले होते, जसे पाहिले होते, तसेच्या तसेच दिसले पाहिजेत. आपणच पसंत केले होते ना! या मुली नवरा पसंत करतात, त्यावेळी जे रूप पाहिले होते, आणि त्यानंतर त्या नवऱ्याला देवी जरी आल्या तरी त्या आधी पाहिले होते तेच रुप ध्यानात ठेवतात! काय करणार मग? तरच जगता येईल, नाही तर जगताच येणार नाही. त्याच प्रमाणे ज्याला स्वच्छंदपणा काढून टाकायचा असेल, त्याने गुरूला अशा तऱ्हेनेच पाहावे. गुरूची चूक काढू नये. गुरू केले म्हणजे केले, नंतर त्यांचा एकही दोष दिसायला नको, अशाप्रकारे तू वाग. नाही तर दुसऱ्या गुरूकडे जाऊ शकतोस. अर्थात गुरू आपल्या डोळ्यात भरतील असे शोधून काढावे आणि नंतर त्यांचे दोष काढू नये. परंतु लोकांना हे समजत नाही आणि गुरू करून बसतात.

## खरोखर तर श्रद्धाच फळते

**प्रश्नकर्ता :** गुरूंवर जर आमची श्रद्धा असेल, मग गुरू कसेही असतील, परंतु आपली श्रद्धा असेल तर ती श्रद्धा फळते की नाही फळत?

**दादाश्री :** आपली श्रद्धा फळेल, पण जर गुरूंवर अभाव झाला नाही तर फळेल. गुरूंनी कदाचित काही उलट-सुलट केले तरी देखील त्यांच्याविषयी भाव बिघडला नाही, अभाव झाला नाही, तर तुमची श्रद्धा फळेल.

**प्रश्नकर्ता :** अर्थात जर आपला भाव असेल, तर आम्ही गुरुंच्याही पुढे प्रगती करू शकतो ना?

**दादाश्री :** प्रगती करु शकता, नक्कीच प्रगती करु शकता! पण जर तुम्ही तुमचा भाव बिघडवला नाही तर. गुरूंच्या आत भगवंत बसले आहेत, जिवंत भगवंत! त्या भीमाने लोटा ठेवला होता, तरी सुद्धा त्याचे काम झाले. अर्थात तुमची श्रद्धाच काम करते ना! एखाद्याने गुरू केले असतील आणि ते गुरू जर कधी वेडेवाकडे बोलले आणि जर त्या व्यक्तीस चुका काढण्याची सवय असेल ना, तर तो मागे पडेल. जर तुमच्यात गुरूंना सांभाळण्याची शक्ती असेल, तर गुरूने कितीही उलटेसुलटे केले किंवा मग गुरूंना सन्निपात झाला तरी सुद्धा त्यांना सांभाळता आले तर कामच झाले म्हणा. परंतु शेवटपर्यंत निभावून नेत नाही ना! निभावून नेणे जमतच नाही ना!

**प्रश्नकर्ता :** एखाद्या अयोग्य पुरुषात सुद्धा जर पूर्ण श्रध्देने स्थापना केली तर ती फळ देते की नाही?

**दादाश्री :** का नाही देणार? परंतु त्यांना स्थापन केल्यानंतर आपली श्रद्धा पलटायला नको.

हे सगळे काय आहे? तुम्हाला वास्तविकता सांगू का? तुम्हाला अगदी स्पष्ट सांगू का? गुरू तर फळ देत नाहीत. तुमची श्रद्धाच तुम्हाला फळ देते. गुरू कसेही असो, पण आपली दृष्टी फळ देते. ही मूर्ती सुद्धा फळ देत नाही, तुमची श्रद्धाच फळ देते आणि जितकी तुमची श्रद्धा स्ट्रोंग असेल, तसेच सत्वर फळ मिळते!

असे आहे की, या जगात श्रद्धा बसते आणि उडून जाते. फक्त ज्ञानीपुरुषच असे आहेत की जे श्रध्देचीच मूर्ती, सगळ्यांचीच श्रद्धा बसते.

त्यांना पाहिल्यावरच,त्यांच्याशी बोलल्यावरच श्रद्धा बसते. ज्ञानी पुरुषांना श्रध्देची मूर्ती म्हटले जाते. ते तर कल्याणच करतात! नाही तरी तुमची श्रद्धाच फळ देते.

## श्रद्धा ठेवावी की उत्पन्न व्हावी?

**प्रश्नकर्ता :** सगळ्या धर्मात मी माझ्या दृष्टीने पारखून पाहिले आहे, परंतु मला आत्तापर्यंत कुठेही श्रद्धा उत्पन्न झाली नाही, ही वस्तुस्थिती आहे. असे का झाले असावे? तिथे मग काय करावे?

**दादाश्री :** परंतु श्रद्धा उत्पन्न होईल असे स्थान तर हवे ना? तोपर्यंत श्रद्धा हितकारी जागेवर बसत आहे की अहितकारी जागेवर, इतकेच पाहावे. आपली श्रद्धा हितकारीवर बसत असेल, दृढ होत असेल तर हरकत नाही. परंतु अहितकारीवर श्रद्धा बसता कामा नये.

**प्रश्नकर्ता :** मला कोणत्याही प्रकारे, कोणत्याही धर्मात किंवा व्यक्तीमध्ये श्रद्धा उत्पन्न होत नाही. याचे काय कारण असेल? उच्च कक्षेच्या म्हटल्या जाणाऱ्या संतांच्या सत्संगात सुद्धा शांतीचा अनुभव होत नाही, त्यात दोष कोणाचा?

**दादाश्री :** जिथे खरे सोने मानून आम्ही गेलो, तिथे रोल्ड गोल्ड (खोटे) निघाले, की मग श्रद्धा बसतच नाही ना! मग दुधाने भाजलेली व्यक्ती, ताक सुद्धा फुंकून पिते!

**प्रश्नकर्ता :** गुरुंवर श्रद्धा तर ठेवावी लागते ना?

**दादाश्री :** नाही, श्रद्धा ठेवावी लागते असे नाही, श्रद्धा उत्पन्न व्हायला हवी! श्रद्धा ठेवावी लागत असेल तर तो गुन्हा आहे. श्रद्धा आपल्यात उत्पन्न व्हायला हवी.

**प्रश्नकर्ता :** गुरूंवर श्रद्धा ठेवली, अधिक श्रद्धा ठेवली, तर त्या श्रद्धेमुळे आपल्याला अधिक प्राप्ती होते ना?

**दादाश्री :** परंतु असे आहे की, ठेवलेली श्रद्धा चालत नाही, आपली श्रद्धा बसली पाहिजे.

**प्रश्नकर्ता :** बहुतेक लोकांकडे गेलो तर ते प्रथम काय सांगतात की तुम्ही श्रद्धा ठेवा.

**दादाश्री :** परंतु मी श्रद्धा ठेवण्यास मनाई करतो. तुम्ही माझ्यावर बिलकूल श्रद्धा ठेऊच नका. श्रद्धा कुठल्याही जागी ठेवायची नसते. श्रद्धा फक्त बसमध्ये बसताना ठेवा, गाडीत बसताना ठेवा. पण या मनुष्यांवर जास्त श्रद्धा ठेऊ नका. श्रद्धा आपल्यात उत्पन्न व्हायला हवी.

**प्रश्नकर्ता :** असे का?

**दादाश्री :** मागे गोंद लावलेला असेल तरच तिकीट चिकटेल ना? गोंदाशिवाय चिकटेल का? मी जेव्हा पंचवीस वर्षांचा होतो तेव्हा एका बापजीकडे गेलो होतो. ते मला म्हणू लागले, 'भाऊ, श्रद्धा ठेवाल तरच तुम्हाला हे सर्व समजेल. तुम्ही माझ्यावर श्रद्धा ठेवा!' 'कुठवर ठेवू?' तर म्हणाले 'सहा महिने.' मी म्हटले, 'साहेब, आत्ताच श्रद्धा बसत नाही ना! असा कोणता तरी गोंद लावा की ज्यामुळे माझे तिकीट चिकटेल, हे तर मी चिटकवत आहे, श्रद्धा चिटकवत आहे पण चिकटत नाही, चिकटवत आहे पण चिकटतच नाही. श्रद्धा बसतच नाही. तुम्ही असे काही बोला की माझी श्रद्धा बसेल.' तुम्ही काय म्हणता? श्रद्धा बसली पाहिजे की ठेवली पाहिजे?

**प्रश्नकर्ता :** बसली पाहिजे.

**दादाश्री :** हो. यायला हवी. 'तुम्ही काही तरी बोला' असे जेव्हा मी म्हटले, तेव्हा ते म्हणाले 'असे कसे? श्रद्धा तर ठेवावी लागते. हे सगळे लोक श्रद्धा ठेवतातच ना?' मी म्हटले, 'मला तसे जमणार नाही.' नुसती थुंकी लावून चिकटवलेली श्रद्धा किती दिवस टिकेल? त्यासाठी तर गोंद पाहिजे, त्याने पटकन चिकटेल. मग कधी निघणारच नाही ना! कागद फाटेल पण ती निघणार नाही. आणि जर त्यांनी असे म्हटले की, 'तुमचा गोंद कमी आहे' तर आपण सांगावे की, 'नाही.' गोंद तुम्ही लावायचा, तिकीट माझे. तुम्ही तर गोंद लावतच नाहीत. आणि पाकिटाला तिकीट चिकटवतो ना, तर छाप मारण्याआधीच तिकीट खाली पडते आणि मग तिथे दंड भरावा लागतो. तुम्ही तिकिटाच्या मागे काही तरी लावा.

गोंद संपला असेल तर खळ लावा, तरी चिकटेल!!' म्हणजे श्रद्धा तर त्याचे नाव की चिकटवली की चिकटून बसते, नंतर निघणारच नाही. त्यावर कितीही छाप मारत राहिलात तरी छाप थकून जाईल पण तिकीट निघणार नाही.

## तिथे श्रद्धा येतेच

**प्रश्नकर्ता :** ही श्रद्धा कशाच्या आधारे येते?

**दादाश्री :** गुरूंच्या चारित्र्याच्या आधारे येते. चारित्र्यबळ असते! जिथे वाणी, वर्तन व विनय मनोहर असते तिथे श्रद्धा बसवावी लागत नाही, श्रद्धा बसलीच पाहिजे. मी तर लोकांना सांगतो ना, की येथे श्रद्धा ठेवूच नका, तरी देखील श्रद्धा बसतेच. आणि दुसऱ्या जागी ठेवलेली श्रद्धा जरा 'असे' केले ना तर लगेच उडून जाते. म्हणून जिथे वाणी, वर्तन व विनय मनोहर असतील, मनाचे हरण होईल, असे असतील तिथे खरी श्रद्धा बसते.

**प्रश्नकर्ता :** श्रद्धा बसण्यासाठी मुख्य वस्तू वाणी आहे का?

**दादाश्री :** ते बोलू लागले की आपली श्रद्धा लगेच बसते की, 'ओहोहो, हे कसे बोलत आहेत?' त्यांच्या बोलण्यावर श्रद्धा बसली ना की मग कामच झाले. मग कधी श्रद्धा बसते आणि कधी श्रद्धा बसत नाही, असे होता कामा नये. आपण जेव्हाही जाऊ, तेव्हा ते जे बोलतील त्यावर आमची श्रद्धा बसते. त्यांची वाणी अशी फर्स्ट क्लास असते. जरी सावळे असतील किंवा तोंडावर देवीचे व्रण असतील पण वाणी फर्स्ट क्लास बोलत असतील तर आपल्याला समजेल येथे आपली श्रद्धा बसेल.

**प्रश्नकर्ता :** मग, श्रद्धा येण्यासाठी आणखी काय काय असावे?

**दादाश्री :** असे प्रभावशाली असतात की पाहताक्षणीच मनात भरतात. म्हणजे देहकर्मी असले पाहिजेत. आम्ही म्हणू की भले बोलू नका पण असे काही लावण्य दाखवा की माझी श्रद्धा बसेल. परंतु हे तर लावण्य सुद्धा दिसत नाही, मग श्रद्धा कशी बसेल? म्हणजे तुम्ही जर

असे देहकर्मी असाल तर मी तुमच्याकडे आकर्षित होईन. तुम्हाला पाहून मला उल्हासच येत नाही ना, तुमचा चहेरा सुंदर असता तरी कदाचित उल्हास वाटला असता. परंतु चेहरा सुद्धा सुंदर नाही, शब्द सुद्धा सुंदर नाहीत. म्हणजे प्रभावशालीही नाही, आणि चांगले बोलताही येत नाही. मग येथे असे चालणारच नाही. जरी ज्ञान सुंदर असेल तरीही श्रद्धा बसेल. माझे ज्ञान सुंदर आहे त्यामुळे श्रद्धा बसतेच. सुटकाच नाही! आणि बाहेर तर फक्त शब्द सुंदर असतील तरी चालेल.

आता बोलता येत नसेल तरी सुद्धा जेव्हा आपण तिथे बसू तेव्हा आपले डोके शांत झाले तर समजा की येथे श्रद्धा ठेवण्यासारखी आहे. जेव्हा जाऊ तेव्हा, उबग आल्यावर तिथे गेलो आणि मन:स्थिती शांत झाली तर जाणावे की येथे श्रद्धा ठेवण्यासारखी आहे. वातावरण शुद्ध असेल तर समजून जा की ही शुद्ध व्यक्ती आहे, मग तिथे श्रद्धा बसेल.

## शोधणारा तर असा नसतो

श्रद्धा तर अशी बसली पाहिजे की हातोडा मारून घालवायची म्हटली तरी सुद्धा हालत नाही. बाकी, जे श्रद्धा बसवतात ती मग उठते (निघून जाते). श्रद्धा उठली असेल तिला बसवावी लागते आणि बसली असेल तिला उठवावी लागते. जगात अशी श्रद्धेची उठ-बस, उठ-बस होतच राहणार. एका जागी सहा महिने श्रद्धा राहिली तर दुसऱ्या जागी दोन वर्षे श्रद्धा राहील, तर कुठे पाच वर्ष श्रद्धा राहील, पण नंतर उठून जाते.

म्हणून या जगात कुठेही श्रद्धा ठेवूच नका, जिथे ठेवाल तिथे फसाल. श्रद्धा आपोआपच आली तरच 'तिथे' (त्यांच्याकडे) बसा. श्रद्धा बसली पाहिजे. 'ठेवलेली' श्रद्धा किती दिवस टिकेल?

एका शेठने सांगितले, 'माझी तर बापजींवर खूप श्रद्धा आहे.' मी विचारले, 'तुम्हाला कशामुळे श्रद्धा आहे?' या शेठ, या शेठ असे म्हणून सगळ्यांच्या उपस्थितीत बोलावतात म्हणून तुमची श्रद्धा बसेलच ना! जी (सत्य) शोधणारी व्यक्ती असेल ती काय अशी श्रद्धा बसवेल? मी तर शोधणारा होतो. मी बापजींना म्हटले की, 'असे काही बोला की माझी

श्रद्धा बसेल. तुम्ही चांगले-चांगले बोलता की या अंबालालभाई, तुम्ही मोठे कॉन्ट्रॅक्टर आहात, असे आहात, तसे आहात, हे मला आवडत नाही. तुम्ही गोड-गोड बोलून श्रद्धा बसवाल त्यास काही अर्थ नाही. मला शिव्या देऊन सुद्धा असे काही बोला की माझी श्रद्धा बसेल. बाकी, हे 'यावे यावे' असे म्हटले तर हळूहळू लोकांची श्रद्धा बसते. म्हणून 'आम्हाला येथे चांगले वाटते' असे ते म्हणतील.

**प्रश्नकर्ता :** पण शिकले-सवरलेले विद्वान लोक लगेच समजतात ना?

**दादाश्री :** हो, पण सगळे शिकले-सवरलेले लोक लगेच समजतात की हे सगळे खोटे आहे, खोटे कुठपर्यंत चालवून घेतील?

श्रद्धा बसावी, म्हणून तर 'हे अमके शेठ यावे, यावे' असे म्हणतात. पण मग या शेठला बोलवत राहता आणि त्या भाऊंना का बोलवत नाही? त्यांना मनात वाटते की हे शेठ कधी तरी उपयोगी पडतील. चष्मा वगैरे मागवायचा असेल, काही मागवायचे असेल, काही हवे असेल तर कामाचे आहेत. आता ते शेठ तसे तर काळाबाजार करत असतील, बापजींना हे माहीतही असते. परंतु ते समजतात की, 'आम्हाला काय? काळाबाजार करतील तर ते भोगतील पण आम्ही चष्मा मागवू ना!' आणि शेठ काय समजतात की, 'काही हरकत नाही, बघा ना, बापजी अजूनही मान देतात ना!' तेव्हा आम्ही काही बिघडलेलो नाही.' बिघडले आहे असे ते कधी मानतील? तर जेव्हा बापजी त्यांना म्हणतील, 'ए, तुम्ही असे धंदे करत असाल तर येथे येऊ नका.' त्यामुळे मग शेठच्या मनात येऊ शकते की आता हा धंदा बदलावा लागेल, कारण बापजी आता येऊ देत नाहीत. म्हणजे 'यावे यावे' म्हटल्यावर बसलेली श्रद्धा टिकेल का? अशी श्रद्धा किती दिवस राहील? सहा-बारा महिने राहते, आणि नंतर उडून जाते.

## अशा श्रद्धेशिवाय मोक्ष नाही

म्हणजे श्रद्धा तर, मी शिव्या दिल्या तरी सुद्धा राहील, तीच खरी श्रद्धा! मान मिळाल्यामुळे थोडा काळ श्रद्धा बसली असेल, पण ती मग उडून जाते. अपमान करतात तिथे सुद्धा श्रद्धा बसते, मग ती बसलेली श्रद्धा उडत नाही. तुमच्या लक्षात आले ना? एकदा श्रद्धा बसल्यानंतर

आपल्याला शिव्या दिल्या, मारले तरी सुद्धा आपली श्रद्धा तुटत नाही, ती अविचल श्रद्धा म्हटली जाते. असे घडते का? अशी श्रद्धा बसल्याशिवाय मोक्ष नाही, हे तुम्हास गॅरेंटीने सांगतो.

बाकी, आपल्याला अनुकूल वाटले नाही आणि घरी निघून गेलो, ती श्रद्धाच म्हटली जात नाही. म्हणजे तुम्ही अनुकूलता शोधत आहात की मोक्ष शोधता आहात? अनुकूलता वाटली नाही म्हणून तिथून निघून गेलात त्यास काय श्रद्धा म्हणायची तुम्हाला काय वाटते? श्रद्धा म्हणजे तर, सोपवून दिले सगळेच!

## 'येथे' श्रद्धा येतेच

आणि मी असे म्हणत नाही की, 'माझ्यावर तुम्ही श्रद्धा ठेवा.' कारण मी श्रद्धा ठेवा असे सांगणाऱ्यापैकी नाही. पन्नास हजार लोक येथे येत असतील तर त्यांना माझ्या म्हणण्यावर श्रद्धा ठेवण्यास मी मनाई करतो. सगळ्यांना सांगतो की माझे एक अक्षर देखील मानू नका, आमच्यावर श्रद्धा ठेवू नका. तुमचा आत्मा कबूल करेल तरच आमची गोष्ट स्वीकारा. तुम्ही स्वीकार करवाच असे आम्हाला कधीच वाटत नाही.

आमच्या वाणीने त्याला नक्कीच श्रद्धा बसते. कारण सत्य वस्तू जाणली जाते, म्हणून श्रद्धा बसते, ती मग जात नाही. हे तर सत्य ऐकण्यास मिळाले नाही, म्हणून श्रद्धा बसत नाही आणि सत्य ऐकण्यास मिळाले म्हणजे श्रद्धा बसल्याशिवाय राहणारच नाही. आम्ही नाही म्हटले तरीही श्रद्धा बसूनच जाते. कारण मनुष्य सत्य गोष्ट सोडायला मागत नाही, जरी शिव्या दिल्या तरीही. तुम्ही 'श्रद्धा ठेवायचीच नाही' असे जरी निश्चित कराल तरीही देखील श्रद्धा येथेच बसेल. तुम्ही म्हणाल की 'आपले होते ते काय वाईट होते?' पण तरी आमच्यावर श्रद्धा बसेलच. आणि म्हणूनच स्वत:ची बऱ्याच काळाची श्रद्धा, अनंत जन्मांची श्रद्धा एकदम तोडण्यास तयार होतो. का? तर त्याची अशी श्रद्धाच बसते की हे आजपर्यंत ऐकलेले-जाणलेले सगळेच चुकीचे निघाले. आजपर्यंत ऐकलेले चुकीचे ठरते तेव्हा आपल्याला असे नाही का वाटत की ही तर आत्तापर्यंतची आपली सर्व मेहनत वाया जात आहे?

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** कारण सत्य गोष्टीवर श्रद्धा बसते. बसल्याशिवाय सुटकाच नाही ना.

## अडथळे थोपवितात श्रद्धेस

तरी सुद्धा काही लोकांना श्रद्धा बसत नाही, त्याचे काय कारण? कारण स्वत:नेच वरून पडदे घातले आहेत. फक्त हे लोभी शेठ आणि या अहंकारी जाणकारांना श्रद्धा बसत नाही. बाकी, या मजूरांना तर लगेच श्रद्धा बसते. कारण मजूरांजवळ जाणतेपणाची मिजास नसते आणि बँकेचा लोभ नसतो. हे दोन (रोग) नसतील ते ओळखूनच घेतात. या दोन रोगामुळेच तर अडले आहे लोकांचे. 'मी जाणतो' याचे अंतराय (विघ्न) घातले आहेत. नाही तर ज्ञानी पुरुषावर तर सहज श्रद्धा बसते. स्वत:नेच हे अडथळे घातले आहेत. पार्टिशन वॉल (विभागणीची भिंत) ठेवली आहे, म्हणून! आणि फार हुशार लोक ना (!) हे काही कच्चे पडत नाहीत, परफेक्ट झाले आहेत.

आणि माझा शब्द प्रत्येक व्यक्ती, जो की देहधारी मनुष्य आहे आणि ज्याच्याजवळ बुद्धीची साधारण समज आहे, बुद्धी डेव्हलप (विकसित) झाली आहे, त्याला अवश्य कबूल करावे लागते. कारण माझा शब्द आवरण भेदी आहे, तो सगळ्या आवरणांना भेदून आत्म्यालाच पोहोचतो. आत्म्याचा आनंद उत्पन्न करेल असा आहे. म्हणजे ज्याच्यात आत्मा आहे, तो मग वैष्णव असो किंवा जैन असो किंवा कोणीही असो, जो माझे म्हणणे ऐकेल, त्याची श्रद्धा बसलीच पाहिजे. पण जर आडमुठेपणा करायचा असेल, जाणून-बुजून उलटे बोलायचे असेल, तर ती वेगळी गोष्ट आहे. आडमुठेपणा करतात ना? समजतात, जाणतात तरी देखील वाकडे बोलतात ना? हिंदुस्तानात लोक अडेलटट्टु आहेत का? तुम्ही पाहिले आहेत?

**प्रश्नकर्ता :** बहुतेक तसेच आहेत.

**दादाश्री :** तो आडमुठेपणा काढायचा आहे. कोणी जाणून-बुजून

मतभेद निर्माण केला तर मी त्याला तोंडावर सांगेन की 'तुमचा आत्मा कबूल करत आहे, पण तुम्ही विरुध्द बोलत आहात हे. मी असे म्हटल्यावर तो समजतो आणि कबूल करतो की स्वत: विरुद्ध बोलत आहे. कारण विरुद्ध बोलल्याशिवाय राहवत नाही ना! का विरुद्ध बोलतो? तर त्याने तसा माल भरून ठेवला आहे, आडमुठेपणाचा माल भरला आहे. म्हणून ज्याचे पुण्य वाकडे असेल त्याची श्रद्धा बसत नाही. नाही तर ज्ञानी पुरुषांना तर श्रद्धेची मूर्ती म्हणतात.

## ज्ञानी, श्रद्धेची प्रतिमा

ज्ञानी पुरुष असे असतात की त्या मूर्तिला पाहताक्षणीच श्रद्धा बसते. श्रद्धा बसेलच अशी मूर्ती! श्रद्धेय म्हटले जातात. सगळ्या जगासाठी, सगळ्या वर्ल्डसाठी!! हा काळ असा विचित्र आहे की श्रद्धेची मूर्ती सापडत नाही. सगळ्या मूर्ती सापडतात, पण श्रद्धेची मूर्ती, निरंतर श्रद्धा बसेल अशी मूर्ती सापडतच नाही. जगात क्वचितच कधी श्रद्धेच्या मूर्तीचा जन्म होतो. श्रद्धेची मूर्ती म्हणजे पाहताक्षणीच श्रद्धा बसते. मग काही विचारावेच लागत नाही आपोआपच श्रद्धा बसते. शास्त्रकारांनी त्यांना श्रद्धेची मूर्ती म्हटली आहे. क्वचित काळी असे अवतार असतात, तेव्हा कल्याणच होते!! हा आमचा अवतारच असा आहे की आमच्यावर त्यांची श्रद्धा बसूनच जाते.

श्रद्धेची प्रतिमा व्हायला हवे. नालायक मनुष्याने सुद्धा एकदा चेहरा पाहिला की लगेचच श्रद्धा बसते. त्याक्षणी त्याचे भाव, त्याची परिणती बदलते, पाहाताक्षणीच पालटून जाते. अशी प्रतिमा, श्रद्धेची प्रतिमा क्वचितच कधी जन्म घेते. तीर्थंकर साहेब होते तसे!

म्हणजे कसे व्हायला हवे? श्रद्धेची प्रतिमा व्हायला हवे. परंतु श्रद्धा बसत नाही, याचे कारण काय असेल? स्वत:च! आणि हा, तर म्हणेल, 'लोक श्रद्धाच ठेवत नाहीत, तर काय करू'? आता ज्या गुरूंमध्ये योग्यता नसेल तेच असे बोलत राहतात की 'माझ्यावर श्रद्धा ठेवा.' अरे, पण लोकांना तुझ्यावर श्रद्धाच येतच नाही, त्याचे काय? तू असा बनून जा, श्रद्धेची प्रतिमा बन, की पाहताक्षणीच लोकांची तुझ्यावर श्रद्धा बसेल.

## मग वैराग्य कसे येईल?

**प्रश्नकर्ता :** जे लोक उपदेश करतात, त्यांचे आचरण त्यांच्या उपदेशापेक्षा वेगळे असते, मग श्रद्धा कशी उपजेल? असे सुद्धा होत असते?

**दादाश्री :** म्हणजे श्रद्धा बसणे ही काही सामान्य गोष्ट नाही. मनोरंजनासाठीच हे सगळे उपदेश असतात. कारण खरा उपदेश नाही हा. हे सर्व तर स्वत:चे मनोरंजन आहे.

**प्रश्नकर्ता :** हो. फक्त उपदेश रंजन असते आणि म्हणून तर वैराग्याचा रंग लागत नाही.

**दादाश्री :** वैराग्याचा रंग कुठे लागतो? कुठल्या वाणीने लागतो? तर जी वाणी सत्य असेल त्या वाणीने, ज्या वाणीचा उपयोग चुकीच्या मार्गाने होत नसेल, जी वाणी सम्यक् वाणी असेल, जिच्यात वचनबळ असेल, तिथे रंग लागतो. त्याशिवाय असेच वैराग्य कसे येईल? तशी तर पुस्तकेही सांगतातच ना! जसे पुस्तके सांगतात तरीही त्याला वैराग्य येत नाही, तसेच हे गुरू सांगतात त्यामुळेही वैराग्य येत नाही. पुस्तकांसारखेच गुरूही झाले आहेत. जर आपल्याला वैराग्य आले नाही तर समजावे की हे पुस्तकी गुरू आहेत. वचनबळ असले पाहिजे ना!

## यात चूक उपदेशकाची

**प्रश्नकर्ता :** कित्येक वेळा असे घडते की उपदेश ऐकण्यासाठी पंचवीस लोक बसले असतील, त्यातील पाच जणांवर उपदेशाचा परिणाम होतो आणि बाकीचे वीस तसेच्यातसेच कोरडे राहतात. तर यात उपदेशकाची चूक आहे की ग्रहण करणाऱ्याची चूक आहे?

**दादाश्री :** यात बिचाऱ्या ऐकणाऱ्याची काय चूक? उपदेशकाची चूक आहे. ऐकणारे तर असेच आहेत. ते स्पष्टच सांगतात ना की, साहेब, आम्हाला काहीच येत नाही, म्हणून तर तुमच्याजवळ आलो आहोत. परंतु हा तर उपदेशकांनी रस्ता शोधून काढला आहे, स्वत:चा बचाव शोधून काढला आहे की, 'तुम्ही असे करत नाहीत, तुम्ही असे.....' असे म्हणू नये. ते तुमच्याजवळ मदतीसाठी आले आहेत आणि तुम्ही असे करता?

ही तर उपदेशकाची चूक आहे. ही शाळेसारखी गोष्ट नाही. शाळेची गोष्ट वेगळी आहे. शाळेत मुले काही करत नाहीत, ते वेगळे आहे आणि हे वेगळे आहे. येथे तर आत्महितासाठी आले आहेत. ज्यात दुसरी कुठलीही वाईट दानत नाही. संसाराच्या हितासाठी आलेले नाहीत. म्हणून या उपदेशकांनीच सगळे काही करायला हवे.

मी तर सगळ्यांना सांगतो की, 'भाऊ, तुमच्याकडून जर काहीच होत नसेल तर ती माझीच चूक आहे. तुमची चूक नाही, 'तुम्ही माझ्याजवळ रिपेयर (दुरुस्त) करविण्यासाठी आलात की 'हे माझे रिपेअर करा' मग ते रिपेयर झाले नाही तर ती कोणाची चूक?

**प्रश्नकर्ता :** पंचवीस लोक बसले असतील, पाच जणांना प्राप्ती झाली आणि वीस जणांना प्राप्ती झाली नाही, तर त्यात गुरूंचीच चूक आहे का?

**दादाश्री :** गुरूचीच चूक.

**प्रश्नकर्ता :** त्यांची कोणती चूक आहे?

**दादाश्री :** त्यांचे चारित्र्यबळ नाही. त्यांनी चारित्र्यबळ विकसित करायला हवे. रात्री बर्फ ठेवला असेल, तर समजदार किंवा नासमजदार सर्वांवर त्याचा परिणाम नाही का होणार? थंडावा लागतोच ना? म्हणजे चारित्र्यबळ पाहिजे. परंतु यांच्याजवळ तर स्वत:चे चारित्र्यबळ नाही. म्हणून लोकांनी असे शोधून (!) काढले, आणि मग शिष्यावर चिडत राहतात. याला काही अर्थच नाही ना! ते बिचारे तर तसेच आहेत. ते घेण्यासाठी आले आहेत, त्यांच्याशी क्लेश-कटकट करायची नसतो.

## अनुभवाची तर गोष्टच निराळी

**प्रश्नकर्ता :** स्वत:ला अनुभवाने ज्ञान प्राप्त होणे आणि दुसऱ्याने उपदेश दिल्यावर ज्ञान प्राप्त होणे, हे दोन्ही जरा समजवा.

**दादाश्री :** उपदेशाचे तर, आम्ही शास्त्रात (सांगितलेले) वाचतो ना, त्यासारखे आहे. परंतु उपदेशकांमध्ये जर कोणी पुरुष वचनबळवाला

असेल की ज्याचा शब्द आपल्या (मनात) घर करून राहतो आणि तो बारा-बारा महिन्यांपर्यंत निघत नाही, विसरायला होत नाही, त्या उपदेशाची तर गोष्ट निराळी आहे. नाही तर ज्याचा उपदेश एका कानाने ऐकून दुसऱ्या कानाने सोडून दिला जातो, अशा उपदेशाची काही किंमतच नाही. तो उपदेश आणि पुस्तक हे दोन्ही सारखेच.

ज्याचा उपदेश आणि ज्याचे वाक्य, ज्याचे शब्द आपल्या आत बरेच महिने घुमत राहतात, अशा उपदेशाची अत्यंत गरज आहे. त्यास अध्यात्म विटामिनवाला उपदेश म्हटला जातो. तो क्वचितच असू शकतो. परंतु त्यासाठी ते स्वत: चारित्र्यवान असले पाहिजेत, व्यवहार चारित्र्यवान! शीलवंत असले पाहिजेत की ज्यांचे दोष मंद झालेले असतील.

## शब्दांच्या मागे करुणाच वाहते

बाकी, हे सगळे उपदेश देतात ना की, 'असे करा, तसे करा,' परंतु त्यांची वेळ आली की लगेच ते चिडून उभे राहतात. हे तर उपदेशाच्या गोष्टी करतात तेवढेच. वास्तविकरित्या उपदेश देण्याचा अधिकार कोणाला आहे? जो चिडत नाही, त्यालाच उपदेश देण्याचा अधिकार! हे तर समोरच्याने जरासे काही सांगितले की लगेच फणकारतात, 'माझ्यासारखा जाणकार, 'मी असा व मी तसा' म्हणजे भ्रांतीतच बोलत राहतो, 'मी, मी, मी, मी,...' म्हणूनच काही सुधारत नाही ना!

हा तर वीतराग मार्ग म्हटला जातो. पुष्कळच जोखमदारीचा मार्ग! एक शब्द सुद्धा बोलणे खूप जोखमीची वस्तू आहे. उपदेशकांना तर आता खूप जबाबदारी आहे. परंतु लोक समजत नाहीत, जाणत नाहीत, म्हणून उपदेश करतात. तेव्हा आता तुम्ही उपदेशक आहात की नाही, ते तुम्ही स्वत:च पारखून पाहा. कारण उपदेशक आर्तध्यान-रौद्रध्यानापासून मुक्त असला पाहिजे. शुक्ल ध्यान झाले नसेल तरीही हरकत नाही, कारण धर्मध्यानाची विशेषता वर्तत आहे. परंतु आर्तध्यान आणि रौद्रध्यान हे दोन्ही होत असतील, तर जबाबदारी स्वत:चीच आहे ना! भगवंताने सांगितले आहे की जोपर्यंत क्रोध-मान-माया-लोभ तुमच्याजवळ शिल्लक असतील, तोपर्यंत कोणाला उपदेश करू नका.

म्हणून मला सांगावे लागते की हे जे तुम्ही व्याख्यान देत आहात, परंतु तुम्हाला फक्त स्वाध्याय करण्याचा अधिकार आहे. उपदेश देण्याचा अधिकार नाही. अधिकार नसूनही उपदेश दिला तर हा उपदेश कषायसहीत असल्यामुळे नरकात जाल. ऐकणारा नरकात जाणार नाही. ज्ञानी असून मला असे कठोर शब्द बोलावे लागतात. तेव्हा त्याच्या मागे किती करुणा असेल! ज्ञानींना कठोर होण्याची गरजच काय? ज्यांना अहर्निश परमानंद, अहर्निश मोक्ष वर्तत असतो, त्यानां कठोर होण्याची काय गरज? परंतु ज्ञानी असून असे कठोर बोलावे लागते की, 'सावधान राहा, स्वाध्याय करा' 'लोकांना तुम्ही असे सांगू शकता की, 'मी माझा स्वाध्याय करत आहे, तर तुम्ही ऐका'. परंतु कषायसहीत उपदेश देऊ नये.

## वचनबळ तर हवेच ना

मी तुम्हाला उपदेश देत राहिलो तर तुम्ही शिकणार नाही. परंतु तुम्ही माझे वर्तन पाहाल तर ते तुम्हाला सहज शिकता येईल. म्हणून तिथे उपदेशाने काही साध्य होत नाही. ती वाणी व्यर्थ जाते. तरी आपण त्यास चुकीचे आहे असे म्हणू शकत नाही. कोणाचेच चुकीचे नसते. परंतु याचा काही अर्थच नाही, सर्व अर्थशून्य आहे. ज्या बोलण्यात काही वचनबळ नाही, त्यास काय म्हणाल? आपण त्यांना स्षष्टपणे सांगावे की 'तुमचे बोलणेच खोटे आहे.' व्यर्थ का जाते? तुमचे बोलणे माझ्यात रुजले पाहिजे. तुमचे बोलणे रुजतच नाही.' बोलणे किती वर्षाचे आहे? जुने बोलणे, ते रुजणार नाही. वाणी 'प्योर (शुद्ध) असावी, वचनबळसहित असावी. आपण सांगावे की, 'तुम्ही असे वचन बोला की ज्यामुळे माझ्यावर काही परिणाम होईल''. वचनबळ तर मुख्य वस्तू आहे. मनुष्याजवळ वचनबळ नसेल तर काय कामाचे?

गुरू तर त्यांना म्हटले जाते की ते जी वाणी बोलतात ना, ती आमच्या आपोआपच परिणमित होते, अशी वचनबळ असलेली वाणी असते! हे तर स्वत: क्रोध-मान-माया-लोभातच असतात आणि आम्हाला उपदेश देतात की, 'क्रोध-मान-माया-लोभ सोडा' म्हणून तर हा सगळा

माल बिघडून गेला आहे ना! शंभरात दोन-पाच असे चांगले असतील. वचनबळ म्हणजे तोंडाने जसे बोलेल तसेच समोरच्याचे होईल. आता असे वचनबळ नसेल, तर ते काय कामाचे?

मी लहान असताना असे सांगत असे की तुम्ही जो उपदेश देत आहात, तसे तर पुस्तक सुद्धा बोलते. मग तुमच्यात आणि पुस्तकात फरक काय राहिला? त्यापेक्षा तर पुस्तक चांगले. असे वाकून तुमच्या पाया पडणे, त्यापेक्षा तर पुस्तक चांगले. तुम्ही असे काही बोला की 'माझ्यावर त्याचा परिणाम होईल, माझे चित्त त्याच्यात राहील' हे तर काय म्हणतात? 'करा, करा, करा, करा!' 'हे करा' तर काय करु? माझ्याकडून होत नाही आणि तुम्ही सारखे 'हे करा, करा' असे का सांगता? यासाठी तर वचनबळ पाहिजे, वचनबळ! ते बोलतात तसे समोरच्यात होते, तरच ते गुरू म्हटले जातील. नाही तर त्यांना गुरू म्हणता येणारच नाही. ज्ञानी पुरुष तर मोक्ष देतात. पण गुरू केव्हा म्हणायचे? वचनबळ असेल तर. कारण त्यांच्या वचनामध्ये खोटेपणा-कपट वगैरे नसते. त्यांच्या वचनात वचनबळ असते. तुमच्या लक्षात येत आहे ना की मी काय म्हणत आहे ते?

**प्रश्नकर्ता :** हो, हो.

**दादाश्री :** खूप गहन गोष्ट आहे. परंतु लोकांना हे कसे समजेल? दुकाने चालतात. चालू द्या ना! उगाच आपण डोकेफोड का करावी? काळामुळे चालू राहिले आहे.

बाकी, तुम्ही जे म्हणता ते पुस्तकात सांगितले आहे. मग तुमच्यात आणि पुस्तकात फरक काय राहिला? जर तुम्ही जिवंत असून काही करु शकत नाही, मग त्यापेक्षा हे पुस्तक चांगले! काही पावर (शक्ती) असते की नाही? भले मोक्षाची पावर नसेल, पण संसार व्यवहाराची तर असेल ना? व्यवहारात सुद्धा शांती राहील असे काही सांगा. तुम्हाला जर शांती लाभली असेल, तर आम्हाला लाभेल. तुम्हालाच शांती वाटत नसेल मग आम्हाला कशी वाटेल?

## परंतु ती रीत शिकवा

हे तर गुरू सांगतात, 'मॉरल आणि सिन्सिअर व्हा. बी मॉरल आणि

बी सिन्सिअर!' अरे, तू मॉरल बन ना! तू मॉरल झालास तर तुला मला सांगावे लागणार नाही. मॉरल होऊन मला सांग तर मी मॉरल होईन. तुला पाहताक्षणीच मॉरल होऊन जाईन. जसे पाहतो तसे आम्ही होऊनच जातो. परंतु तो स्वत:च झाला नाही ना!

माझ्यात वीतरागता असेल ती तुम्ही पाहाल, आणि एकदा पाहिले की मग होईल. कारण मी तुम्हाला करून दाखवत आहे म्हणून मग तुम्हालाही ते जमेल. म्हणजे मी प्योर असेल तरच लोक प्योर होऊ शकतील! अर्थात कम्पलीट प्योरिटी असली पाहिजे.

मी तुम्हाला 'मॉरल बना' असे सांगत राहत नाही, परंतु 'मॉरल कसे होता येईल' ते मी सांगतो. मी असे म्हणतच नाही की 'तुम्ही असे करा, चांगले करा किंवा असे बनून या'. मी तर 'मॉरल कसे होता येईल' ते सांगतो, रस्ता दाखवतो, तेव्हा लोकांनी काय केले? 'ही रक्कम आणि हे उत्तर' अरे, पण रीत शिकव ना! रक्कम व उत्तर तर पुस्तकात लिहिलेच आहेत पण परंतु त्याची रीत तरी शिकव!! पण रीत शिकवणारा कोणी निघालाच नाही. रीत शिकवणारा निघाला असता तर हिंदुस्तानची ही दशा झाली नसती. हिंदुस्तानची दशा तर पाहा आज! कशी दशा झाली आहे!!!

## खऱ्या गुरूंचे गुण

**प्रश्नकर्ता :** मला हे कसे समजेल की माझ्यासाठी खरे गुरू कोण आहेत?

**दादाश्री :** जिथे बुद्धी नसेल आणि बॉडीची ओनरशिप (देहाचा मालकीपणा) नसेल तिथे. मालकीपणा असेल तर त्यांचाही मालकीपणा व आपला सुद्धा मालकीपणा, दोघेही सामोरे ठाकतील! मग काम होणार.

मग, जे आपल्या मनाचे समाधान करतील, ते आपले गुरू. तसे गुरू मिळाले नाही तर दुसऱ्या गुरूंचा काय उपयोग?

गुरू तर आपल्याला सर्व प्रकारे मदत करतील, असे पाहिजेत. म्हणजे प्रत्येक गोष्टीत आपल्याला मदत करतील. पैशांच्या अडचणीत

सुद्धा मदत करतील. जर गुरू महाराजांकडे असतील तर ते म्हणतील, 'भाऊ, घेऊन जा, माझ्याकडे आहेत' असे असले पाहिजे. गुरू म्हणजे हेल्पिंग-मदतकर्ता, आई-वडिलांपेक्षाही आमची विशेष काळजी घेतात, तर त्यांना गुरू म्हटले जाते. हे लोक तर बळकावतात. पाच-पन्नास-शंभर रुपये बळकावतात.

दुसऱ्यांसाठी जीवन जगत असतील असे गुरू असले पाहिजेत! स्वत:साठी नाही.

नंतर गुरू जरा शरीराने सुदृढ असले पाहिजेत. दिसायला चांगले असावेत. दिसायला चांगले नसतील तरी कंटाळा येतो. 'येथे कुठे याच्याकडे येऊन बसलो? ते दुसरे गुरू तर किती सुंदर होते!' असे म्हणतात मग. दुसऱ्यांबरोबर अशी तुलना करणार नसाल तरच गुरू करा. गुरू करायचे असेल तर समजून-उमजून कर. गुरू फक्त करण्यासाठीच करावे, अशी गरज नाही.

आणि त्यांच्यात तर स्पृहाही नसते आणि नि:स्पृहता सुद्धा नसते. नि:स्पृहता नसेल, तर काही स्पृहा आहे का? नाही, तुमच्या पौद्‌गलिक बाबतीत म्हणजे भौतिक बाबतीत नि:स्पृह आहेत, आणि आत्म्याच्या बाबतीत ते स्पृहावाले आहेत. हो, संपूर्ण नि:स्पृह नाहीत ते!

गुरू असे असावेत की ज्यांना कुठल्याही प्रकारची इच्छा नसेल. त्यांना लक्ष्मी नको असेल आणि विषयविकारही नको असेल. त्या दोन्ही गोष्टींची त्यांना गरज नसते. मग सांगावे की, मी तुमचे पाय चेपीन, डोके चेपीन. पाय चेपण्यात आमची हरकत नाही. पाय चेपावे, सेवा करावी.

मोक्षाच्या मार्गावर तर त्यांचे गुरू आत्मज्ञानी असले पाहिजेत. आणि तसे आत्मज्ञानी गुरू नाहीतच, म्हणून तर सगळी केस बिघडून गेली आहे.

## तेव्हा म्हणू शकतो, गुरू मिळाले

म्हणून मी तर कुणाचे ऐकतच नव्हतो. कारण मला त्यांच्यात काही बरकत दिसत नव्हती. त्यांच्या चेहऱ्यावर तेज दिसत नव्हते, त्यांच्याकडून

पाच माणसे सुधारली असतील, तर मला दाखवा की ज्यांचा क्रोध-मान-माया-लोभ यांचा कमकुवतपणा निघून गेला असेल किंवा मतभेद कमी झाले असतील.

**प्रश्नकर्ता :** आपल्याला खरे गुरू मिळालेत की नाही ते जाणण्याची आपली शक्ती किती?

**दादाश्री :** पत्नीबरोबरचे मतभेद मिटले असतील, तर समजावे की त्याला गुरू मिळाले आहेत. हे तर पत्नीशी सुद्धा मतभेद होतच राहतात. रोजच भांडणे होत असतात. अर्थात जर गुरू मिळाले आणि काही विशेष फरक पडला नाही, तर काय त्याचा उपयोग?

हा तर क्लेश जात नाही. कमकुवतपणा जात नाही आणि म्हणतात की, 'मला गुरू मिळाले आहेत.' आपल्या घरातील क्लेश जाईल, कलह संपेल, तरच गुरू मिळाले असे म्हणता येईल. त्याशिवाय गुरू मिळाले असे कसे म्हणू शकतो? हे तर स्वत:चा पक्ष मजबूत करतात की 'आम्ही या पक्षाचे आहोत'. म्हणजे स्वत:चा पक्ष मजबूत करतात आणि (संसाराची) गाडी चालवतात. अहंकार इकडचा होता, तो त्या बाजूस वळवला. आपल्याला जरी सहाच महिने खरे गुरू मिळाले असतील तरी गुरू इतके तर नक्कीच शिकवतीलच की ज्यामुळे घरातील क्लेश संपेल. फक्त घरातूनच नाही, मनातून सुद्धा क्लेश निघून जाईल. मनात सुद्धा क्लेशित भाव नसेल आणि जर क्लेश होत असेल, तर त्या गुरूंना सोडून द्यावे. नंतर दुसरे गुरू शोधून काढावे.

बाकी, चिंता-उपाधि असेल, घरात मतभेद असतील, ही सगळी गुंतागुंत जर गेली नसेल तर ते गुरू काय कामाचे? त्या गुरूला सांगा की, 'मला अजूनही राग येतो, घरात मी मुला-मुलींवर चिडतो, तर ते तुम्ही थांबवा. नाही तर मग पुढच्या वर्षी तुम्हाला कॅन्सल (रद्द) करीन.' आपण असे सांगू शकतो की नाही? तुम्हाला काय वाटते? नाही तर या गुरूंना सुद्धा 'मिठाई' मिळत राहते आरामात, हप्ता मिळतच राहतो ना! म्हणजे हा सगळा अंधेर चालू आहे हिंदुस्तानात. फक्त आपल्या हिंदुस्तान देशातच नाही, तर सगळीकडेच असे झाले आहे.

## असे पारखले जाते खरे नाणे

**प्रश्नकर्ता :** खरे गुरू आहेत, हे जाणण्यासाठी काही पक्की खूण आहे का?

**दादाश्री :** ओळखीसाठी तर, आपण शिव्या दिल्या, तर क्षमा करत नाहीत पण सहज क्षमा होऊन जाते. आपण मारले तरी सुद्धा क्षमा असते. हवा तसा अपमान केला तरी सुद्धा क्षमाच असते. मग ते सरळ असतात. त्यांना आमच्याजवळ काही लालूच नसते. आमच्यापाशी पैशासंबंधी मागणी करत नाही. आणि आम्ही काही प्रश्न विचारले, तर त्या प्रश्नाचे समाधान करतात आणि जर त्यांना छेडले, सतावले तरी सुद्धा ते फणा काढत नाहीत. कदाचित काही चूक झाली असेल तरीही फणा काढत नाही. फणा काढतात त्यांना काय म्हणतात? फणाधारी नाग म्हणतात. ही सगळी त्यांची ओळख सांगितली.

नाही तर मग गुरूची पारख केली पाहिजे आणि नंतर गुरू बनवले पाहिजेत. वाटेल त्याला गुरू करून बसतो त्याला काही अर्थ नाही!

**प्रश्नकर्ता :** कोण कसा आहे ते कसे कळू शकेल?

**दादाश्री :** पूर्वीच्या काळातीत एडवर्ड रुपये आणि राणी छापाचे रुपये तुम्ही पाहिले होते का? आता तो रुपया असेल तरीही लोक विश्वास ठेवत नव्हते. अरे, हे रुपये आहेत, व्यवहारात त्याचे चलनही आहे ना? परंतु नाही, तरी सुद्धा त्याला दगड किंवा लोखंडावर आपटत होते! अरे, लक्ष्मीला आपटू नकोस, पण तरीही आपटत होते. का आपटत असतील? रुपया खणखणला त्यामुळे तो कलदार आहे की खोटा आहे हे नक्कीच कळेल की नाही? असे खणखणला की खननन... बोलला तर आम्ही त्यास तिजोरीत ठेवतो आणि जर खोटा निघाला तर कापून टाकतो किंवा फेकून देतो. अर्थात अशी टेस्ट करून पाहा, रुपया खणखणून पाहावे. तसेच नेहमी गुरूचीही टेस्ट करा.

**प्रश्नकर्ता :** परीक्षा करायची?!

**दादाश्री :** टेस्ट! परीक्षा करता येणार नाही. बालक असेल तो प्रोफेसरची परीक्षा कशी घेईल?

**प्रश्नकर्ता :** मग टेस्ट आणि परीक्षेत काय फरक आहे?

**दादाश्री :** टेस्टमध्ये आणि परीक्षेत पुष्कळ फरक आहे. टेस्टमध्ये तर आम्ही इतकेच सांगायचे की, 'साहेब, तुम्ही हे सर्व सांगितलेत, परंतु मला तर एकही गोष्ट खरी वाटत नाही.' इतकेच बोला. त्याची टेस्ट एकदमच होईल. ते फणा उभारतील. मग आम्ही समजू की हा तर फणाधारी साप आहे, तेव्हा हे दुकान आपल्यासाठी (योग्य)नाही. दुकान बदला. दुकान बदलण्याचे आपल्याला नाही का कळणार?

**प्रश्नकर्ता :** परंतु दादा, गुरूला असे सांगणे हा अविनय नाही म्हटला जाणार?

**दादाश्री :** असे आहे, की अविनय केला नाही, तर आम्ही कुठपर्यंत असेच्या असे बसून राहणार? आम्हाला सिल्क हवे आहे, 'डबल घोडा' कंपनीचे सिल्क हवे आहे, त्यासाठी प्रत्येक दुकानात फिरुन-फिरुन बघितले, तेव्हा कोणी म्हणेल की,'भाऊ, त्याच्या दुकानात, त्या खादी भंडारात जा'. मग त्या दुकानात जाऊन आपण बसून राहिलो पण काही विचारले वगैरे नाही, तर तिथे किती वेळ बसून राहायचे? त्यापेक्षा तुम्ही विचारा की, 'भाऊ, तुमच्याकडे डबल घोड्याचे सिल्क असेल तर मी येथे बसतो. मग सहा तास बसून राहीन, पण ते आहे का तुमच्याकडे? तेव्हा तो म्हणतो 'नाही' मग आपण उठून दुसऱ्या दुकानात जाऊ.

तरी पण येथे एक गुन्हा तर होतोच. माझ्या या समजुतीचा आधार घेऊन सटकायचे नाही. ज्याला तुम्ही असे म्हटले की, 'तुमचे हे ठीक नाही' त्यामुळे त्याचे मन तर दुखावले गेले, तेवढ्यापुरता तो अविनय धरला जातो. म्हणून त्यांना सांगा की, 'साहेब, कधी-कधी माझे डोके जरा फिरते' मग ते म्हणतील, 'काही हरकत नाही, काही हरकत नाही' तरी पण त्यांना दु:ख वाटत असेल तर मग आपल्याला पाच-पन्नास रुपये खिशात ठेवावे लागतात आणि त्यांना विचारावे लागते की 'तुम्हाला चष्मा वगैरे काही हवा आहे का? जे काही पाहिजे असेल ते सांगा' नाही तर मग आपण म्हणावे 'साहेब, एक शाल आहे, त्याचा स्वीकार करा. माझ्या डोक्यावर हात ठेवा.' ती शाल दिली म्हणजे ते खुश! मग आपल्याला

कळते की रुपयाला खणखणवले तर तो दावा मांडत नाही आणि येथे तर हे दावा मांडतील. म्हणून आपण ती शाल त्यांना द्यावी. तेवढे शंभर रुपयाचे नुकसान सहन करावे लागेल. परंतु आम्ही त्या दुकानातून फसण्यापासून तर वाचलो ना! माझे काय म्हणणे आहे की कुठपर्यंत फसत राहायचे?

आणि ज्या गुरूंना राग-द्वेष होत नाहीत, ते अंतिम गुरू! त्यांना जेवण वाढल्यानंतर लगेच ताट उचलून घेतले तरी त्यांच्या डोळ्यात काही फरक दिसला नाही, डोळ्यात क्रोध दिसला नाही, तर समजावे की हे आहेत 'अंतिम' गुरू! आणि जर क्रोध दिसला तर त्या गोष्टीत काही दमच नाही ना! तुमच्या लक्षात आले का हे?

**प्रश्नकर्ता :** हो. हो.

**दादाश्री :** म्हणजे परीक्षा हेतूसाठी नाही, पण शोध ठेवला पाहिजे. फक्त परीक्षा हेतूसाठी असेल तर ते वाईट दिसेल. परंतु जरा लक्ष ठेवले पाहिजे की त्यांच्या डोळ्यात असे का होत आहे! जेवणाचे ताट उचलले तेव्हा जर डोळ्यात बदल झाला तर लगेच म्हणा की, 'नाही, दुसरे चांदीचे ताट आणतो.' परंतु पाहून घ्यावे की 'डोळ्यात बदल होत आहे की नाही.' शोध तर घ्यायला हवा ना?

आपली फसवणूक करुन घेऊन माल आणला तर तो काय कामाचा? माल आणण्यासाठी गेलात, तर त्याने माल बघितला तर पाहिजे ना! बघायला नको का? जरा खेचून पाहावे लागते ना? नंतर फाटके निघाले तर लोक म्हणतील, 'तुम्ही शाल बघून का घेतली नाही?' असे म्हणतील की नाही? म्हणून श्रीमद् राजचंद्र म्हणतात ना, 'गुरू नीट बघून करा, पारखून करा!' नाही तर ते तुम्हाला भटकत ठेवतील. तेव्हा वाटेल त्याला गुरू करुन भागणार नाही. एकदा फसल्यानंतर काय करु शकतो! म्हणून सगळ्या बाजूंनी बघावे लागते.

## उघड केल्या गोष्टी, वीतरागतेने

या कलियुगात चांगले गुरू मिळणार नाहीत, आणि गुरू तुमची भाजी करून खातील.

**प्रश्नकर्ता :** बरोबर आहे, पण अपवादस्वरूप एखादा तरी खरा गुरू असेलच ना?

**दादाश्री :** कोणी चांगले गुरू असतील तर तो डब्बा असेल. डब्बा म्हणजे त्याला काही सुद्धा समजत नसेल. मग त्या समज नसलेल्या गुरूचे काय करणार? ज्यांना समज असते ते मग दुरुपयोग करतात. त्यापेक्षा तर घरी पुस्तके असतील, ती धरुन त्यांचे मनन करत राहणे चांगले. म्हणजे आता जसे आहेत तसे गुरू चालणार नाहीत. त्यापेक्षा गुरू न केलेलेच बरे. गुरूशिवाय तसेच राहणे चांगले.

**प्रश्नकर्ता :** आमच्या संस्कृतीप्रमाणे बिनगुरूचा मनुष्य *नगुणो* म्हटला जातो.

**दादाश्री :** हे तुम्ही कुठे ऐकले?

**प्रश्नकर्ता :** संत पुरुषांकडून ऐकले होते.

**दादाश्री :** हो, पण ते काय म्हणतात? *नगुणो* नाही, पण *नगुरो.* गुरू नसलेला किंवा *नगुरो* म्हणतात. *नगुरो* म्हणजे गुरू नसलेला! ज्याला कोणी गुरू नसेल त्यांना आपले लोक नुगरो म्हणतात.

बारा वर्षाचा असताना आमची कंठी तुटली होती, तेव्हा लोक मला 'नगुरो, नगुरो' असे म्हणायचे. सगळेच म्हणायचे, 'कंठी तर घातलीच पाहिजे. आपण पुन्हा कंठी घालू.' मी म्हटले या लोकांकडून काय कंठी बांधून घ्यायची असते? ज्यांचा प्रकाश नाही, ज्यांच्याकडे दुसऱ्यांना प्रकाश देण्याची शक्तीच नाही, त्यांच्याकडून कंठी कशी बांधून घेणार? तर म्हणतात, 'लोक नगुरो म्हणतील' आता नगुरो म्हणजे काय असेल? नगुरो म्हणजे कुठली तरी शिवीगाळ असेल, असे मला वाटलेले. ते मग मी मोठा झाल्यावर, मला कळले की नगुरो म्हणजे नगुरू-गुरू नसलेला!

**प्रश्नकर्ता :** जर कुणाला गुरू मानायचे असेल, तर त्यासाठी विधी असतात, कंठी घालतात, कपडे बदलवतात, अशी काही गरज असते का?

**दादाश्री :** अशी कोणतीच गरज नसते.

**प्रश्नकर्ता :** धर्मगुरू असे का म्हणतात की कंठी बांधली असेल त्याला देव तारतो आणि नगुरोला कोणी तारत नाही. ही गोष्ट खरी आहे?

**दादाश्री :** त्याचे असे आहे की, या मेंढपाळांनी ही गोष्ट पसरवली होती. मेंढपाळ मेंढ्यांना असे सांगतात की, 'नगुरो होऊन फिरू नकोस' मग मेंढ्यांना वाटते की, 'ओहोहो! मी नगुरो नाही. चला तर कंठी बांधा! गुरू करा!' म्हणून हे गुरू केले. म्हणजे हे मेंढे आणि ते मेंढपाळ!! पण तरी आम्ही हे शब्द बोलता कामा नये. परंतु जिथे ओपन (स्पष्ट) समजायचे असेल, तिथे फक्त समजण्यासाठी सांगतो. ते सुद्धा वीतरागतेने सांगतो. आम्ही असे शब्द बोलतो, परंतु आम्हाला सुद्धा राग-द्वेष होत नाही. आम्ही ज्ञानी पुरुष आहोत, आम्ही जबाबदार म्हटले जातो. आम्हाला कोणत्याही जागी, थोडा सुद्धा राग-द्वेष नसतो.

**प्रश्नकर्ता :** मला दोन-तीनदा साधू- संन्यासी भेटले, ते म्हणाले की, 'तुम्ही कंठी बांधून घ्या' मी नाही म्हटले. 'मला बांधून घ्यायची नाही.'

**दादाश्री :** हो पण जे पक्के आहेत, ते बांधून घेत नाहीत ना! आणि जो कच्चा असेल तो तर बांधूनच घेईल ना!

**प्रश्नकर्ता :** गुरूकडून कंठी बांधून घ्यायची नसेल, पण आम्हाला एखाद्या गुरूप्रति पूज्यभाव निर्माण झाला असेल, आणि त्यांचे ज्ञान घेतले, तर कंठी बांधल्याशिवाय गुरू शिष्यांचा संबंध प्रस्थापित झाला असे म्हटले जाईल की नाही? काही शास्त्र व आचार्यांनी असे सांगितले आहे की नगुरो असेल त्याचे तोंड सुद्धा पाहू नये.

**दादाश्री :** असे आहे, की वाड्यात (संप्रदायात) घुसायचे असेल तर कंठी बांधावी आणि स्वतंत्र राहायचे असेल तर कंठी बांधून घेऊ नका. जिथे ज्ञान दिले जात असेल त्यांची कंठी बांधा.वाडा म्हणजे ते काय म्हणायचे आहे की प्रथम तू ह्या स्टँडर्डसाठी तयार हो! ह्या थर्ड स्टँडर्ड मध्ये तयार हो, तोपर्यंत आणखी कुठे व्यर्थ प्रयत्न करू नकोस, असे सांगू इच्छितात.

बाकी, नगुरो कसे म्हणायचे? नगुरो तर या काळात कोणीच नाही.

नगुरो कोणी म्हटलेले? हे जे कंठीवाले गुरू आहेत ना, त्यांनी नगुरो उभा केला आहे. त्यांचे ग्राहक कमी होणार नाहीत म्हणून. कंठी बांधली नसेल त्यास हरकत नाही. ही कंठी तर, एक प्रकारचा मनात सायकॉलॉजिकल इफेक्ट (मानसिक परिणाम) ठसवतात. हे सगळे संप्रदायिक मतवाले काय करतात? लोकांना कंठ्याच बांधत राहतात. मग त्याच्यावर परिणाम होतो की, 'मी या संप्रदायाचा! मी या संप्रदायाचा!' म्हणजे सायकॉलॉजिकल इफेक्ट होतो. परंतु ते चांगले आहे. ते काय चुकीचे नाही. ते आपल्याला नुकसानकारक नाही. तुम्हाला 'नगुरो' ची काळजी करायची नाही, 'नगुरो' म्हटले तर तुमची अब्रू जाईल, असे वाटते का तुम्हाला?

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** मग 'नगुरो' ची चिंता तुम्ही का करता?

**प्रश्नकर्ता :** त्या कंठीची गोष्ट आली ना, म्हणून.

**दादाश्री :** हो. पण कंठी घालणाऱ्यांना असे सांगावे की, 'ही घातलेली कंठी मी कुठपर्यंत ठेवीन? मला फायदा होत असेल तोपर्यंत ठेवीन. नाही तर मग तोडून टाकीन' अशी त्यांना अट घातली पाहिजे. त्यांनी विचारले की ' तुम्हाला कोणता फायदा हवा आहे?' तेव्हा आपण सांगावे 'माझ्या घरात कटकट होता कामा नये. नाही तर मी कंठी तोडून टाकीन.' आधीच असे सांगायला हवे. लोक असे सांगत नसतील ना? येथे तर कटकटही चालू असते आणि कंठी सुद्धा चालू असते. कंठी बांधून सुद्धा क्लेश होत असेल तर आपण ती कंठी तोडून टाकावी. गुरूला सांगावे की, 'ही घ्या, तुमची कंठी परत. तुमच्या कंठीत काहीच गुण नाही. ही कंठी तुम्ही मंत्रून दिलेली नाही. अशी मंत्रून द्या की माझ्या घरात भांडणे होणार नाहीत.

**प्रश्नकर्ता :** कंठी बांधली नसेल तोपर्यंत उपदेश ऐकला तरी पण ज्ञान (डोक्यात) उतरत नाही, असे ते सांगतात.

**दादाश्री :** घ्या! कंठी बांधली नाही तर तुम्हाला ज्ञान होणार नाही (!) किती धमकावतात! ओरडून, ओरडून या सगळ्यांना सरळ करतात!!!

## कोणाची गोष्ट आणि कोणी धरली ?

चांगले आहे, त्या मार्गाने का असेना लोकांना सरळ तर करतात ना! पण तरी ते लोकांना घसरू देत नाहीत तेवढे चांगलेच आहे. बाकी, वर चढवण्याचा तर प्रश्नच नाही. कारण ते गुरू स्वत:च चढले नाहीत ना! चढणे ही काही सोपी गोष्ट आहे तेही या कलियुगात, दुषमकाळात? ही चढण तर खरोखर उभी चढण आहे. परंतु घसरू देत नाहीत. लोकांना दुसरे मिळत नाही, म्हणून कोणत्याही दुकानात जाऊन बसावे लागते ना! असेच अनंत जन्मांपासून भटकतच आहेत ना!

**प्रश्नकर्ता :** एकीकडे असे म्हटले जाते की,

*'गुरू गोविंद दोनों खडे, किसको लागूं पाय,*
*बलिहारी गुरू आपकी, जिसने गोविंद दियो बताय!'*

**दादाश्री :** हो. पण तसे गुरूदेव कोणाला म्हटले जाते? गोविंद दाखवतील, त्यांना गुरूदेव म्हटले जाते. असे यात सांगितले आहे. आता तर हे गुरू स्वत:चे गुरूपण स्थापित करण्याची गोष्ट करतात. परंतु आम्ही त्याना सांगितले पाहिजे की, 'साहेब, मी तुम्हाला गुरूदेव केव्हा म्हणेल? की तुम्ही मला गोविंद दाखवाल तर. हे लिहिले आहे त्यानुसार जर कराल तर, गोविंद दाखवा, तर तुमच्यात गुरूपण स्थापित करीन. तुम्हीच आतापर्यंत गोविंद शोधत आहात आणि मी सुद्धा गोविंद शोधतो आहे, तर आपल्या दोघांचा मेळ कसा बसेल?

बाकी, आज तर सगळे गुरू हेच समोर ठेवतात! गुरूंनी गोविंद दाखवले नसतील तरी सुद्धा असे गायला लावतात. जेणे करुन गुरूंना 'प्रसाद' तर मिळेल ना! या शब्दांचा दुसऱ्या दुकानदारांनाही लाभ होतो ना.( !)

**प्रश्नकर्ता :** परंतु त्यामुळे गुरूचे परडे अधिक वजनदार बनवले.

**दादाश्री :** आहेच वजनदार, पण तसे गुरू आतापर्यंत झाले नाहीत. हे तर प्रोबेशनर (हंगामी उमेदवार) गुरूंचे फावले आहे यात. म्हणजे प्रोबेशनर असे मानून बसले आहेत की, 'आता आम्ही गुरू आहोत, आणि देव दाखवले, मग तुम्ही आम्हाला पुजले पाहिजे.' परंतु

प्रोबेशनर काय कामाचे? आणि ज्यांच्यातून *'हुंकार'* (मी काही तरी आहे) निघून गेला असेल ना, त्यानंतर तोच देव! जर कधी अधिक दर्शन करण्यायोग्य पद असेल तर ते फक्त एकच की ज्यांचा *'हुंकार'* समाप्त झाला असेल, *पोतापणुं* (मी आहे, आणि माझे आहे असे आरोपण, माझेपणा) गेला असेल. जिथे *'पोतापणुं'* गेला तिथे सर्वस्व निघून गेले!

हे जे 'गुरूब्रम्हा, गुरूविष्णु, गुरू महेश्वरा' म्हणतात ते तर गुरूच नसतात. हे तर 'गुरूब्रम्हा गुरूविष्णुः...' या नामामुळे स्वतःचा फायदा करुन घेतात. त्यामुळे मग लोक त्यांची पूजा करतात! परंतु वास्तविकपणे ही तर सद्‌गुरूंची गोष्ट आहे. सद्‌गुरू अर्थात ज्ञानी पुरुषांची ही गोष्ट आहे. जे सत्‌ला जाणतात, सत्‌चे जाणकार आहेत, त्या गुरूंसाठी ही गोष्ट आहे. परंतु येथे तर या सर्व अपात्र गुरूंनी हे स्वतःसाठी समजून घेतले आहे.

बाकी जे गुरू होऊन बसलेत, त्यांना सरळ सांगून टाकावे की, 'साहेब, मला गुरू करायचे नाहीत. व्यापारी गुरू बनवण्यासाठी मी आलो नाही. मी तर ज्याला गुरू व्हायचे नाही, त्यांना माझे गुरू करण्यासाठी आलो आहे.

## गुरूचा पुत्र गुरू?

**प्रश्नकर्ता :** पूर्वीच्या काळी जी गुरू परंपरा होती की गुरू शिष्याला शिकवत असत, नंतर शिष्य गुरू बनून स्वतःच्या शिष्याला शिकवीत असत...

**दादाश्री :** ती परंपरा खरी होती. परंतु आता तर ती परंपरा राहिलीच नाही ना! आता तर गादीपती (उत्तराधिकारी) होऊन बसलेत. गुरूचा पुत्र गुरू बनेल, असे कसे मानले जाईल? गादींची (उत्तराधिकारी नेमण्याची) स्थापना केली, याचा दुरुपयोग झाला.

**प्रश्नकर्ता :** धर्म व्यवस्थेच्या जागी समाज व्यवस्था झाली.

**दादाश्री :** हो. समाज व्यवस्था झाली!! धर्म तर कुठेच राहिला, धर्म तर धर्माच्या स्थानावर राहिला! शिवाय कलियुगानेही घेरले आहे!

यात एक-दोन पुरुष चांगले असतात पण मग त्यांच्या नंतर गादीपती वगैरे सर्व सुरु होऊन जाते, सगळीकडेच गादीपती ना? गादीपती हे कधी शोभत नाहीत. धर्मात गादी नसते. दुसऱ्या सर्व जागी, सर्व कलांमध्ये, व्यापारात गादी असते. परंतु धर्मात गादी नसते. धर्मात तर ज्याच्याकडे आत्म्याचे (ज्ञान) असेल, असा आत्मज्ञानी असावा!

**प्रश्नकर्ता :** पूर्वी गाद्या नव्हत्या, तर या गादीपतीची सुरवात कशी झाली?

**दादाश्री :** ते तर या अक्कलवाल्यांच्या हातात गेले ना, म्हणून त्या अक्कलवाल्यांनी शोधून काढले. दुसरे कोणी राहिले नाही, म्हणून त्यांनी दुकाने मांडली. बाकी आंधळ्याला मूर्ख येऊन मिळतात. या देशात माहीत नाही कुठून येऊन मिळतात. असाच्या असाच गोंधळ माजवला आहे या लोकांनी, आणि आरामात गादीपती होऊन बसतात!

गादीपती होण्याचा अधिकार कोणाला आहे? तर ज्यांच्यात क्रोध-मान-माया-लोभ नसेल त्यांना! तुम्हाला हे न्यायपूर्ण नाही का वाटत? न्यायाने कसे असेल पाहिजे.

**प्रश्नकर्ता :** बरोबर आहे.

**दादाश्री :** म्हणून काही लोक आम्हाला विचारतात की हे तुम्ही 'अक्रम' का काढले? मी सांगितले, हे मी काढले नाही, मी तर निमित्त बनलो आहे. मी कशासाठी काढू? मला काही येथे गाद्या स्थापन करायचा आहेत? आम्ही काय येथे गाद्या स्थापन करण्यास आलो आहोत? आम्ही काय कोणाचे उत्थान करतो? नाही. येथे तर कोणाचे मंडनही करत नाही आणि कुणाचे खंडनही करत नाही, येथे असे काहीच नसते. येथे गादीच नाही ना! गादी असेल त्यांनाच ही झंझट असते. जिथे गाद्या आहेत, तिथे मोक्ष नसतोच. असूच शकत नाही.

## पुजण्याची कामनाच कामाची

धर्मवाल्यांनी तर स्वत:चा मतार्थ ठेवण्यासाठी, स्वत:ला पुजले जाण्याची दुकाने चालविण्यासाठी हे सगळे मार्ग शोधून काढले आहेत.

म्हणजे लोकांना यातून बाहेर निघूच दिले नाही. स्वत:ला पुजून घेण्यासाठी लोकांना उलट मार्गावर चढवले. असे तोडफोड करणारे लोक दुसरे काही होऊच देत नाहीत. तोडफोड करणारे म्हणजे पुजून घेण्याची कामना ठेवणारे. पुजले जाण्याची कामना ही दलालीच आहे ना!

धर्माचे पुस्तक हातात आले आणि जर कोणी त्याला तिथे बसवले की, 'आता तू हे पुस्तक वाच.' तेव्हापासूनच त्याला अशी कामना उत्पन्न होते की आता लोक माझी पूजा करतील. म्हणजे तुम्हाला जर पुजले जाण्याची कामना होत असेल, तर तुम्हाला डिसमिस केले पाहिजे. कारण ज्ञानी पुरुषाच्या पुस्तकाला स्पर्श केल्यानंतरही अशी कामना उत्पन्न का झाली? उलट अशी कामना असेल तीही नष्ट व्हायला हवी! आणि हे तर अजून कामना उत्पन्न होत आहेत. तुमच्या हे लक्षात येते की लोकांमध्ये स्वत:ला पुजून घेण्याची कामना डोके वर काढत आहेत?

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** परत आत स्पर्धाही चालते. लोक जर दुसऱ्या कोणाला अधिक पुजत असतील तर ते त्याला आवडत नाही. जणू पुजले जाणे हाच मोक्ष (!) आहे, असे या लोकांनी मानले आहे!! ही तर मोठी जोखीम आहे. बाकी, ज्याचे या जगात कोणाशीही भांडण होत नसेल, त्याला पुजलेले कामाचे.

या गुरूंना स्वत:ला पुजून घेण्याच्या कामना उत्पन्न होतात, गुरू होण्याची कामना असते. जेव्हा की कृपाळू देवांना कशी कामना होती ती तरी ओळख, की 'परम सत् जाणण्याचा इच्छुक आहे!' दुसरी त्यांना कोणत्याही गोष्टीची कामना नव्हती!! मला तर पुजले जाण्याची कामना आयुष्यात कधीच उत्पन्न झाली नाही. कारण ते बॉदरेशन (त्रास) म्हटले जाते. पुजण्याची कामना हवी, आपल्यापेक्षा कोणी मोठा असेल त्याला! कामना हवी.

**प्रश्नकर्ता :** मान, पूजा गर्वरस हे सगळे *पोतापणांच्याच* मैफली ना?

**दादाश्री :** या सगळ्या *पोतापणां* ('मी पणा' 'माझे पणा') मजबूत करणाऱ्या गोष्टी आहेत! *पोतापणां* मजबूत केला असेल तो मग कधी तरी

झळकतोच ना, कोणासमोर! तेव्हा लोक म्हणतील, 'बघा पितळ उघडे पडले!' त्याचा *पोतापणां* बाहेर येतो, त्यामुळे कधीच भले होत नाही! म्हणजे पुजले जाण्याची कामना सुटत नाही, अनादी काळापासून ही भीक सुटली नाही.

## राहीले नाही नाव कोणाचेही

मग नावाची सुद्धा भीक असते, म्हणून पुस्तकात सुद्धा त्यांचे नाव छापायला लावतात. अरे, त्यापेक्षा तर लग्न करायचे होते ना, मग मुलांनी तुझे नाव राखले असते. आता गुरू झाल्यानंतर कशासाठी नाव ठेवायचे? पुस्तकात सुद्धा नाव! 'माझे आजोबा गुरू आणि माझे वडील गुरू आणि अमके गुरू! असेच सर्व छापत राहतात. या मंदिरात सुद्धा नाव घालू लागले की 'या गुरूने हे बनवले,' अरे, नाव राहते का कधी? संसारी माणसांचे राहत नाही, तर साधूंचे नाव राहील? नाव ठेवण्याची इच्छाच असू नये. कुठलीही इच्छा ठेवणे ही भीक आहे.

## ध्येय चुकले आणि भीक शिरली

ही भीक जात नाही. मानाची भीक, किर्तीची भीक, विषयाची भीक, लक्ष्मीची भीक... भीक, भीक आणि भीक! बिन भीकवाले पाहिले आहेत का? शेवटी मंदिर बनवण्याची सुद्धा भीक असते, म्हणून मंदिर बांधण्यासाठी खटपट करतात. कारण दुसरे काही काम सुचले नाही म्हणून मग किर्तीसाठी असे सर्व करतात. अरे, कशासाठी मंदिर उभारता? हिंदुस्तानात मंदिरे नाहीत का? परंतु हे तर मंदिर उभारण्यासाठी पैसा गोळा करत राहतात. देवांनी सांगितले होते की मंदिर उभारणारे हे तर, जेव्हा त्यांची कर्म उदयास येतील तेव्हा उभारतील. तू कशाला त्यात पडतोस?

हिंदुस्तानाचा मनुष्यधर्म फक्त मंदीरे उभारण्यासाठी नाही. केवळ मोक्षला जाण्यासाठीच हिंदुस्तानात जन्म होतो. एक अवतारी होता येईल असे ध्येय ठेऊन काम करा, तर पन्नास जन्मात सुद्धा, शंभर जन्मात, किंवा पाचशे जन्मात तरी सुटका होईल. दुसरे ध्येय सोडा. मग लग्न करा, मुलांचे बाप व्हा, डॉक्टर व्हा, बंगले उभारा, त्यात हरकत नाही. परंतु

ध्येय एका जागीच ठेवा, की हिंदुस्तानात जन्म झाला आहे तर मुक्तीसाठी साधना करावी. या एका ध्येयावर या तेव्हा सुटका होईल.

म्हणजे कोणत्याही प्रकारची भीक असता कामा नये. धर्मासाठी इतके दान द्या, अमके द्या, अशा अनुमोदनेत पडू नये. करणे, करवून घेणे आणि अनुमोदन करणे, हे तिथे नसावे. आम्ही तर सर्व प्रकारच्या भीकेपासून मुक्त झालो आहोत. मंदिर उभारण्याचीही भीक नाही. कारण आम्हाला ह्या जगातील कोणतीच गोष्ट नको आहे. आम्ही मानाचे भिकारी नाही, किर्तीचे भिकारी नाही, लक्ष्मीचे भिकारी नाही, सोन्याचे भिकारी नाही, शिष्यांचे भिकारी नाही. विषयांचे विचार येत नाहीत, लक्ष्मीचे विचार येत नाहीत. जिथे विचारच उत्पन्न होत नाहीत, मग तिथे भीक कोणत्या गोष्टीची असेल? मानाची, किर्तीची कोणत्याही प्रकारची भीक नाही.

आणि मनुष्यमात्रास किर्तीची भीक असते, मानाची भीक असते. आम्ही विचारतो, 'तुमच्यात किती भीक आहे, याचा तुम्हाला पत्ता लागतो का? तुमच्यात कोणत्याही प्रकारची भीक आहे का?' तेव्हा म्हणतील, 'नाही, भीक नाही.' अरे, आता अपमान केला तर लगेच कळेल की मानाची भीक आहे की नाही!

कदाचित स्त्री संबंधात ब्रह्मचारी झाला असेल, लक्ष्मीच्या बाबतीतही भीक सोडली असेल, परंतु किर्तीची भीक असते, शिष्याची सुद्धा भीक असते, नाव कमवण्याची भीक असते, सगळ्या अंतहीन भीक असतात. शिष्यांची सुद्धा भीक! म्हणतील, 'माझा कोणी शिष्य नाही' मग शास्त्रांनी काय सांगितले आहे? जो येऊन ठेपेल, शोधल्याशिवाय, आपोआपच जो येईल तो शिष्य!!

## भीकेपासून भगवंत दूर

म्हणून मी 'भीक' शब्द लिहितो. दुसरे लोक भीक शब्द लिहित नाहीत. 'तृष्णा' लिहितात. अरे, भीक लिहा ना! तरच त्यांचा भिकारीपणा सुटेल. तृष्णाचा अर्थ काय? तृष्णा म्हणजे तहान. अरे, तहान लागली किंवा नाही लागली त्यात काय अडचण आहे? अरे, ही तर तुझी भीक

आहे. जिथे भीक असेल तिथे भगवंत कसे भेटतील? हा भीक शब्द असा आहे की बिन फासाने फासावर जाईल!

संपूर्ण भीक गेल्यानंतरच हे जग 'जसे आहे तसे' दिसते. जोपर्यंत माझ्यात भीक असेल, तोपर्यंत मला दुसरे कोणी भिकारी वाटणार नाही. परंतु स्वत:ची भीक गेली, की मग सगळे भिकारीच वाटतील.

ज्यांची सर्व प्रकारची भीक मिटते, त्यांना ज्ञानीचे पद मिळते. ज्ञानीचे पद केव्हा मिळते? सर्व प्रकारची भीक संपून जाईल, लक्ष्मीची भीक, विषयांची भीक, कोणत्याच प्रकारची भीक नसते तेव्हा हे पद प्राप्त होते.

भीक नसेल तर देवच आहे, ज्ञानी आहे, जो म्हणाल तो आहे. भीकेमुळेच हा असा झाला आहे. विनवणी म्हणूनच करावी लागते ना! भीक फक्त कुठे ठेवायची? ज्ञानी पुरुषांजवळ! ज्ञानी पुरुषांजवळ जाऊन सांगा की, 'बापजी, प्रेमाचा प्रसाद द्या.' ते तर देतच असतात, परंतु आम्ही मागितला तर विशेष मिळतो. जसा गाळलेला चहा आणि बिनगाळलेल्या चहा, यात फरक असतो ना, तेवढा फरक पडतो. गाळलेल्या चहामध्ये चहाची पाने येत नाहीत.

## प्योरिटीशिवाय प्राप्ती नाही

म्हणजे ही भीक आहे म्हणून तर भानगड आहे, प्योरिटी (शुद्धता) राहिली नाही. जिकडे-तिकडे व्यापार झाला आहे. जिथे पैशांचे देणेघेणे झाले आणि जिथे दुसरे सर्व घुसले, तो सगळा व्यापार झाला. त्यात मग सांसारिक लाभ घेण्याची तयारी असते. भौतिक लाभ, हा सगळा व्यापार म्हटला जातो. दुसरे काही घेत नसेल पण मानाची इच्छा असेल तरी सुद्धा तो लाभ म्हटला जातो. तोपर्यंत सगळा व्यापारच म्हटला जातो.

हिंदुस्तान असा देश आहे, की सगळ्यांचा व्यापार चालतो. परंतु व्यापारात जोखीम असते. आम्ही काय म्हटले पाहिजे की तुम्ही असे करत आहात, परंतु असे करण्यात जोखीम आहे.

**प्रश्नकर्ता :** धर्माच्या नावावर एवढे सारे ढोंग का चालतात?

**दादाश्री :** मग कशाच्या नावावर ढोंग चालवतील? दुसऱ्या नावावर ढोंग करायला गेले तर लोक मारतील. बापजीने दहा रुपये घेतले पण जर त्यांच्यावर कोणी आरोप केला आणि बापजींनी श्राप दिला तर काय होईल? म्हणून धर्माच्या नावाशिवाय दुसरी काही पळवाटच नाही आणि सटकण्याची दुसरी कुठली जागाच नाही.

तरी पण सगळेच असे आहेत असे म्हणू शकत नाही. यांच्यात पाच-दहा टक्के खूप चांगला माल आहे! परंतु तिथे कोणी जातच नाही, कारण त्यांच्या वाणीत वचनबळ नसते आणि त्या दुसऱ्या गुरूची वाणी तर डोळे दिपवून टाकेल अशी असते, म्हणून सर्व तिथे जातात. पण त्यांची भावना वाईट असते, कसेही करून पैसे लुबाडणे, अशी भावना असते. या धुर्तांच्या दुकानातून काय घ्यायचे? आणि जी चोख-प्रामाणिक दुकाने आहेत तिथे माल नसतो मग तिथून काय घेणार? चोख-प्रामाणिक माणसाच्या दुकानात माल नाही. धुर्तांच्या दुकानात तोलून माल जास्त दिला जातो, परंतु तो भेसळयुक्त माल असतो.

परंतु जिथे कोणत्याही प्रकारची गरज नसते, पैशांची गरज नसते, स्वत:च्या आश्रमाचा विस्तार करण्याची किंवा स्वत:चे नाव कमावण्याची गरज नसते, अशी माणसे असतील तर गोष्ट वेगळी आहे. असा मनुष्य एक्सेप्टेड (स्वीकार्य) आहे. अशा दुकानास जरी दुकान म्हटले तरी पण तिथे लोकांना लाभ मिळतो. मग तिथे ज्ञान नसेल तरीही हरकत नाही, परंतु लोक निर्मळ असले पाहिजेत, प्योर असले पाहिजेत. ईम्प्योरिटी (मलिनते) मुळे कोणी कधीच काही प्राप्त करू शकत नाही.

## अप्रतिबध्दपणे विचरतात ते ज्ञानी

**प्रश्नकर्ता :** हिंदु समाजात, जैन समाजात आश्रम पद्धती आहे. ती बरोबर आहे की नाही?

**दादाश्री :** ती पद्धत सत् युगात ठीक होती, म्हणजे तिसऱ्या आणि चौथ्या, या दोन आऱ्यांमध्ये ठीक होती. पाचव्या आऱ्यात आश्रम पद्धती ठीक नाही.

**प्रश्नकर्ता :** आश्रम पद्धतीमुळे भेद-अभेद आणि संप्रदाय उत्पन्न होतात की नाही?

**दादाश्री :** आश्रम पद्धती हे संप्रदाय उभे करण्याचे साधनच आहे. संप्रदाय बनवणारे सगळे अहंकारी आहेत, ओव्हरवाईज-अतिशहाणे! नवीनच काही तरी उभे करतात, तृतीयम!! मोक्षाला जाण्याची भावनाच नाही. स्वत:चे शहाणपण दाखवायचे असते ते नवे-नवे भेद निर्माण करतात आणि जेव्हा ज्ञानी प्रकट होतात तेव्हा ते सगळे भेद मिटवून टाकतात, कमी करतात. लाख ज्ञानींचा एकच अभिप्राय असतो, आणि एका अज्ञानीचे लाख अभिप्राय असतात.

**प्रश्नकर्ता :** म्हणायला तो आश्रम असतो, परंतु तिथे परिश्रम असतो.

**दादाश्री :** नाही, नाही. हिंदुस्तानातील लोकांनी आश्रमाचा काय उपयोग केला आहे, ते तुम्हास सांगू? घरचा कंटाळा आला असेल ना, तर तो पंधरा दिवस तिथे जाऊन आरामात खातो-पितो आणि राहतो. हाच धंदा केला आहे. म्हणून ज्याला श्रम घालवायचा असेल आणि खाऊन-पिऊन झोपायचे असेल, त्यांनी आश्रम ठेवावा. बायको त्रास देत नाही, कोणीच त्रास देत नाही. घरी बायको-मुलांची भांडणे होतात. तिथे आश्रमात कोणी भांडणाराच नाही ना, कोणी टोकणारच नाही ना! तिथे तर एकांत मिळतो, म्हणून निवांतपणे घोरत राहतो. ढेकूण नाहीत, काहीच नाही. थंड वारा! संसाराचा जो थकवा आला होता, तो तिथे जाऊन घालवतात.

आता जर असे खाऊन-पिऊन पडून राहत असतील तरी ठीक होते, परंतु हे तर दुरुपयोग करतात, आणि त्यामुळे स्वत:ची अधोगती ओढवून घेतात. त्यात ते दुसऱ्यांचे नुकसान करत नाहीत, पण स्वत:चेच नुकसान करतात. कदाचित त्यातले एक-दोन चांगले सुद्धा असतील! बाकी, आश्रम म्हणजे *पोल* चालवण्याचे साधन!!

**प्रश्नकर्ता :** तुम्ही जो मार्ग दाखवता त्यात आश्रम-मंदिर या सगळ्यांची आवश्यकता आहे का?

**दादाश्री :** येथे आश्रम-बिश्रम नसतो. येथे कसला तो आश्रम?

मी तर आधीपासूनच आश्रमाच्या विरुध्द आहे! मी तर आधीपासूनच काय म्हणतो? 'की, भाऊ, मला आश्रमाची काही गरज नाही. जे लोक येथे आश्रम बनवण्यासाठी आले होते ना, त्यांना मनाई केली. मला आश्रमाची काय गरज? आपल्याकडे आश्रम नसतातच.

म्हणून मी आधीपासूनच सांगितले आहे की ज्ञानी पुरुष कोणाला म्हणतात की जे आश्रमाचा श्रम करीत नाहीत. मी तर झाडाखाली बसून सत्संग करीन असा माणूस आहे. येथे जर जागेची सोय नसेल तर एखाद्या झाडाखाली बसून सुद्धा आरामात सत्संग करीन. आम्हाला काही हरकत नाही. आम्ही तर उदयाधीन आहोत. महावीर भगवंत सुद्धा झाडाखाली बसून सत्संग करीत असत. ते काही आश्रम शोधत नव्हते. आम्हाला खोली सुद्धा नको, काहीच नको. आम्हाला कशाचीच गरज नाही ना! कोणत्याही गोष्टीची गरज नाही. ज्ञानी पुरुष आश्रमाचा श्रम करीत नाहीत.

**प्रश्नकर्ता :** त्यांच्यासाठी अप्रतिबद्ध विहारी शब्द वापरला आहे?

**दादाश्री :** हो. आम्ही निरंतर अप्रतिबद्ध रूपाने विचरण करतो (वावरतो), द्रव्य-क्षेत्र-काळ आणि भावाने निरंतर अप्रतिबद्ध रूपाने विचरण करतो, असे ज्ञानी पुरुष!!

पूर्ण जग आश्रम बनवते. मुक्ती मिळवायची असेल तर आश्रमाचे ओझे परवडत नाही. आश्रमाऐवजी तर भीक मागून खाणे चांगले. भीक मागून खाण्यासाठी भगवंताने सूट दिली आहे. भगवंताने काय सांगितले की भीक मागून तू लोकांचे कल्याण कर. तुझ्या पोटापुरतीच भानगड आहे ना! आश्रम तर सत्युगात होते, तेव्हा स्वत: मोक्षासाठीच प्रयत्न करीत असत, आणि या कलियुगात तर श्रम घालवण्याचे संग्रहस्थान आहे. आता कुणाला मोक्षाची पडलेली नाही. म्हणून या काळात आश्रम बनवण्यासारखे नाही.

## ते भगवंतापर्यंत पोहोचत नाही

हे तर केवळ बिझनेसमध्ये पडलेले लोक आहेत. ते लोक धर्माच्या

बिझनेसमध्ये (व्यापारात) पडले आहेत. त्यांना स्वत:ची पूजा करवून फायदा मिळवायचा आहे. हो, आणि अशी दुकाने तर आपल्या हिंदुस्तानात पुष्कळ आहेत. अशी काय दोन-तीन दुकानेच आहेत? अशी तर अपार दुकाने आहेत. आता त्या दुकानदाराला आम्ही असे कसे सांगू शकतो? तो म्हणतो की 'मला दुकान सुरु करायचे आहे' तर आम्ही त्यांना नाही सुद्धा कसे म्हणणार? मग ग्राहकांचे आम्ही काय केले पाहिजे?

**प्रश्नकर्ता :** त्यांना थांबवले पाहिजे.

**दादाश्री :** नाही, नाही थांबवू शकत. या जगात असे सर्व तर चालतच राहणार.

**प्रश्नकर्ता :** आता तर करोडो रुपये जमवून आश्रम बनवतात आणि लोक त्याच्याच मागे लागले आहेत!

**दादाश्री :** परंतु हे रुपये सुद्धा असचे आहेत ना! रुपयात काही बरकतच नाही म्हणून.

**प्रश्नकर्ता :** परंतु त्या लक्ष्मीचा योग्य मार्गाने उपयोग केला, शिक्षणाच्या कामासाठी वापरले किंवा कुठल्या उपयोगी सेवेमध्ये वापरले तर?

**दादाश्री :** तसे खर्च होतील, पण तरीही माझे म्हणणे असे आहे की त्यात भगवंताला काही पोहोचत नाही. ते चांगल्या मार्गाने खर्च झाले, तर त्यातले थोडेसे जरी शेतात गेले तर पुष्कळ उपजेल. परंतु त्यात त्याला काय लाभ झाला? बाकी, जिथे लक्ष्मी असते तिथे धर्म नसतो. जिथे जितकी लक्ष्मी आहे, तेवढाच तिथे धर्म कच्चा आहे!

**प्रश्नकर्ता :** लक्ष्मी आली म्हणून मग लक्ष्मी मागे लक्ष ठेवावे लागते, व्यवस्था करावी लागते.

**दादाश्री :** नाही, असे नाही. त्याच्या व्यवस्थेसाठी नाही, लोक म्हणतील की व्यवस्था तर आम्ही करू, परंतु जिथे लक्ष्मीची हजेरी आहे, तिथे धर्म तेवढा कच्चा राहतो! कारण सगळ्यात मोठी माया, लक्ष्मी आणि

विषयविकार! या दोन्ही सर्वात मोठी माया आहे. ही माया असेल तिथे देव नसतो. आणि देव असेल तिथे माया नसते!

आणि पैसा शिरला मग किती प्रमाणात शिरेल याचा काही नेम नाही. असे काही नियम आहेत का येथे? म्हणून पैसा बिल्कुल, मुळापासूनच असता कामा नये. शुद्ध होऊन या! धर्मात मलिनता करु नका!

## धर्माची काय दशा आहे आज!

मग हे सगळे फी ठेवतात, जणू नाटक असेल असे! नाटकासाठी फी ठेवतात, तशी येथेही फी ठेवतात. त्यात पाच टक्के चांगले सुद्धा असतात. बाकी तर सोन्याचा भाव वाढला, तसे 'यांचे' सुद्धा भाव वाढतात ना! म्हणून मला पुस्तकात लिहावे लागले की जिथे पैशाचे देणेघेणे आहे, तिथे भगवंत नाहीत आणि धर्म सुद्धा नाही. जिथे पैशांचे देणेघेणे नाही, व्यापारी वृत्तीच नाही, तिथे भगवंत आहेत! पैसे, देणेघेणे ही व्यापारी वृत्ती म्हटली जाते.

सगळीकडे पैसे, जिथे जाल तिथे पैसे, जिथे जाल तिथे पैसे! सगळीकडेच फी, फी आणि फी! हो, मग त्या बिचाऱ्या गरीबांनी काय गुन्हा केला? फी ठेवली तर गरीबांसाठी असे म्हणा की, 'भाऊ, गरीब व्यक्तीकडून चार आणे घेईन, फार झाले,' मग गरीब सुद्धा तिथे जाऊ शकेल. हे तर फक्त श्रीमंतच लाभ घेतात. बाकी जिथे फी असेल, तिथे धर्मच नाही. तिथे धर्म नाहीच मुळी! आमच्या येथे एक पैसा सुद्धा घेतला जात नाही. येथे फी ठेवली तर काय दशा होईल? 'ज्ञान' घेण्यासाठी एकदा तर तुम्ही खर्च कराल, परंतु नंतर म्हणाल की आता या 'ज्ञानाला' मजबूतीने पाळू, पण आता पुन्हा फी देणार नाही.

आपण कुणाचे नाव घेणे, हे तर चुकीचे म्हटले जाईल. परंतु तुम्हाला ही रूपरेषा देत आहे की सद्या धर्माची काय दशा झाली आहे. गुरू की जे व्यापारी होऊन बसलेत, ते सगळे चुकीचे आहे. जिथे प्रॅक्टिशनर असतात, फी ठेवतात, की 'आज आठ-दहा रुपये फी आहे, उद्या २० रुपये फी आहे.' तर ते सगळे बेकार आहे.

जिथे पैशांचा व्यापार आहे, तिथे त्यांना गुरू म्हणता येणार नाही. जिथे तिकीट आहे, ती तर सगळी रामलीलाच म्हटली जाते. परंतु लोकांना आता भान राहिले नाही, म्हणून बिचारे तिकीटवाल्याकडेच शिरतात. कारण तिथे सर्व खोटे आहे आणि हा स्वत:ही खोटा आहे, म्हणून दोघांचा मेळ बसतो! अर्थात साफ खोटे व साफ घोटाळाच, चालला आहे, एकदम.

मग म्हणतील की, 'मी नि:स्पृह आहे.' अरे, असे गात का राहतोस? तू नि:स्पृह आहेस, तर तुझ्यावर कोणी शंका घेणार नाही आणि तू स्पृहावाला असशील तर तू कितीही सांगितलेस तरी तुझ्यावर शंका घेतल्याशिवाय राहणार नाही. कारण तुझी स्पृहाच सांगेल, तुझी वृत्तीच सांगेल की तू कसा आहेस.

## त्यात त्रूटी कुठे?

हे तर सगळे भिकेसाठी बाहेर पडले आहेत. स्वत:चे पोट भरण्यासाठी फिरत आहेत, सगळे आपापले पोट भरण्यासाठी निघाले आहेत, किंवा मग पोट भरायचे नसेल तर कीर्ति हवी आहे. कीर्तीची भीक (लालसा), लक्ष्मीची भीक, मानाची भीक! बिनभिकेचा मनुष्य असेल तर त्याच्याकडे जे मागाल ते प्राप्त होईल. भीकवाल्याकडे आपण गेलो तर तो स्वत:ही सुधारलेला नाही आणि आपल्यालाही सुधारणार नाही. कारण लोकांनी दुकाने सुरु केलीत आणि त्यांना ग्राहकही मिळतात, निवांतपणे!

एका व्यक्तीने मला विचारले की, यात दुकानदारांचा दोष आहे की ग्राहकांचा दोष? मी म्हणालो, 'ग्राहकांचा दोष!' दुकानदार तर कुठलेही दुकान घालून बसेल, परंतु आपल्याला समजायला नको? थोडीशी कणीक काट्याला लावून तो काटा तलावात टाकतो, त्यात मासेमाऱ्याचा दोष की खाणाऱ्याचा दोष? ज्याला लालूच आहे त्याचा दोष की मासेमाऱ्याचा दोष? जो पकडला जातो त्याचा दोष! हे आपले लोक फसलेच आहेत ना, या सगळ्या गुरूंकडे.

लोकांना स्वत:ला पुजून घ्यायचे आहे म्हणून संप्रदाय बनवले गेले.

त्यात बिचाऱ्या ग्राहकांचाच सगळा दोष नाही. या दलालांचा दोष आहे. या दलालांचे पोट भरतच नाही आणि लोकांचेही भरू देत नाहीत. म्हणून मी हे उघड करू इच्छितो. हे तर दलालीतच ऐषआराम आणि मौज करतात आणि आपापली सेफसाईडच शोधली आहे. परंतु त्यांना असे सांगू नये की, त्यांचा दोष आहे. सांगून काय फायदा? समोरच्याला दु:ख वाटेल. आपण दु:ख देण्यासाठी आलो नाहीत. आपल्याला तर हेच समजण्याची गरज आहे की त्रूटी कुठे आहे! आता दलाल का थांबलेत? कारण गिऱ्हाईक पुष्कळ आहेत म्हणून. गिऱ्हाईकच नसतील तर दलाल काय करतील? निघून जातील. पण मुळात या गिऱ्हाईकांचाच दोष आहे ना? म्हणजे मूळ दोष तर आपलाच आहे! दलाल कुठपर्यंत थांबतात? गिऱ्हाइक असतील तोपर्यंत. घरांचे दलाल कुठपर्यंत धावपळ करतील? घरांचे ग्राहक असतील तोपर्यंत. नाही तर बंद, चूप!

## लालूचच भ्रमित करते

**प्रश्नकर्ता :** हल्ली तर गुरू पैशांच्याच मागे लागलेले असतात.

**दादाश्री :** हे लोक सुद्धा असेच आहेत ना? लाकूड वाकडे आहे म्हणून ही करवत सुद्धा वाकडी आहे. लाकूडच सरळ नाही ना! लोक वाकडे चालतात म्हणून गुरू देखील वाकडे भेटतात. लोकांमध्ये कोणता वाकडेपणा आहे? 'माझ्या मुलाच्या घरी मुलगा व्हावा.' म्हणजे लोक लालची आहेत म्हणून हे लोक डोक्यावर चढून बसलेत. अरे, तो काय मुलाकडे मुलगा देणार होता? तो कुठून आणणार? तो स्वत:च बायको-मुलांशिवायचा आहे, मग तो कुठून आणणार? ज्याला मुले असतील त्याला सांग ना! हे तर 'माझ्या मुलाच्या घरी मुलगा व्हावा,' म्हणून त्याला गुरू बनवतात. म्हणजे लोक लालची आहेत तोपर्यंत हे धूर्त चढून बसलेत. लालची आहेत, म्हणून गुरूच्या मागे लागतात. आपल्याला लोभ-लालूच नसेल आणि मग गुरू बनवले तरच खरे!

हे तर कपडे बदलून लोकांना फसवतात आणि लोक लालची आहेत म्हणून फसतात. लालची नसतील तर कोणीच फसणार नाही! ज्याला कुठल्याही प्रकारचा लोभ-लालूच नाही, त्याची फसवणूक होण्याची वेळच येत नाही.

**प्रश्नकर्ता :** परंतु सद्या तर गुरूजवळ भौतिक सुखच मागतात, मुक्ती कोणीच मागत नाही.

**दादाश्री :** सगळीकडे भौतिकतेच्या गोष्टीच आहेत ना! मुक्तीची गोष्टच नाही. हे तर 'माझ्या मुलाच्या घरी मुलगा होऊ दे, किंवा मग माझा व्यापार चांगला चालावा, माझ्या मुलाला नोकरी मिळावी, मला असा आशीर्वाद द्या. माझे अमके करा.' अशी अपार प्रलोभने आहेत. अरे, धर्मासाठी, मुक्तीसाठी आला आहेस की हे सगळे हवे आहे म्हणून आला आहेस?

आपल्यात एक म्हण आहे ना, 'गुरू लोभी, शिष्य लोभी, दोघे खेळतात डाव' असे व्हायला नको. शिष्य लालची आहे, म्हणून गुरू त्याला सांगेल की, 'तुझे हे होईल, आमच्या कृपेने सगळे होईल, हे होऊन जाईल' लालूच शिरली तर तिथे यश येणार नाही.

## गुरूमध्ये स्वार्थ नसावा

कलियुगाच्या कारणामुळे गुरूंजवळ सत्व नसते. कारण ते तुमच्यापेक्षा अधिक स्वार्थी असतात. ते स्वत:चे काम करवून घेण्याच्या मागे असतात, तुम्ही आणि तुमचे काम करवून घेण्याच्या मागे असता. असा मार्ग गुरू-शिष्याचा नसावा.

**प्रश्नकर्ता :** कित्येकदा बुद्धीजीवी लोक अशा खोट्या गुरूला कित्येक वर्षांपर्यंत खरे गुरू मानतात, की हेच खरे गुरू आहेत.

**दादाश्री :** ती तर लालूच असते. बरेच लोक लालूच असल्यामुळेच गुरू बनवतात.

आत्ताचे हे गुरू, ह्या कलियुगाचे गुरू म्हटले जातात. कुठल्या ना कुठल्या स्वार्थातच असतात की 'कोणत्या कामासाठी उपयोगी पडतील?' असा विचार ते पहिल्यापासूनच करतात! तुम्हाला भेटण्याआधीच गुरू विचार करतात की हे कुठल्या कामास उपयोगी येतील? कधी हे डॉक्टर त्यांच्याकडे गेले तर त्यांना पाहिल्याबरोबर विचार येतात की कधी तरी कामी येतील. म्हणून, 'या, या डॉक्टर' असे म्हणतील. अरे, तुझ्या काय

कामाचे? 'कधी आजारी पडलो तर कामी येतील ना! हे संधीसाधु म्हटले जातात. संधिसाधुंजवळ आमचे काम कधीच होणार नाही. जो स्वार्थी नाही, ज्याला काहीही नको तिथे जावे. हे संधी साधणारेही स्वार्थी आणि आम्ही सुद्धा स्वार्थी! गुरू-शिष्यात स्वार्थ असेल तर ते गुरूपणही नाही आणि ते शिष्यपणही नाही. स्वार्थ नसावा.

आपण जर चोख मनाचे असू तर त्या गुरूला सांगावे की, 'साहेब, ज्या दिवशी तुमच्यात थोडा सुद्धा स्वार्थ दिसेल त्या दिवशी मी इथून निघून जाईन. दोन शिव्या देऊन सुद्धा निघून जाईन. तेव्हा तुम्हाला मला जवळ ठेवायचे असेल तर ठेवा. हो. खाणे-पिणे हवे असेल तर तुम्हाला त्याची अडचण पडू देणार नाही. परंतु तुमच्याजवळ स्वार्थ असता कामा नये.

हो, स्वार्थ दिसणार नाही असे गुरू हवेत. परंतु आता तर लोभी गुरू आणि लालची शिष्य, दोघेही एकत्र आले, मग काय भलं होणार? मग '... दोघे खेळतात डाव' असे चालत राहते!

मुळात लालची लोक आहेत, म्हणून या धुर्तांचे चालते. खरा गुरू धूर्त नसतो. अजूनही तसे खरे गुरू आहेत. नाहीत असे नाही. हे जग काही रिकामे झाले नाही. परंतु तसे मिळणे सुद्धा कठीण आहे ना! पुण्यावंतालाच मिळतील ना!

## पावले उमटवण्याचेही पैसे

मग काही पावले उमटवण्याचेही पैसे उपटतात. गुरूंनी घरात पावले उमटविली तरी पैसे घेतात. तर या गरीबांच्या घरी पावले उमटवा ना! गरीबांशी असे का करता? गरीबाकडे बघायचे नाही? एका पावले उमटवून घेणाऱ्याला मी म्हटले. 'अरे, हे तू पैसेही घालवतोस आणि वेळही वाया घालवतोस. त्यांची पावले उमटवून घेण्याऐवजी तर कोणा गरीबाचे पाऊल उमटव की ज्याच्या आत दरिद्रनारायण विराजमान आहेत. गुरूंच्या पावलांचे करायचे तरी काय?' परंतु लोक असे लालची आहेत की म्हणतील, 'पावले उमटवली तर आमचे काम होईल. मुलाच्या घरी मुलगा होईल. पंधरा वर्षांपासून मूल-बाळ नाही.'

**प्रश्नकर्ता :** लोकांची श्रद्धा आहे म्हणून.

**दादाश्री :** नाही. लालची आहेत म्हणून. श्रद्धा नाही, त्यास श्रद्धा म्हणत नाही. लालची मनुष्य कुठलाही नवस करेल. वेड्या माणसाचा सुद्धा नवस करतील. कोणी सांगितले की 'हा वेडा आहे, जो लोकांना मुलगा देतो.' तर हे लोक 'बापजी, बापजी' करून त्याच्या सुद्धा पाया पडतील. आणि त्यानंतर मुलगा झाला तर म्हणतील, याच्यामुळेच झाला ना? लालची माणसांना काय सांगावे?

लोक तर मला सुद्धा म्हणतात की 'दादांनीच हे सगळे दिले आहे.' तेव्हा मी सांगतो की, 'दादा काही देतात का?' परंतु सगळे दादांवर आरोप करतात! तुमचे पुण्य आणि माझे यशनाम कर्म असते, म्हणून आम्ही हात लावला आणि तुमचे काम झाले. तेव्हा हे सगळे म्हणतात, 'दादाजी हे सगळे तुम्हीच करत आहात.' मी म्हणतो की 'नाही,' मी करत नाही. तुमचेच (फळ) तुम्हाला मिळते. मी कशासाठी करु? मी कशासाठी या फंदात पडू? या झंझटीत मी कशाला पडू? कारण मला काहीही नको. ज्याला काहीच नको असेल, ज्याला कुठलीही वासना नाही, कुठल्याही गोष्टीचे भिकारी नाहीत, तेव्हा तिथे तुमचे (मोक्षाचे)काम साधून घ्या.

मी तर काय म्हणतो की आमचे चरण उमटवा, पण ते लक्ष्मीच्या वासनेने करू नका. ठीक आहे, तसे काही निमित्त असेल तर आमचे चरण उमटवा.

**प्रश्नकर्ता :** घराच्या उद्धाराऐवजी, स्वत:चा उद्धार होईल, तसे तर करू शकतो की नाही?

**दादाश्री :** हो. सर्व काही करू शकतो. सर्व काही होऊ शकते. परंतु लक्ष्मीची वासना नसावी. दानत खराब नसावी. आणि हे तुम्ही मला बळजबरी उचलून नेले, त्यास काही पावले उमटवलीत असे म्हणता येईल? पावले उमटवणे म्हणजे तर ते माझ्या राजी-खुशीने व्हायला हवे. मग भले, तुम्ही मला शब्दानी खुश करा किंवा कपटाने खुश करा. पण मी कपटाने खुश होईन असा नाही.

आम्हालाही फसवण्यासाठी येतात, अशी लाडीगोडी करणारे येतात, परंतु मी काही फसला जात नाही! आमच्याकडे लाखो लोक येतात. गोड-गोड बोलतात, सगळं काही करतात, पण राम तुझी माया...! त्यांना काही गळच मिळत नाही ना! त्यांना माहीत आहे की दादांजवळ असे काहीच चालणार नाही, म्हणून परत जातात. असे 'गुरू' पाहिले आहेत, फसवणारे 'गुरू' पाहिले आहेत. तसे गुरू आले तर मी लगेच ओळखतो की ते आले आहेत. फसवणाऱ्याला 'गुरू' च म्हणायचे असते ना! नाही तर दुसरे काय म्हणणार? आणि 'फसविणारा' हा शब्द तर बोलूच शकत नाही. तेव्हा 'गुरू'च म्हणायचे ना!

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** असे बरेच भेटले. मी त्यांच्या तोंडावर काहीच बोलत नाही. ते स्वतःच वैतागून परत जातात की, 'मी येथे सांगण्यासाठी आलो आहे, पण हे तर काही ऐकतच नाहीत. हे एवढे सारे त्यांना देण्यासाठी आलो आहे.' मग तो कंटाळतो की 'या दादांजवळ आपली डाळ शिजणार नाही, ही खिडकी भविष्यात उघडणार नाही.' अरे, मला काहीच नको, कशासाठी खिडकी उघडण्यास आला आहेस? ज्याला हवे असेल तिथे जा ना, लालची असेल तिथे जा. येथे तर कसलीच लालूच नाही ना! कसेही आले तरी सुद्धा त्यांना परत पाठवतो की 'भाऊ, येथे नाही!'

लोक तर सांगतील की, 'या, या, काका, तुमच्याशिवाय तर मला करमतच नाही. काका, तुम्ही सांगाल तितके तुमचे काम करेन, तुम्ही सांगाल ते सगळेच. तुमचे पाय चेपीन.' अरे, हा तर लाडीगोडी लावतो, तिथे मग बधिर व्हावे.

अर्थात सगळे काही सरळ झाले आहे, तर आता आपले काम पूर्ण करुन घ्या. एवढेच मी सांगू इच्छितो. याहून जास्त सरळ होणार नाही, इतके सरळ होणार नाही, असा चान्स (संधि) पुन्हा येणार नाही. हा चान्स फार उच्च प्रकारचा आहे ना, म्हणून या सर्व लाडीगोडीच्या गोष्टी कमी होऊ द्या ना! अशा गोष्टीत मजा नाही. लाडीगोडी करणारे लोक तर

भेटतील, परंतु त्यात तुमचे हित नाही. म्हणून या लाडीगोडीच्या गोष्टींचा नाद सोडा आता, निदान या एका जन्मापुरता तरी! आता अर्धे आयुष्यच उरले आहे ना! पूर्ण आयुष्य कुठे उरले आहे!!

## प्योरिटीच पाहिजे

**प्रश्नकर्ता :** आपण असे बोललात, दुसरे कोणी तर असे सांगतच नाही.

**दादाश्री :** हो. पण प्योर झाला असेल तरच बोलेल ना! त्याशिवाय तो कसा बोलेल? त्यांना तर या जगाची लालूच आहे आणि या जगातील सुखं हवी आहेत. ते काय बोलतील मग? म्हणून प्योरिटी असली पाहिजे. संपूर्ण जगाच्या गोष्टी आम्हाला द्याल तरी आम्हाला त्याची गरज नाही, संपूर्ण जगाचे सोने आम्हाला दिले, तरी सुद्धा आम्हाला त्याची गरज नाही, स्त्रीचा विचारच येत नाही. या जगात कोणत्याही प्रकारची भीक आम्हाला नाही. शुद्ध आत्मदशा साधणे ही काय सोपी गोष्ट आहे?

**प्रश्नकर्ता :** म्हणजे कुठल्याही गुरूचे व्यक्तीगत चारित्र्य शुद्ध असले पाहिजे?

**दादाश्री :** हो. गुरूचे चारित्र्य संपूर्ण शुद्ध असले पाहिजे. शिष्याचे चारित्र्य नसेल सुद्धा, परंतु गुरूचे चारित्र्य तर एक्जॅक्ट असले पाहिजे. गुरू जर बिनचारित्र्याचे असतील तर ते गुरूच नाहीत, त्याला काही अर्थच नाही. संपूर्ण चारित्र्य हवेत. ही अगरबत्ती चारित्र्यवान असते, एवढ्याशा खोलीत जरी पाच-दहा अगरबत्त्या लावल्या तर पूर्ण खोली सुगंधी होऊन जाते. तर मग गुरू बिनचारित्र्याचे चालतील का? गुरू तर सुगंधवाले असले पाहिजेत.

## मोक्षमार्गात सर्वात मुख्य

मोक्षमार्गात दोन गोष्टी नसतात. ते म्हणजे स्त्रीचे विचार आणि लक्ष्मीचे विचार! जिथे स्त्रीचा विचार असेल तिथे धर्म नसतो, लक्ष्मीचा विचार असेल, तरी तिथे धर्म नसतो. या दोन मायांमुळे संसार उभा राहिला आहे. हो, म्हणून तिथे धर्म शोधणे हे चुकीचेच आहे. मग सध्या लक्ष्मीशिवाय किती केंद्रे चालतात?

**प्रश्नकर्ता :** एक सुद्धा नाही.

**दादाश्री :** ती माया सुटत नाही ना! गुरूत सुद्धा माया शिरलेली असते. कलियुग आहे ना! म्हणून थोडीफार तरी शिरतेच ना? तेव्हा जिथे स्त्री संबंधी विचार आहे, जिथे पैशांचे देणेघेणे आहे, तिथे खरा धर्म असू शकत नाही. हे संसारी माणसांसाठी नाही, परंतु जे उपदेशक असतात ना, ज्यांच्या उपदेशानुसार आपण चालतो, तिथे असे नसावे. नाही तर या संसारी माणसांकडेही तेच आहे आणि तुमच्याकडेही तेच? असे असता कामा नये. आणि तिसरे काय? तर सम्यक् दृष्टी असली पाहिजे.

तेव्हा जिथेही लक्ष्मी आणि स्त्री संबंध असतील, तिथे थांबूच नये. गुरू नीट पाहून करा. लिकेजवाला (दोषयुक्त)असेल तर बनवू नका. थोडे सुद्धा लिकेज चालणार नाही. गाडीतून फिरत असतील तरी हरकत नाही, परंतु चारित्र्यात फेल (नापास) असेल तर मात्र हरकत आहे. बाकी, हा अहंकार असेल त्याची हरकत नाही, की 'बापजी, बापजी' केले तर खुश होतात, त्यास हरकत नाही. चारित्र्यात फेल नसेल तर चालवून घेतले पाहिजे. सर्वात मुख्य वस्तू म्हणजे चारित्र्य!

**प्रश्नकर्ता :** लक्ष्मी आणि स्त्री ह्या खऱ्या धार्मिकतेच्या विरुध्द आहेत! परंतु स्त्रिया तर अधिक धार्मिक असतात, असे म्हटले जाते.

**दादाश्री :** स्त्रीमध्ये धार्मिकता असते यात शंका नाही, धर्मात स्त्रिया असतील तर हरकत नाही, परंतु कुदृष्टी असेल तर हरकत आहे, कुविचार असेल तर हरकत आहे. स्त्रीला भोगाचे स्थान मानता त्यात हरकत आहे. तो आत्मा आहे, भोगाचे स्थान नव्हे.

बाकी जिथे लक्ष्मी घेतली जाते, फीच्या स्वरूपात लक्ष्मी घेतली जाते, टॅक्सच्या स्वरूपात लक्ष्मी घेतली जाते, भेटच्या रूपात घेतली जाते, तिथे धर्म नसतो. पैसे असतील तिथे धर्म नसतो व धर्म असेल तिथे पैसा नसतो. म्हणजे ही समजेल अशी गोष्ट आहे ना? जिथे विषयविकार आणि पैसे असतील, तिथे ते गुरू देखील नाहीत. आता गुरू सुद्धा चांगले तयार होतील. आता सगळे काही बदलेल. चांगले म्हणजे शुद्ध. हो,

गुरूला पैशांची अडचण असेल, तर आम्ही विचारावे की तुम्हाला स्वत:च्या उदरनिर्वाहासाठी काही हवे आहे का? बाकी, त्यांना दुसरे काही नसावे. किंवा 'मोठे बनायचे असेल, विशेष व्हायचे असेल,' असे सर्व नसावे.

## त्याचे नावच वेगळेपण

हे काय सुखी लोक आहेत? मुलतः दु:खी आहेत लोक. आणि त्यांच्याकडून पैसे घेता? स्वत:चे दु:ख घालविण्यासाठी तर ते गुरूजवळ जातात ना? मग तुम्ही त्यांचे पंचवीस रुपये घेऊन त्यांचे दु:ख का वाढवता? कोणाकडूनही एक पैसा सुद्धा घ्यायला नको. दुसऱ्यापासून काहीही घेणे, त्यास वेगळेपण म्हटले जाते. आणि याचेच नाव संसार! त्यात तोच भटकला आहे, जो घेणारा मनुष्य आहे तोच भटकलेला म्हटला जातो. समोरच्याला परका समजतो म्हणून तो पैसे घेतो.

या दुनियेतील कोणतीही वस्तू, एक रुपया जरी मी खर्च केला तर मी तितका दिवाळखोर होऊन जाईन. भक्तांची एक पै देखील वापरु शकत नाही. हा व्यापार ज्याने चालू केला आहे तो स्वत: दिवाळखोरीच्या स्थितीत जाईल, म्हणजे त्याला जी काही सिद्धी प्राप्त झाली असेल, ती गमावून बसेल. जी थोडीफार सिद्धी प्राप्त झाली होती म्हणून तर लोक त्यांच्याकडे येत होते. पण मग सिद्धी नष्ट होईल! कुठल्याही सिद्धीचा दुरुपयोग केला तर ती सिद्धी संपून जाते.

## सर्व दु:खांपासून मुक्ती मागणे, किंवा...

कित्येक लोक येथे येऊन पैसे ठेवतात. अरे, येथे पैसे वगैरे काही ठेवायचे नसते. येथे मागायचे असते. येथे ठेवायचे असते का? जिथे ब्रम्हांडाचा मालक बसला आहे तिथे ठेवायचे असते का? तिथे तर आपण मागायचे असते की 'मला अशी अडचण आहे, ती दूर करा.' बाकी, पैसे तर एखाद्या गुरूच्या पुढे ठेव. त्यांना काही कपडे वगैरे पाहिजे असतील, दुसरे काही पाहिजे असेल. ज्ञानी पुरुषास तर काहीच नको असते.

सांताक्रुजमध्ये आम्ही जिथे राहत होतो तिथे एका मिलच्या शेठनी

इतक्या मोठ्या तीन पेट्या कामगाराबरोबर वरती पाठवल्या. मग शेठ वरती मला भेटण्यासाठी आला. मी विचारले 'हे सर्व काय आहे शेठ ?' मग शेठ सांगतात, 'काही नाही, फूल ना फुलाची पाकळी...' मी म्हटले, 'कशासाठी या पाकळ्या आणल्यात?' तेव्हा ते म्हणाले 'काही नाही, काही नाही साहेब.' मी म्हटले 'तुम्हाला काही दु:ख किंवा अडचण आहे का?' त्यावर ते बोलले 'शेर माती, (एखादे मुल हवे आहे)' 'अरे, शेर माती कुठल्या जन्मात नव्हती? कुत्र्याच्या जन्मात गेलो तिथे पिल्ले होती, गाढवाच्या जन्मात गेलो तिथे सुद्धा पिल्ले होती, माकडाच्या जन्मात गेलो तिथे सुद्धा पिल्ले होती. जिथे गेलो तिथे पिल्ले! अरे, कोणत्या जन्मात नव्हती ही माती? अजूनही शेर माती हवी आहे? हे तर देव तुमच्यावर प्रसन्न झाले आणि तरी तुम्ही मातीच शोधत आहात? आणि वर मला लाच देण्यासाठी आला आहात? तुमची घाण मला चोपडण्यासाठी आलात? मी व्यापारी माणूस! मग माझ्याजवळ घाण आली तर मी कोणाला चोपडण्यास जाऊ? बाहेरच्या सगळ्या गुरूंना चोपडून या. त्या बिचाऱ्यांजवळ घाण येत नाही. ही झंझट येथे कशाला आणली? मग ते म्हणाले, 'साहेब, कृपा करा' मग मी म्हटले, 'हो, कृपा करीन, शिफारस करीन.'

तुम्हाला जे दु:ख आहे, त्यासाठी आम्ही तर 'ह्या बाजूचा' 'फोन' उचलतो आणि 'त्या बाजूला (देवी-देवतांना) फोन करतो! यात आमचे काही सुद्धा नसते. मात्र एक्सचेंज करायचे. नाही तर आम्हा ज्ञानी पुरुषास हे असे सर्व नसतेच ना! ज्ञानी पुरुष यात हातच घालत नाहीत. परंतु या सगळ्यांची दु:खं ऐकावी लागली ना! ही सगळी दु:खं दूर करावी लागली ना? अडचण असेल तर पैसे मागण्यासाठी या. आता, मी तर पैसे देत नाही. मी परस्पर फोन करीन. पण मग लोभ करू नका. तुला अडचण असेल तरच ये. तुझी अडचण दूर करण्यासाठी सर्व काही करीन. पण लोभ करशील त्याक्षणी मी बंद करीन.

तुमची दु:खं माझ्यावर सोपवा आणि जर तुमचा विश्वास असेल तर ती दु:खं पण तुमच्याजवळ येणार नाहीत. माझ्यावर सोपवून दिल्यावर तुमचा विश्वास उडाला तर तुमच्याजवळ परत येतील. म्हणून तुम्हाला

काही दु:ख असेल, तर मला सांगा की, 'दादा मला इतकी दु:खं आहेत, ती मी तुम्हाला सोपावतो.' आणि ती घेतली तर निकाल लागेल, नाही तर निकाल कसा लागेल?

मी या दुनियेचे दु:खं घेण्यासाठी आलो आहे. तुमचे सुख तुमच्याकडे राहू द्या. त्यात तुम्हाला काही हरकत आहे का? तुमच्यासारखे येथे पैसे देतील, पण मी त्या पैशांचे काय करु? मी तर दु:ख घेण्यासाठी आलो आहे. तुमचे पैसे तुमच्याकडे राहू द्या, ते तुमच्या कामास येतील आणि जिथे ज्ञानी असतील, तिथे पैशांचे देणेघेणे नसते. ज्ञानी तर उलट तुमची सगळी दु:खं निवारण्यासाठी आलेले असतात, दु:खं उभी करण्यासाठी आलेले नसतात.

## प्योरिटी 'ज्ञानीं'ची

मी जर लोकांकडून पैसे घेतले, तर लोक मला हवे तितके पैसे देतील. पण मी पैशांचे काय करु? कारण ती सगळी भीक (लालसा) गेल्यानंतरच तर मला हे ज्ञानीचे पद मिळाले!!

अमेरिकेत गुरूपौर्णिमेच्या दिवशी लोक मला सोन्याची साखळी घालत असत. दोन-दोन, तीन-तीन तोळ्यांची! पण मी ते सगळ्यांना परत करत असे. कारण मला काय करायचे आहे? तेव्हा एक ताई रडू लागली की 'माझी माळ तर घ्यावीच लागेल' मग मी तिला म्हटले,'मी तुला एक माळ दिली तर ती तू घालशील?' तर त्या ताईने म्हटले 'माझी काही हरकत नाही, पण तुमच्याकडून घेणे मला योग्य वाटत नाही.' नंतर मी सांगितले, 'मी तुला इतरांमार्फत देईन.' एक मण वजनाची सोन्याची साखळी बनवूया आणि मग ती रात्री (गळ्यात) घालून झोपावे लागेल, अशी अट घातली तर ती साखळी घालून झोपशील का? दुसऱ्याच दिवशी म्हणशील, 'घ्या दादा, हे तुमचे सोने.' सोन्यात सुख जर असते, तर जास्त सोने मिळाल्यावर आनंद वाटते. पण यात सुख आहे ही तुझी मान्यता आहे, रॉंग बिलीफ आहे. त्यात काय सुख असेल? सुख तर, जिथे कुठलीही वस्तू घ्यायची नसेल, तिथे सुख असते. या जगात कुठलीही वस्तू ग्रहण करायची नसेल, तिथे सुख असते.

मी तर माझ्याच घरचे, माझ्या स्वत:च्या व्यापाराच्या कमाईचे, माझ्या प्रारब्धाचे खातो आणि कपडे घालतो. मी कोणाचे पैसे घेतही नाही आणि कोणी दिलेले काही घालतही नाही. हे धोतर सुद्धा मी माझ्या कमाईचे नेसतो. इथून मुंबईला जाण्याचे विमानाचे तिकीट सुद्धा माझ्याच स्वत:च्या पैशांचेच! मग पैशांची गरजच कुठे आहे? मी जर एक पैसा देखील लोकांकडून घेतला तर लोक माझे शब्द कसे स्वीकारतील! कारण त्यांच्या घरचे उष्टे मी खाल्ले. आम्हाला काहीच नको. ज्याला कुठल्याही प्रकारची भीकच नाही, त्याला देव सुद्धा काय देतील?

एक मनुष्य मला धोतर देण्यास आला, दुसरा फलाणे देण्यास आला, माझी इच्छा असती तर गोष्ट वेगळी होती, परंतु माझ्या मनात कुठल्याही प्रकारची इच्छाच नाही!! मला फाटलेले असेल तरी चालते. म्हणून माझे म्हणणे आहे की जितके शुद्ध ठेवाल तेवढे या जगाला लाभदायक होईल!

## स्वत:ची स्वच्छता म्हणजे...

या दुनियेत जितकी तुमची स्वच्छता, तितकी दुनिया तुमची! तुम्ही मालक आहात या दुनियेचे! मी या देहाचा मालक सव्वीस वर्षांपासून झालो नाही म्हणून आमची स्वच्छता संपूर्ण असते! म्हणून स्वच्छ व्हा, स्वच्छ!

**प्रश्नकर्ता :** स्वच्छतेचा खुलासा करा.

**दादाश्री :** स्वच्छता म्हणजे या दुनियेतील कोणत्याही वस्तूची ज्याला गरज नसेल, भिकारीपणाच नसेल!!

## गुरूताच आवडते जीवाला

म्हणजे येथे वेगळ्या प्रकारचे आहे, हे दुकान नव्हे. तरी पण लोक तर यास दुकानच म्हणतील. कारण बाकी सगळ्यांनी दुकाने काढली तशी तुम्ही सुद्धा कशासाठी दुकान काढले? तुम्हाला काय गरज होती? तर मला सुद्धा तशी गरज तर आहेच ना, की मी जे सुख मिळवले ते तुम्ही सुद्धा मिळवावा! कारण लोक कसे भट्टीत भाजले

जात आहेत, रताळे भट्टीत भाजतात, तसे भाजले जात आहेत! किंवा मासे जसे पाण्याच्या बाहेर तडफडतात तसे तडफडत आहेत. म्हणून आम्हाला सगळीकडे फिरत राहावे लागते. बऱ्याच लोकांनी शांतीचा मार्ग प्राप्त केला.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे की ही गरज नाही, परंतु या सगळ्या जीवांचे कल्याण व्हावे, अशी भावना होते ना!

**दादाश्री :** कल्याण झाले तर चांगले अशी भावना असते. या वर्ल्डमध्ये तीर्थंकर आणि ज्ञानींशिवाय कोणीही जगतकल्याणाची भावना केली नाही. स्वत:च्याच पोटापाणयाची सोय नसेल तिथे मग लोकांचा विचार कसा काय करणार? सगळ्या लोकांनी कुठली भावना केली? तर ते उच्च पद शोधत राहिले. साधु असेल तर 'मला आचार्य कधी बनवाल?' आणि आचार्य असेल तर 'मला अमका कधी बनवतील?' हीच भावना सगळ्यांची असते. आणि येथे लोकांना काळाबाजार करण्याची भावना असते! कलेक्टर असेल तर 'मला कमिशनर कधी बनवणार' हीच भावना असते!! जगत कल्याणाची तर कोणाला पडलेली नाही. म्हणजे रिलेटिव्हमध्ये जगत गुरूतेकडे जात आहे. गुरूत्तम तर होऊ शकत नाही.

**प्रश्नकर्ता :** रिलेटिव्हमध्ये गुरूता म्हणजे काय?

**दादाश्री :** गुरूता म्हणजे मोठे होण्याचीच इच्छा करतात. उंच चढू इच्छितात. ते असे समजतात की गुरूत्तम झालो तर मोठे झालो, त्यांना रिलेटिव्हमध्येच गुरूता हवी आहे. मग कधी मार्गी लागेल? कारण रिलेटिव्ह हे विनाशी आहे. त्याने गुरूता गोळा केलेली असते म्हणून तो मोठे बनण्याच्याच मागे असतो. परंतु कधी खाली पडेल ते सांगता येत नाही? रिलेटिव्हमध्ये तर लघुता हवी. रिलेटिव्हमध्ये हे सगळे गुरू बनण्यासाठी फिरतात, त्यातून काही निष्पन्न होणार नाही.

## गुरूताच पछाडते शेवटी

बाकी, जो लघुत्तम झाला नाही, तो गुरूत्तम होण्यास पात्र नाही.

आज एकही गुरू असे नाहीत की ज्यांनी लघुत्तम बनण्याचा प्रयत्न केला असेल! सगळेच गुरूतेकडे वळले आहेत. 'कशा तऱ्हेने मी उच्चस्थानी जाऊ!' त्यात कुणाचा दोष नाही. हा काळच बाधक आहे. बुद्धी वाकडी चालते. या सगळ्या गुरूंचे काम काय असते? तर कशा तऱ्हेने मोठा होऊ? गुरूत्व वाढविणे, हाच त्यांचा व्यापार असतो. लघुत्वाकडे जातच नाहीत. व्यवहारात गुरूत्व वाढत गेले, नाव झाले की 'भाऊ, यांचे तर एकशे आठ शिष्य आहेत.' म्हणजे निश्चयात तितके लघु झाले, लघुत्तम होत चालले आहे. व्यवहारात गुरू होऊ लागले ही मागे पडण्याची निशाणी आहे.

घरी एक बायको होती आणि दोन मुले होती, त्या तीन घंटांना सोडून येथे साधू बनले! या तीन घंटांचा कंटाळा आला आणि तिथे एकशे आठ घंटांना (शिष्यांना) कवटाळले. अरे, त्या तिघांना सोडून एकशे आठ घंटाना का कवटाळले? त्यापेक्षा तर ती बायको आणि मुले काय वाईट होती? म्हणजे होती ती घंटा सोडली आणि ही नवीन घंटा कवटावळली. ती पितळ्याची घंटा होती आणि ही सोन्याची घंटा! मग ह्या घंटा वाजत राहतात. कशासाठी हे सगळे वादळ उभे केले!

## आपण शिष्य बनवलेत की नाही?

**प्रश्नकर्ता :** दादांनी कोणाला शिष्य बनवले आहे का?

**दादाश्री :** मी साऱ्या जगाचा शिष्य बनून बसलो आहे. मी शिष्यांचाही शिष्य आहे. मला शिष्य कशाला हवेत? या सगळ्यांना कशाला चिकटवून घेऊ? तशी तर पन्नास हजार माणसे माझ्यामागे फिरतात. पण मी या सगळ्यांचा शिष्य आहे.

## 'आपण' गुरू आहात की नाही?

**प्रश्नकर्ता :** तर आपण गुरू नाहीत?

**दादाश्री :** नाही, मी तर सगळ्या जगाचा शिष्य आहे. मी कशासाठी गुरू बनू?

**प्रश्नकर्ता :** समजा आजपासून आपणास खरे गुरू मानले आणि समर्पण केले तर?

**दादाश्री :** परंतु मी गुरू बनण्यासाठी रिकामा नाही. मी तर तुम्हाला जे ज्ञान देतो, त्या ज्ञानात राहून तुम्ही आपले मोक्षाला निघून जा ना, गुरू बनवण्यासाठी का वाट पाहता? तुम्ही मला गुरू मानायची गरज नाही. मी गुरूपद स्थापन करू देणार नाही. तुम्हाला मी शेवटपर्यंतचे सर्व काही सांगून देईन. मग काही हरकत आहे का?

मी कुणाचा गुरू बनत नाही. मला गुरू बनून काय करायचे आहे? मी तर ज्ञानी पुरुष आहे. ज्ञानी पुरुष म्हणजे काय? ऑब्जरवेटरी म्हणतात. येथे जे जाणायचे असेल, ते जाणले जाऊ शकते! समजले ना?

**प्रश्नकर्ता :** ज्ञानी, गुरू नाही का होऊ शकत?

**दादाश्री :** ज्ञानी कोणाचे गुरू बनत नाही ना! आम्ही तर लघुत्तम आहोत! मी गुरू कसे बनू शकतो? कारण माझ्यात बुद्धी मुळीच नाही आणि गुरू बनण्यासाठी तर बुद्धी हवी. गुरूमध्ये बुद्धी हवी की नको? आम्ही तर आमच्या पुस्तकात लिहिले आहे की आम्ही अबुध आहोत. या जगात कोणी स्वत: अबुध आहे असे लिहिले नाही. असे आम्ही एकटेच आहोत, की ज्याने सर्वप्रथम लिहिले की आम्ही अबुध आहोत. खरोखरच अबुध होऊन बसलो आहोत! आमच्यात थोडी सुद्धा बुद्धी मिळणार नाही. बुद्धीशिवाय चालत आहे ना आमची गाडी!!

## अशा तऱ्हेने हे सगळे गुरू

यात काही न्याय वाटतो का तुम्हाला? 'मी सगळ्यांचा शिष्य आहे' असे मी सांगतो, त्यात काही न्याय वाटतो का?

**प्रश्नकर्ता :** हे सगळे कशा तऱ्हेने तुमचे गुरू आहेत?

**दादाश्री :** हे सगळेच माझे गुरू! कारण त्यांना जे काही प्राप्त झाले असेल ते मी लगेच स्वीकारतो. परंतु ते असेच समजतात की आम्ही दादांपासून घेत आहोत. या पन्नास हजार लोकांनाच नाही, परंतु सगळ्या

जगातील जीवमात्रांना मी गुरू मानतो, सगळ्या जगास मी गुरू मानतो. कारण जिथे कोणत्याही प्रकारचे सत्य असेल, एक कुत्रा जात असेल तर कुत्र्याचे सत्य सुद्धा स्वीकारतो. ज्याच्याजवळ आपल्यापेक्षा अधिक विशेषता असेल, त्याचा मी स्वीकार करतो. तुमच्या लक्षात आले ना?

**प्रश्नकर्ता :** म्हणजे की जिथून कुठलीही प्राप्ती होत असेल ते आपले गुरू असे?

**दादाश्री :** हो, अशा तऱ्हेने सगळेच माझे गुरू! म्हणून मी तर सगळ्या जगातील जीवमात्रांना गुरू बनवले आहे, गुरू तर बनवावेच लागतील ना? कारण ज्ञान तर सगळ्या लोकांजवळ आहे. प्रभू काही स्वत: येथे येत नाहीत. ते असे रिकामटेकडे नाहीत की तुमच्यासाठी येथे खेपा घालतील?

## 'या' शिवाय कोणतेही स्वरूप नाही

**प्रश्नकर्ता :** यात आपण स्वत:स कोणत्या कोटीतले मानता?

**दादाश्री :** मी स्वत:ला संपूर्ण जगाचा शिष्य मानतो. आणि मी लघुत्तम स्वरूप आहे. याशिवाय माझे दुसरे कोणतेही स्वरूप नाही. आणि हे 'दादा भगवान' हे भगवान आहेत! आत प्रकट झाले आहेत, ते!

## दिशा बदलण्याची गरज

**प्रश्नकर्ता :** वर्तमानात भारतात आपल्या स्तराच्या दुसऱ्या विभूति आहेत का?

**दादाश्री :** मला कसे कळेल? ते तर तुम्ही शोध घेत आहात, तर तुम्हाला कळेल. मी शोध घेण्यास गेलो नाही.

**प्रश्नकर्ता :** आपण शिखरावर आहात, म्हणून दिसत असेल ना?

**दादाश्री :** पण मी ज्या शिखरावर आहे, त्यापेक्षा दुसरे कुठले शिखर मोठे असेल तर ते मला कसे समजणार? शिखरावर गेलेल्या प्रत्येकांनी असेच सांगितले आहे का की मीच अंतिम शिखरावर आहे? परंतु मी असे सांगत नाही.

**प्रश्नकर्ता :** जी शिखरे तुमच्यापेक्षा लहान असतील ती सर्व दिसतात ना?

**दादाश्री :** लहान दिसतात पण ती लहान गणली जात नाहीत. वस्तू तर एकच आहे ना! कारण मी ज्या शिखरावर आहे ना, तिथे मी लघुत्तम बनून बसलो आहे, व्यवहारात! ज्यास व्यवहार म्हणतात ना, जिथे लोक गुरूत्तम होण्यासाठी गेले, तिथे मी लघुत्तम झालो आहे. आणि जे लोक गुरूत्तम होण्यासाठी गेले, त्यांना काय मिळाले? लघु झाले. व्यवहारात मी लघुत्तम झालो, म्हणून निश्चयात गुरूत्तम झालो!

या वर्ल्डमध्ये माझ्यापेक्षा कोणीच लघु नाही, असा मी लघुत्तम पुरुष आहे. जर छोटा बनला तर तो पुष्कळ मोठा भगवान होईल. तरी सुद्धा भगवान होण्यात मला ओझे वाटते, उलट लाज वाटते. आम्हाला ते पद नको आहे. आणि या अशा काळात ते पद का म्हणून प्राप्त करावे? आम्हाला ते पद नकोच. या काळात तर जो तो व्यक्ती भगवान पद घेऊन बसला आहे. म्हणून तर दुरुपयोग होतो. आम्ही त्या पदाचे काय करणार? मी ज्ञानी आहे, हे पद काय कमी आहे? आणि संपूर्ण जगताच्या शिष्याच्या रूपात ज्ञानी आहे! लघुत्तम पुरुष आहे!! मग यापेक्षा मोठे पद कोणते असेल? लघुत्तम पदावरून कधीच खाली पडू शकत नाही, इतके मोठे पद आहे!!

आणि जो जगाचा शिष्य बनेल ना, तो गुरूत्तम बनेल! मार्गच हा आहे, हो!! हे वाक्य दिशा बदलण्यास सांगत आहे. तुम्ही जो गुरूत्तम अहंकार करत फिरता, याचा अर्थ काय की 'मी अशा तऱ्हेने पुढे जाईन आणि भविष्यात मी मोठा कसा होईन!' असा जो तुम्ही प्रयत्न करत आहात, त्यास गुरूत्तम अहंकार म्हटला जातो. त्यापेक्षा 'मी कशा तऱ्हेने छोटा बनेल' अशा लघुत्तम अहंकारात जाल तर जबरदस्त ज्ञान प्रकटेल!! गुरूत्तम अहंकार नेहमी ज्ञानावर आवरण घालतो आणि लघुत्तम अहंकार ज्ञान प्रकट करते.

म्हणजे कुणी म्हटले की, 'साहेब, तुम्ही तर खूप मोठे मनुष्य आहात!' मी म्हणाले, 'भाऊ, तू मला ओळखत नाहीस, माझे मोठेपण नाही ओळखत. तू शिवी दिलीस तर कळेल की माझे मोठेपण आहे की

नाही ते. शिव्या दिल्या, तर पोलिसासारखा स्वभाव दिसून येतो की नाही? त्यावेळी 'तू काय समजतोस?' असे म्हणाला तर समजावे की आला पोलीस! पोलिसाचा स्वभाव माझ्यात दिसला तर समजावे की माझ्यात मोठेपण आहे. पोलिसाचा स्वभाव दिसला नाही तर 'मी लघुत्तम आहे' याची खात्री झाली ना!

आम्हाला कोणी शिवी दिली तर आम्ही त्याला म्हणतो की, 'हो बघ भाऊ, तुझी शिवी आम्हाला स्पर्श करु शकत नाही, त्याहूनही आम्ही छोटे आहोत. तेव्हा तू असे काही शोधून काढ, की जे आम्हाला स्पर्श करेल, अशी शिवी दे. तू आम्हाला, 'गाढव आहात' म्हणशील, तर गाढवाहूनही आम्ही खूप लहान आहोत. मग तुझे तोंड दुखेल. आम्हाला शिवी स्पर्श करेल असे आमचे स्थान शोधून काढ. आमचे स्थान लघुत्तम आहे!

## जगाच्या शिष्यासच जग स्वीकारेल

म्हणजे 'हे' कोण आहेत? तर लघुत्तम पुरुष! लघुत्तम पुरुषांचे दर्शन होतीलच कसे? असे दर्शनच होत नाही ना! जगात एक तरी मनुष्य असा शोधून काढा की जो लघुत्तम असेल. आणि हे जे पन्नास हजार लोक आहेत, पण या सगळ्यांचे आम्ही शिष्य आहोत. तुमच्या लक्षात आले ना? मी स्वत: शिष्य बनवतच नाही. यांना मी शिष्य बनवले नाही.

**प्रश्नकर्ता :** तर मग आपल्यानंतर काय? नंतर कोणी शिष्य नसेल तर काय होईल?

**दादाश्री :** काही गरजच नाही ना! आमचा एक सुद्धा शिष्य नाही. परंतु रडणारे पुष्कळ आहेत. कमीत कमी चाळीस-पन्नास हजार माणसे रडणारी आहेत.

**प्रश्नकर्ता :** परंतु आपल्यानंतर कोण?

**दादाश्री :** नंतर कोण आहे ते तर आलेली वेळच सांगेल. मी काहीच जाणत नाही आणि असा विचार करण्यासाठी मला फुरसत सुद्धा नाही.

**प्रश्नकर्ता :** आपण म्हणता की माझ्या पाठीमागे चाळीस-पन्नास

हजार रडणारे असतील, पण शिष्य एक सुद्धा नाही. म्हणजे तुम्ही नक्की काय सांगू इच्छिता?

**दादाश्री :** माझा कोणी शिष्य नाही. ही काही गादी नाही. गादी असेल तर कोणी वारस होईल ना! गादी असेल तर कोणी वारसदार बनायला येईल ना! तर ज्याचे चालते त्याचेच चालेल. जो सगळ्यांचा, संपूर्ण जगाचा शिष्य बनेल, त्याचे काम होईल! येथे लोक ज्याचा 'स्वीकार' करतील, त्याचे चालेल!!

## असे हे अक्रम विज्ञान

हा गुरूचा मार्ग नाही! हा कुठला धर्म नाही किंवा संप्रदाय नाही. मी तर कुणाचाही गुरू बनलो नाही, आणि बनणारही नाही. माझी लक्षणेच गुरू बनण्याची नाहीत. ज्या पदावर मी बसलो आहे, त्या पदावर तुम्हालाही बसवतो. गुरूपद-शिष्यपद मी ठेवलेच नाही. नाही तर सगळीकडे तर लगाम स्वत:जवळच ठेवतात. जगाचा नियम कसा आहे? लगाम सोडत नाहीत. पण येथे तर असे नाही. येथे तर आम्ही ज्या पदावर बसलो आहोत त्या पदावर तुम्हास बसवतो! तुमच्यात आणि माझ्यात वेगळेपण नाही. तुम्हाला जरा वेगळेपण जाणवेल, पण मला वेगळेपण वाटत नाही. कारण तुमच्यात मीच बसलो आहे, त्यांच्यात सुद्धा मी बसलो आहे, मग मला वेगळेपण कसे वाटेल?

आणि खरे तर गुरूपौर्णिमा नसतेच! हे तर दर्शन करण्याच्या निमित्ताने गुरूपौर्णिमा साजरी करतात इतकेच! बाकी, येथे गुरू पौर्णिमा नसते. येथे गुरूही नाही आणि पौर्णिमा सुद्धा नाही! हे तर लघुत्तम पद आहे!! येथे हे सर्व तुमचेच स्वरूप आहे, हे अभेद स्वरूप आहे!

आपण वेगळे नाहीच ना! गुरू बनलो तर तुम्ही आणि मी,-शिष्य आणि गुरू असे दोन भेद पडतील. परंतु येथे गुरू-शिष्य म्हटलेच जात नाही ना! येथे गुरू सुद्धा नाही आणि शिष्य सुद्धा नाही. गुरू-शिष्याचा रिवाजच नाही. कारण हे तर अक्रम विज्ञान आहे!!!

**जय सच्चिदानंद**

## परमगुरू कोणास म्हणावे?

एक दिवशी दादाश्री नीरुला सांगत होते, 'नीरुताई, तुम्ही एक शिष्य ठेवा ना!' नीरूने सांगितले 'दादा, आपण आज असे काय बोलत आहात? आपण तर नेहमी आम्हा सगळ्यांना सांगत असता की मी जगातील जीवमात्रांचा शिष्य बनलो, तेव्हा मला हे ज्ञान प्रकट झाले! तर आज मला आपण गुरू बनण्यास का सांगत आहात?' तेव्हा दादाश्रींनी हसत हसत म्हटले, 'पण एक शिष्य ठेवा ना! एक शिष्य ठेवण्यास तुम्हाला काय हरकत आहे?' नीरूने म्हटले, 'नाही दादा, मलाच आपल्या चरणापाशी, सेवा करीत राहू द्या ना! या शिष्याला मी कोठे सांभाळू? मला ते परवडणारच नाही' तेव्हा दादाश्री म्हणाले, 'मी काय म्हणतो ते तरी समजून घ्या.' 'दादा, त्यात काय समजायचे? मी गुरू कशी बनू शकते? तेव्हा पुन्हा दादाश्री म्हणाले, 'पण मी काय सांगू इच्छितो ते तरी समजून घ्या! असे करा ना, या नीरुताईंनाच तुमच्या शिष्य बनवा ना!'' ओहोहो! दादा! तुम्ही तर कमालच केली! 'सहजात्म स्वरूप परमगुरूंचे यथार्थ स्पष्टीकरण अनुभवले!' मी गुरूपदावर आणि नीरु शिष्य! नंतर दादाश्रींनी विशेष स्पष्टीकरण दिले, 'बघा नीरुताई, एक गुरू त्याच्या शिष्याकडे केवढे लक्ष ठेवतो. काय केल्याने माझा शिष्य पुढे येईल, तिकडेच सतत लक्ष ठेवतो. तसेच तुम्ही आता या नीरुताईंकडे लक्ष ठेवायचे. तुम्ही तर 'शुद्धात्मा' झालात, पण आता या नीरुताईंना वर नाही का आणायचे?! त्या दिवसापासून दादाश्रींनी माझा आणि नीरुचा गुरू-शिष्याचा व्यवहार सुरु करून दिला! तेव्हा ज्ञानी पुरुषाच्या गहनतेचे यथार्थ भान झाले की ज्ञानी पुरुषाची दृष्टी गुरू-शिष्याकरिता कुठल्या सीमेपर्यंत असते! कुठे लौकिक गुरू करण्याची गोष्ट व कुठे स्वत:च्याच आत्म्यास गुरूपदावर स्थापित करण्याची गोष्ट! आणि त्यांनाच खरे गुरू, अरे परमगुरू म्हणतात! दुसरे सगळे बाहेरचे गुरू तर एक-दोन तास उपदेश करून निघून जातात. ते त्यांच्या घरी व आपण आपल्या घरी! नंतर आपण काय त्यांचे ऐकू असे आहोत?! त्यांनी सांगितल्याप्रमाणे वागणाऱ्यांपैकी आहोत का?! हा तर स्वत:चाच प्रकट झालेला आत्मा स्वत:चा परमगुरू! जो चोवीस तास हजरच. आणि हजर आहे म्हणून, तो मोक्षमार्गापासून जरा सुद्धा विचलीत होऊ देत नाही, एवढा त्याचा पहारा असतो! असे परमगुरू स्थापित झाले तरच मोक्ष होतो, तोपर्यंत भटकतच राहायचे. गुरू-शिष्याची चरम भेदरेषा ती याला म्हणतात!!

**डॉ.नीरूबहन अमीन**

## नऊ कलमे

१. हे दादा भगवान! मला कोणत्याही देहधारी जीवात्म्याचा किंचितमात्र पण अहम् दुभावणार (दुखावणार) नाही, दुभाविला जाणार नाही किंवा दुभावण्या प्रति अनुमोदन केले जाणार नाही अशी परम शक्ती द्या.

मला कोणत्याही देहधारी जीवात्म्याचा किंचितमात्र पण अहम् दुभावणार नाही अशी स्याद्वाद वाणी, स्याद्वाद वर्तन आणि स्याद्वाद मनन करण्याची परम शक्ती द्या.

२. हे दादा भगवान! मला कोणत्याही धर्माचे किंचितमात्र पण प्रमाण दुभावणार नाही, दुभावले जाणार नाही किंवा दुभावण्या प्रति अनुमोदन केले जाणार नाही अशी परम शक्ती द्या.

मला कोणत्याही धर्माचे किंचितमात्र पण प्रमाण दुभावले जाणार नाही, अशी स्याद्वाद वाणी, स्याद्वाद वर्तन आणि स्याद्वाद मनन करण्याची परम शक्ती द्या.

३. हे दादा भगवान! मला कोणत्याही देहधारी उपदेशक, साधु, साध्वी किंवा आचार्य यांचा अवर्णवाद, अपराध, अविनय न करण्याची परम शक्ती द्या.

४. हे दादा भगवान! मला कोणत्याही देहधारी जीवात्म्या प्रति किंचितमात्र पण अभाव, तिरस्कार कधीही केला जाणार नाही, करविला जाणार नाही किंवा कर्त्याच्या प्रति अनुमोदन केले जाणार नाही अशी परम शक्ती द्या.

५. हे दादा भगवान! मला कोणत्याही देहधारी जीवात्म्याशी कधीही कठोर भाषा, तंतीली (टोचणारी) भाषा न बोलण्याची, न बोलावयाची किंवा बोलण्या प्रति अनुमोदन न करण्याची अशी परम शक्ती द्या.

कोणी कठोर भाषा, तंतीली भाषा बोलले तर मला मृदु-ऋजु भाषा बोलण्याची परम शक्ती द्या.

६. हे दादा भगवान! मला कोणत्याही देहधारी जीवात्म्या प्रति स्त्री-पुरुष किंवा नपुंसक, कोणताही लिंगधारी असो, तर त्या संबंधी किंचितमात्र पण विषयविकार संबंधी दोष, इच्छा, चेष्टा-चाळे किंवा विचार संबंधी दोष न करण्याची, न करविण्याची किंवा कर्त्या प्रति अनुमोदन न करण्याची अशी परम शक्ती द्या.

मला निरंतर निर्विकार राहण्याची परम शक्ती द्या.

७. हे दादा भगवान! मला कोणत्याही रसमध्ये लुब्धपणा न करण्याची अशी शक्ती द्या. समरसी आहार घेण्याची परम शक्ती द्या.

८. हे दादा भगवान! मला कोणत्याही देहधारी जीवात्म्याचा प्रत्यक्ष किंवा परोक्ष, जीवंत किंवा मृत्यु पावलेल्या, कोणाचाही किंचितमात्र पण अवर्णवाद, अपराध, अविनय केला जाणार नाही, करविला जाणार नाही किंवा कर्त्या प्रति अनुमोदन केले जाणार नाही अशी परम शक्ती द्या.

९. हे दादा भगवान! मला जगत कल्याण करण्याचे निमित्त बनण्याची परम शक्ती द्या, शक्ती द्या, शक्ती द्या.

(एवढेच तुम्ही दादा भगवान यांच्याजवळ मागायचे. ही दररोज मिकेनिकली (यंत्रवत्) वाचण्याची वस्तु नाही, अंतरात ठेवण्याची वस्तु आहे. ही दररोज उपयोगपूर्वक भावना करण्याची वस्तु आहे. एवढ्या पाठात सर्व शास्त्रांचे सार येऊन जाते.)



# दादा भगवान फाउन्डेशनची प्रकाशित पुस्तके

## मराठी

१. भोगतो त्याची चूक
२. एडजस्ट एवरीव्हेर
३. जे घडले तोच न्याय
४. संघर्ष टाळा
५. मी कोण आहे ?
६. क्रोध
७. चिंता
८. प्रतिक्रमण
९. भावना सुधारे जन्मोजन्म
१०. कर्माचे विज्ञान
११. पाप-पुण्य
१२. आई-वडील आणि मुलांचा व्यवहार
१३. पति-पत्नीचा दिव्य व्यवहार
१४. समजपूर्वक प्राप्त ब्रह्मचर्य
१५. मानव धर्म
१६. मृत्युवेळी, आधी आणि नंतर
१७. सेवा-परोपकार
१८. दान
१९. त्रिमंत्र
२०. वर्तमान तीर्थंकर श्री सीमंधर स्वामी
२१. चमत्कार
२२. सत्य-असत्याचे रहस्य
२३. वाणी, व्यवहारात
२४. पैशांचा व्यवहार
२५. क्लेश रहित जीवन
२६. निजदोष दर्शनाने...निर्दोष!
२७. प्रेम
२८. गुरू-शिष्य
२९. अहिंसा

## हिन्दी

१. ज्ञानी पुरुष की पहचान
२. सर्व दु:खों से मुक्ति
३. कर्म का सिद्धांत
४. आत्मबोध
५. मैं कौन हूँ ?
६. वर्तमान तीर्थंकर श्री सीमंधर...
७. भुगते उसी की भूल
८. एडजस्ट एवरीव्हेयर
९. टकराव टालिए
१०. हुआ सो न्याय
११. चिंता
१२. क्रोध
१३. प्रतिक्रमण
१४. दादा भगवान कौन ?
१५. पैसों का व्यवहार
१६. अंत:करण का स्वरूप
१७. जगत कर्ता कौन ?
१८. त्रिमंत्र
१९. भावना से सुधरे जन्मोंजन्म
२०. प्रेम
२१. माता-पिता और बच्चों का व्यवहार
२२. समझ से प्राप्त ब्रह्मचर्य
२३. दान
२४. मानव धर्म
२५. सेवा-परोपकार
२६. मृत्यु समय, पहले और पश्चात
२७. निजदोष दर्शन से... निर्दोष
२८. पति-पत्नी का दिव्य व्यवहार
२९. क्लेश रहित जीवन
३०. गुरु-शिष्य
३१. अहिंसा
३२. सत्य-असत्य के रहस्य
३३. चमत्कार
३४. पाप-पुण्य
३५. वाणी, व्यवहार में...
३६. कर्म का विज्ञान
३७. आप्तवाणी - १ से ९ और १३ (पूर्वार्ध-उत्तरार्ध)
३८. समझ से प्राप्त ब्रह्मचर्य (पूर्वार्ध-उत्तरार्ध)

★ **दादा भगवान फाउन्डेशन द्वारे गुजराती आणि इंग्रजी भाषेत सुद्धा बरीच पुस्तके प्रकाशित झाली आहे। वेबसाइट www.dadabhagwan.org वर सुद्धा आपण ही सगळी पुस्तके प्राप्त करू शकता।**

★ **प्रत्येक महिन्यात हिन्दी, गुजराती आणि अंग्रेजी भाषेत दादावाणी मेगेझीन प्रकाशित करीत आहे।**

## संपर्क सूत्र

### दादा भगवान परिवार


**अडालज** : **त्रिमंदिर**, सीमंधर सिटी, अहमदाबाद-कलोल हाईवे, पोस्ट : अडालज, जि.-गांधीनगर, गुजरात - 382421. फोन : (079) 39830100

**राजकोट** : **त्रिमंदिर**, अहमदाबाद-राजकोट हाईवे, तरघड़िया चोकड़ी (सर्कल), पोस्ट : मालियासण, जि.-राजकोट. फोन : 9924343478

**भुज** : **त्रिमंदिर**, हिल गार्डनच्या मागे, एयरपोर्ट रोड. फोन : (02832) 290123

**अंजार** : **त्रिमंदिर**, अंजार-मुंद्रा रोड, सिनोग्रा पाटीया जवळ, सिनोग्रा गाँव, ता-अंजार. फोन : 9924346622

**मोरबी** : **त्रिमंदिर**, पो-जेपुर (मोरबी), नवलखी रोड, ता-मोरबी, जि-राजकोट, फोन : (02822) 297097

**सुरेन्द्रनगर** : **त्रिमंदिर**, लोकविद्यालय जवळ, सुरेन्द्रनगर-राजकोट हाईवे, मुळी रोड. फोन : 9879232877

**अमरेली** : **त्रिमंदिर**, लीलीया बायपास चोकडी, खारावाडी. फोन : 9924344460

**गोधरा** : **त्रिमंदिर**, भामैया गाँव, एफसीआई गोडाउन समोर, गोधरा, (जि.-पंचमहाल). फोन : (02672) 262300

**वडोदरा** : **त्रिमंदिर**, बाबरिया कोलेज जवळ, वडोदरा-सुरत हाई-वे NH-8, वरणामा गाँव. फोन : 9574001557

**अहमदाबाद** : **दादा दर्शन**, ५, ममतापार्क सोसाइटी, नवगुजरात कॉलेजच्या मागे, उस्मानपुरा, अहमदाबाद-380014. फोन : (079) 27540408

**वडोदरा** : **दादा मंदिर**, १७, मामानी पोळ-मुहल्ला, रावपुरा पुलिस स्टेशन समोर, सलाटवाड़ा, वडोदरा. फोन : 9924343335

| | | | |
|---|---|---|---|
| **मुंबई** | : 9323528901 | **दिल्ली** | : 9810098564 |
| **कोलकता** | : 9830093230 | **चेन्नई** | : 9380159957 |
| **जयपुर** | : 9351408285 | **भोपाल** | : 9425024405 |
| **इन्दौर** | : 9039936173 | **जबलपुर** | : 9425160428 |
| **रायपुर** | : 9329644433 | **भिलाई** | : 9827481336 |
| **पटना** | : 7352723132 | **अमरावती** | : 9422915064 |
| **बेंगलूर** | : 9590979099 | **हैदराबाद** | : 9989877786 |
| **पूणे** | : 9422660497 | **जालंधर** | : 9814063043 |

**U.S.A.** : **(D.B.V. I.)** +1 877-505-DADA (3232)

| | | | |
|---|---|---|---|
| **U.K.** | : +44 330-111-DADA (3232) | **UAE** | : +971 557316937 |
| **Kenya** | : +254 722 722 063 | **Singapore** | : +65 81129229 |
| **Australia** | : +61 421127947 | **New Zealand** | : +64 210376434 |

**Website : www.dadabhagwan.org**



## गुरू आणि ज्ञानीमध्ये इतका फरक

या सर्व गुरूंचे काम काय असते ? तर मी मोठा कसा बनू ? माझे गुरूत्व कसे वाढवू ? लघुत्वाकडे जात नाहीत. व्यवहारात त्यांचे गुरूत्व वाढत गेले, नाव झाले की, 'यांचे तर एकशे आठ शिष्य आहेत.' म्हणजे निश्चयात तेवढे लघु झाले, लघुत्तम होत चालले आहे. व्यवहारात गुरू होऊ लागले ही मागे पडण्याची निशाणी आहे.

मी स्वत:ला संपूर्ण जगाचा शिष्य मानतो आणि लघुत्तम स्वरुप आहे. याशिवाय माझे दुसरे कोणतेही स्वरुप नाही. 'दादा भगवान' हे भगवान आहेत, आत प्रकट झाले आहेत ते!

- दादाश्री



dadabhagwan.org




Printed in India

Price ₹ 40